शास्त्रीय विभाग–२

# आपलें आर्थिक नियोजन

लेखक

ह. रा. महाजनी

किंमत ५ रुपये

प्रकाशक व व्यवस्थापक
**रा. ज. देशमुख,**
देशमुख आणि कंपनी
१९१ शनिवार पेठ, पुणें २.

संचालक
**भ. व्यं. देशमुख,**
बी. ए., एल्एल्. बी.


२ मुखपृष्ठावरील चित्र श्री. दीनानाथ दलाल यांचें आहे.
३ मुखपृष्ठावरील चित्राचे ब्लॉक बॉंबे प्रोसेस स्टुडिओंत केले आहेत.

मुद्रक
**न. वि. सरदेशपांडे,**
आदर्श मुद्रणालय,
२९५/५ सदाशिव पेठ, पुणें २.

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

| | किं. रु. |
|---|---|
| **वि. स. खांडेकर** | |
| फुलें आणि दगड (आ. दुसरी) | ३ |
| घरट्याबाहेर ( ,, ) | ३ |
| पहिली लाट ( ,, ) | ३ |
| स्त्री अीण पुरुष | २ |
| कालचीं स्वप्नें | ३ |
| आजचीं स्वप्नें | ३ |
| कलिका | २। |
| मृगजळांतील कळ्या | २॥ |
| सायंकाल (आ. २ री) | २॥ |
| अविनाश | १।। |
| मंदाकिनी | १।। |
| सहा भाषणें | २ |
| फुलें आणि कांटे | २। |
| हिरवा चांफा. (आ. तिसरी) | ५ |
| दोन ध्रुव ( ,, ) | ५ |
| पहिलें प्रेम (आ. दुसरी) | ३ |
| क्रौंचवध ( ,, ) | ५ |
| पांढरे ढग ( ,, ) | ४। |
| जळलेला मोहोर | ३ |
| **ना. धों. ताम्हनकर** | |
| तात्या भाग १ ला (आ.दुसरी) | ४ |
| तात्या भाग २ रा | ३ |
| निवाडे भाग १ ला | २॥ |
| निवाडे भाग २ रा | ४ |
| चकमकी | १॥ |
| बच्चा नवरा | १॥ |

| | किं. रु. |
|---|---|
| अनेक आशीर्वाद | ३॥ |
| दाजी भा. १ ला (आ. दुसरी) | ३॥ |
| **ग. त्र्यं. माडखोलकर** | |
| अवशेष | २ |
| नागकन्या | २ |
| माझी नभोवाणी | २ |
| नवे संसार ( जप्त ) | ४ |
| चंदनवाडी | ६॥ |
| व्यक्तिरेखा | २। |
| **साने गुरुजी** | |
| पुनर्जन्म ( आ. दुसरी ) | ३ |
| आस्तिक ( ,, ) | ३ |
| सोन्यामारुति ! ( ,, ) | २ |
| गोड निबंध ( भाग १ ) | ३ |
| गोड निबंध ( भाग २ ) | ३ |
| **चिं. वि. जोशी** | |
| आणखी चिमणराव (आ.२री) | ४ |
| नवें भारूड | २ |
| स्टेशनमास्तर | २ |
| नटश्रेष्ठ | -।।।- |
| **दत्तु बांदेकर** | |
| सख्याहरी ( आ. दुसरी ) | १॥ |
| नवी आघाडी | १॥ |
| तूं आणि मी | २। |
| नजरबंदी | २। |

| | किं. रु. |
|---|---|

**वा. म. जोशी**

| | |
|---|---|
| स्मृति–लहरी | २ |
| विचार–लहरी | २। |
| विचार–विहार | ४ |

**प्र. के. अत्रे**

| | |
|---|---|
| साखरपुडा | १॥ |
| ललितवाङ्मय | ३॥ |

**द. र. कवठेकर**

| | |
|---|---|
| अपुरा डाव | ३ |
| रेशमाच्या गांठी | ३ |

**ना. ह. आपटे**

| | |
|---|---|
| फसगत | १॥ |
| साजणी | ५ |

**ना. म. पटवर्धन**

| | |
|---|---|
| हितपत्रें | ३ |
| वा. म. जोशी यांचें चरित्र | ४। |

**अनंत काणेकर**

| | |
|---|---|
| धुक्यांतून लाल ताऱ्याकडे (आ. दुसरी) | ३ |
| पिकलीं पानें ( ,, ) | १॥ |

**य. दि. पेण्ढरकर**

| | |
|---|---|
| प्रापंचिक पत्रें | ३ |
| घायाळ | २ |

**पु. य. देशपांडे**

| | |
|---|---|
| नवें जग ? | २॥ |

**भाई बेके**

| | |
|---|---|
| रॉयचरित्र | १॥ |

| | किं. रु. |
|---|---|

**वि. स. खांडेकर (परिचय लेखक)**

| | |
|---|---|
| काव्यज्योति | १ |

**आनंदीबाई जयवंत**

| | |
|---|---|
| पारंब्या | २ |

**लक्ष्मणराव सरदेसाई**

| | |
|---|---|
| ढासळलेले बुरुज | २ |

**प्रो. वि. ह. कुलकर्णी**

| | |
|---|---|
| व्यक्तिचित्रें | २॥ |

**शकुंतला परांजपे**

| | |
|---|---|
| भिल्लिणीचीं बोरें | ३ |

**कृष्णाबाई मोटे**

| | |
|---|---|
| मीनाक्षीचें जिवन | २। |

**र. गो. सरदेसाई**

| | |
|---|---|
| चलतीं नाणीं | २ |

**रा. श्री. जोग**

| | |
|---|---|
| सौंदर्यशोध आणि आनंदबोध | ८ |

**वि. वि. बोकील**

| | |
|---|---|
| बेबीची बहीण | ३ |

**सत्यग्राही**

| | |
|---|---|
| ग्रह आणि तारे | ४॥ |

**काकासाहेब कालेलकर**

| | |
|---|---|
| ब्रह्मदेशचा प्रवास | १॥ |

**वि. म. भुस्कुटे**

| | |
|---|---|
| स्टॅलिन | ३॥ |

**कमलाबाई टिळक**

| | |
|---|---|
| आकाशगंगा | २॥ |

**रामतनय**

| | |
|---|---|
| साखरगोटी | ५ |

# आगामी प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

१ अश्रु
२ बुद्ध आणि हिटलर
३ तिसरी भूक
४ वर्षाकाल
५ छाया भाग १-२
६ चार भिंती
७ चक्रवर्ती
८ बर्डी मां
९ विसावें शतक
१० कल्पलता
११ वालुका
१२ मंजिऱ्या
१३ मराठीचा नाट्यसंसार
१४ चल ये राणी
१५ सुवर्णकण
१६ माझ्या कादंबऱ्या

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ तीन दिवस
२ ऋणभार
३ माझे आवडते कवि
४ चक्रवर्ति उदयन
५ उर्वशी
६ उमरखय्याम
७ विलापिका
८ दोन तपें
९ हें युद्ध

### द. र. कवठेकर

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी
४ आभाळाची सांवली

### ना. धों. ताम्हनकर

१ गुजाताई
२ शेजारी

### प्र. के. अत्रे

१ दुर्वा आणि फुलें
२ 'मी' कसा झालों

### कृष्णाबाई मोटे

१ अनामिकेची पूजा
२ कलाक्षेत्रांत
३ मवाली
४ गुणाची पोर

### काकासाहेब कालेलकर

१ स्मरण–यात्रा

### अनंत काणेकर

१ उघड्या खिडक्या
२ काळे आणि पांढरे

### चिं. वि. जोशी

१ गुंड्याभाऊ
२ दरबार कथा
३ लंकावैभव
४ वायफळाचा मळा

### दत्तु बांदेकर

१ हिरवी माडी
२ कबुली जबाब
३ गडी फू

### साने गुरुजी

१ गोड निबंध भाग तिसरा

? क्षमाबाई राव

? आचार्य भागवत



# अनुक्रमणिका



# नियोजनाविषयीं प्रास्ताविक विचार १

"Planning by itself is not, therefore, something to be applauded. It can be done for two diametrically opposed purposes."

—Planning & Planning ( M N. Roy )

१९१८ ते १९३९ या दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळांत 'आर्थिक नियोजना'ची कल्पना लोकप्रिय झाली. ज्याला भांडवलशाही असें आपण म्हणत आहोंत त्या समाजाचे समर्थक व टीकाकार या दोघांनींहि 'आर्थिक नियोजना'च्या कल्पनेचा धडाक्यानें पुरस्कार केला. एक काळ असा होता कीं, त्या वेळीं चालू समाजव्यवस्थेचे पुरस्कर्ते व अर्थशास्त्रज्ञ यांना याच योजनेच्या कल्पनेचें वावडें होतें. आपण जर अडाम स्मिथपासून तों गेल्या महायुद्धाच्या पूर्वींच्या काळापर्यंत सर्व अर्थशास्त्रीय विचारांचा आढावा घेतला तर ही गोष्ट उघड उघड दिसण्यासारखी आहे. भांडवलशाही समाज ज्या वेळीं एकसारखा झपाट्यानें वाढत होता, राष्ट्रांच्या मर्यादा भराभर ओलांडून भांडवलदार वर्ग सर्व जग आक्रमण्याच्या महत्त्वाकांक्षेनें पुढें पुढें जात होता, नौकानयन, रेल्वे, तारायंत्रें इ. दळणवळणाच्या साहाय्यानें सर्व जग मुठींत आणण्याच्या विजयाचा कैफ ज्या वेळीं त्यावर चढूं लागला होता त्या वेळीं, त्या विकासाच्या उत्साही वातावरणांत त्याला साजेसे विचार जन्माला यावेत हें साहजिकच होय. भांडवलशाहीच्या त्या तारुण्याच्या काळांत आज ज्याला आपण मूलभूत दोष म्हणूं शकूं—तिच्या समर्थकांनाहि आज तो दोष मान्य करावा लागला आहे—तोच त्या वेळच्या विचारवंतांना त्या समाजाचा गुण वाटत होता. ज्याला 'आर्थिक अराजकता ( Anarchy in Production )' असें म्हणतां येईल त्यालाच त्या वेळीं 'कळसूत्री बाहुल्याप्रमाणें आपोआप चालणारें संपत्ति निर्माण करण्याचें यंत्र' असें गौरवानें संबोधिलें जात होतें. या अराजकतेंतून संपत्तीशेजारीं दारिद्र्य, काम करण्याची इच्छा असून बेकारी, अशा प्रकारचे अनर्थ निर्माण होतील हे अंदाज त्यांना मान्य नव्हते. उलटपक्षीं प्रत्येक व्यक्तीच्या स्वार्थाला संपूर्ण वाव मिळाला तर व्यक्तीव्यक्ती मिळूनच समाज बनल्याकारणानें आपोआपच समाज-

हित साधलें जाईल असें सुखस्वप्न त्या वेळीं चित्रित केलें जात होतें. याच अराजकतेंतून आर्थिक मंदी व महायुद्धें निर्माण होतील ही भीति त्यावेळीं निराधार मानली जात असून, वैय्यक्तिक साहस ( Individual Enterprise) व व्यक्तिस्वातंत्र्य ( Individual Freedom ) या दोन तत्त्वांचा संपूर्ण अवलंब केल्यास आणि सरकारनें या उत्पादनाच्या अजब व आपोआप चालणाऱ्या प्रचंड यंत्रांत उगाच ढवळाढवळ केली नाहीं तर व्यक्तीच्या हितांतून आपोआपच समाजाची भरभराट होत जाईल असा दृढ विश्वास व्यक्त केला जात होता.

१९१८ नंतर भांडवलशाही अर्थव्यवस्थेबद्दल रंगविलेलीं हीं शेखमहंमदी मनोराज्यें धडाधड कोसळून पडण्यास सुरुवात झाली. माल प्रचंड प्रमाणावर तयार करणें शक्य असून माल तयार करतां येत नाहीं, काम करण्याची इच्छा असून काम मिळूं शकत नाहीं, उत्पादनाचीं साधनें सेवेला जय्यत तयार असतांना तीं बंद ठेवावीं लागतात, पिण्याकरितां तयार केलेली कॉफी इंजिनांत जाळण्याकरितां उपयोगावी लागली, खाण्याकरितां पिकविलेला गहूं समुद्रांत ओतावा लागला, कापड तयार करण्यासाठीं पिकवलेला कापूस उपटून काढण्याचा प्रसंग आला, थोडक्यांत सांगावयाचें तर विपुल संपत्ति तयार करणारी यंत्रसामुग्री संपत्ति विपुल प्रमाणावर तयार करते याच कारणासाठीं, बंद ठेवण्याचा प्रसंग आला त्यावेळीं आजवर ज्या अर्थव्यवस्थेची तरफदारी आपण करीत आलों तिची मुळापासून तपासणी करण्याची गरज त्या पद्धतीच्या समर्थकांनाही वाटूं लागली आणि चमत्कार असा कीं ज्या समाजवादी टीकाकारांच्या ‘आर्थिक योजनेच्या’ कल्पनेवर ‘अव्यवहार्य’ असा एकच गिल्ला या लोकांनीं केला होता त्याच लोकांनीं ‘आर्थिक योजनेचा’ जोरदार रीतीनें पुरस्कार करण्यास सुरुवात केली. एके काळचे निंदक आजचे भाट बनतात हा देखावा चमत्कारिक व आनंददायक वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. पण त्याचबरोबर त्या कल्पनेचा विपर्यास होण्याचा धोकाहि वाढत जातो ही गोष्टहि लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. ‘ज्या वेळीं रानटी माणसाला ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली जाते त्या वेळीं पर्यायानें ख्रिस्ति धर्माला रानटी अवस्थेची दीक्षा दिली जात असते’ हा सुप्रसिद्ध नाटककार

बर्नार्ड शॉचा इषारा थोड्याफार फरकानें याहिबाबत लागू करावयास हरकत नाहीं. आज 'योजना' अर्थशास्त्रीय विचारांतील एक परवलीचा शब्द होऊन बसला आहे; किंबहुना अर्थशास्त्रांत स्वतःला पुरोगामी म्हणवून घ्यावयाचें असेल तर 'आर्थिक योजनेचा' पुरस्कार केलाच पाहिजे असा एक दंडक होऊन बसला आहे. पण पुरोगामी बनण्याच्या या चढाओढीच्या क्षेत्रात 'वाईट नाणें चागल्या नाण्याला हद्दपार करीत असतें' हा अर्थ-शास्त्रांतील जुनाच नियम लागू पडण्यासारखा आहे; कारण आर्थिक योज-नेच्या बाजारांत चांगल्याबरोबर वाईट नाणींहि चालू होण्याचा संभव असतो. यासाठीं 'योजना' हा शब्द ऐकल्याबरोबर 'आली पुरोगामी कल्पना' असें हुरळून न जातां तिचें स्वरूप, ध्येय व तपशील या सर्वांचा शांत चित्तानें विचार करण्याची आवश्यकता वाटत जाते. म्हणून हिंदुस्थानातहि युद्धोत्तर पुनर्घटनेसंबंधीं विचार करतांना प्रथम 'अथातो योजना-मीमांसा' येथपासूनच विचारास प्रारंभ होणें आवश्यक ठरतें.

## योजनेची निश्चित व्याख्या

अशा प्रकारें योजनेच्या मीमांसेला प्रारंभ करतांना योजना या शब्दांतील मूळ कल्पनेची अधिक फोड व्हावयास हवी; कारण तशी स्पष्ट फोड केल्याशिवाय 'आर्थिक योजना' या शब्दानें काय नेमकें सांगितलें जातें याचा उमग पडणार नाहीं, आणि त्यासाठीं आर्थिक योजनेची एक निश्चित व्याख्या आपणास तयार करणें आवश्यक आहे. कांहीं वेळां भांडवलशाहीच्या समर्थकांकडून असेंहि म्हटलें जातें कीं योजनेची कल्पना कांहीं नवीन नाहीं. भांडवलदार अर्थव्यवस्थेंतहि ती कल्पना आहेच. प्रत्येक कारखानदार कारखाना सुरू करण्यापूर्वी कोणता माल तयार करावयाचा, तो किती प्रमाणांत तयार करावयाचा, त्याला कच्चा माल, मजुरी, यंत्रसामग्री किती लागेल इ. सर्व गोष्टींचें आगाऊ अंदाजपत्रक तयार करीत असतो. हें अंदाजपत्रक तयार करणें याचाच सरळ अर्थ एका विशिष्ट योजनेनुसार संपत्ति निर्माण करणें असा केला पाहिजे. मग भांडवलशाहींत 'अराजकता' आहे या आक्षेपांत अर्थ काय ? भांडवल-शाहींत अराजकता आहे किंवा योजना नाहीं हा आक्षेप सार्थ करण्यासाठीं

किंवा वरील समर्थन चुकीचें आहे हें सिद्ध करण्यासाठीं ‘ आर्थिक योजने ’ ची व्याख्या करणें क्रमप्राप्त ठरतें. भांडवलशाहींत प्रत्येक कारखाना पूर्वयोजनेनुसार चालत असेल; पण समाजांतील वट्ट संपत्तीचें उत्पादन अथवा विभजन पूर्वयोजनेनुसार चालत नाहीं. किंबहुना तशी योजना भांडवलशाहींत अमलांत येणें शक्य नाहीं. याचें कारण अगदीं उघड आहे. प्रत्येक कारखाना पूर्वयोजनेनुसार चालत असतो ही गोष्ट खरी; पण या योजनेचा हेतु नफा असतो ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. नफ्याच्या हेतूनें ही जी वैयक्तिक योजना आंखली जाते त्या योजनेंत माल किती प्रमाणांत तयार करावा हा निर्णय बाजारांत त्या मालाला किती भाव येईल या अंदाजावर घेतला जातो हें स्पष्ट आहे. याचा अर्थ असा कीं कारखानदाराचें अंदाजपत्रक पदार्थांच्या किंमतीच्या चढउतारावर अवलंबून असतें. पदार्थांच्या किंमतीची चढउतार मागणी व पुरवठा यांच्या नियमानुसार ठरत जाते आणि मागणी व पुरवठा यांचे नियम जो आर्थिक व्यवहार खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चालू आहे त्यालाच लागू पडतात हें सांगण्याची गरज नाहीं. समाजांत आर्थिक व्यवहार खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चालू आहे याचाच दुसरा अर्थ त्या आर्थिक व्यवहारांत ‘ योजना ’ नाहीं असा होतो. म्हणजे प्रत्येक कारखाना पूर्वयोजनेनुसार माल तयार करीत असेल; पण समाजांतील वट्ट संपत्तीचें उत्पादन, विभजन, विनिमय अथवा उपभोग यांमध्यें समाजाला व्यापील अशी योजना नाहीं ही गोष्ट प्रांजलपणानें कबूल करावयास हवी. ‘ आर्थिक योजने ’ची मीमांसा करतांना ज्या प्रकारची योजना आपणास अभिप्रेत आहे ती योजना सर्व समाजाला व्यापील अशा स्वरूपाची असावयास पाहिजे हें त्या योजनेचें पहिलें लक्षण होय.

अशा प्रकारच्या समाजव्यापी आर्थिक योजनेच्या कल्पनेंत प्रामुख्यानें तीन गोष्टींचा अंतर्भाव होतो. एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं प्रत्यक्ष संपत्ति निर्माण होण्यापूर्वी कोणत्या प्रकारचा माल किती प्रमाणांत कोठें, कसा व कोणत्या पद्धतीनें तयार करावयाचा याविषयीं निर्णय आगाऊ व जाणिवेनें घेतले गेले पाहिजेत. अशा प्रकारें आगाऊ व जाणिवेनें निर्णय घेण्यासाठीं समाजाच्या विविध आर्थिक क्षेत्रांवर परिणामकारक नियंत्रण ठेवणारी व वेगवेगळ्या उत्पादन केंद्रांना मार्गदर्शन करणारी एक मध्यवर्ति

समिति ( Central Planning Authority ) अस्तित्वांत येणें आवश्यक आहे. त्याचबरोबर या मध्यवर्ति समितीला संपत्तीच्या उत्पादनाची योजना आंखून त्याप्रमाणें विविध कारखान्यांना काम वांटून द्यावयाचें असेल तर समाजांतील सर्व आर्थिक व्यवहारांचा तपशीलवार आढावा प्रथम घेतला पाहिजे. तेव्हां आर्थिक निर्णय जाणिवेनें ठरविणें, मध्यवर्ति समितीमार्फत मार्गदर्शन होत जाणें आणि सर्व आर्थिक व्यवहारांचा (उत्पादन, विभजन, विनिमय आणि उपभोग ) वहू आढावा घेणें* या तीन गोष्टींशिवाय आर्थिक नियोजनाची कल्पना निरर्थक आहे. योजनेला या तीन गोष्टी प्राणभूत होत आणि त्याचबरोबर स्पर्धा, खुली बाजारपेठ इ. तत्त्वांवर चाललेल्या आर्थिक व्यवहारांमध्यें या प्रकारची आर्थिक योजना बसूं शकत नाहीं हीहि गोष्ट सहज स्पष्ट होण्यासारखी आहे. यासाठीं भांडवलशाहींत प्रत्येक उत्पादनकेंद्र योजनेनुसार चालत असलें तरी सर्व निर्णय समाजव्यापी असूं शकणार नाहींत, त्यांत उत्पादनाचा आढावा आगाऊ घेणें शक्य होत नाहीं किंवा एका मध्यवर्ति केंद्रांतून सर्व आर्थिक व्यवहार नियंत्रित होणें शक्य नाहीं. भांडवलशाहीचें उत्पादन मागणी व पुरवठ्याचे

---

* आर्थिक योजनेंतील या तीन गोष्टींचा अंतर्भाव करून Dickinson या ग्रंथकारानें योजनेची पुढीलप्रमाणें व्याख्या दिली आहे.

" Economic planning is the making of major economic decisions—what and how much is to be produced, how, when and where it is to be produced, and to whom it is to be allocated–by the conscious decision of a determinate authority, on the basis of a comprehensive survey of the economic system as a whole "

—Economics of Socialism, Page 14

ही व्याख्या नाझी व सोव्हियट या दोनहि प्रकारच्या योजनांना लागू पडते आणि यासाठीं ती या ठिकाणीं स्वीकारण्यांत आली आहे. सुप्रसिद्ध समाजवादी व अर्थशास्त्रज्ञ जी. डी. एच. कोल यांनीं आपल्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या Great Britain in the Post war world या ग्रंथांत जी योजनेची व्याख्या ( G. Page 3 ) दिली आहे ती फक्त सोव्हिएट किंवा तत्सदृश योजनेलाच लागू पडण्यासारखी असल्याकारणानें ती विवेचनाच्या या प्रारंभींच्या अवस्थेंत विचारांत घेतलेली नाहीं.

नियमानुसार होत असतें असें नेहमीं सांगितलें जातें. पण त्याचा खरा अर्थ इतकाच कीं, मागच्या मागणी पुरवठ्याच्या अंदाजावरून पुढें आपल्या मालाला किती मागणी येऊं शकेल याचा ठोकळ अंदाज बांधून कारखानदार संपत्ति निर्माण करीत असतो; आणि मागचे मागणी-पुरवठ्याचे अंदाज पदार्थांच्या किंमतींतील चढउतारावरून ओळखावयाचे असतात. म्हणजे किंमती वाढल्या तर मागणी जास्त म्हणून मालाची निपज मोठ्या प्रमाणा-वर, उलटपक्षीं किंमती उतरल्या कीं मागणी कमी म्हणून मालाच्या निर्मि-तींत घट, असा हा सगळा आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ या व्यवहारांत आहे. यालाच अडाम स्मिथपासून सर्व समर्थक 'पदार्थांच्या किंमतीच्या तंत्रानें आपोआप चालणारें उत्पादनाचें यंत्र' असें गौरवीत आले आहेत आणि याच व्यवहारांना मार्क्स आदिकरून समाजवादी टीकाकारांनीं 'उत्पादन क्षेत्रांतील अराजकता ( Anarchy in Production )' असें यथार्थ नांव दिलें आहे.

## आर्थिक अराजकता वि. आर्थिक योजना

आर्थिक योजनेच्या इतक्या व्यापक कल्पनेचा पुरस्कार प्रथम कार्ल मार्क्स व त्यानंतर झालेल्या समाजवाद्यांनीं केला. मार्क्सपूर्वी झालेल्या समाजवाद्यांनीं जीं आदर्श समाजरचनेचीं चित्रें रंगविलीं त्यांमध्यें योजनेची कल्पना गृहीत होती, नाहीं असें नाहीं. उदाहरणार्थ थॉमस मूरनें आपल्या Utopia मध्यें जो समाज कल्पिला आहे त्यामध्यें उत्पादन, विभजन, विनिमय इ. आर्थिक व्यवहार नियोजित आहेत असें गृहीत धरूनच त्या समाजाचें चित्र रेखाटलें आहे. त्याचप्रमाणें सेंट सायमन्, फूरियर इ. समाजवाद्यांनीं ज्या आदर्श वसाहती स्थापन केल्या त्यांतील अर्थ-व्यवहार स्पर्धेच्या तत्त्वावर चालणार नाहींत ही गोष्ट गृहीत धरलेलीच होती. तथापि या सर्व समाजवाद्यांनीं गृहीत धर-लेल्या योजनेच्या कल्पना इतक्या व्यापक नव्हत्या. त्यांची व्याप्ति फार तर छोट्या जमावाला पुरेल इतकीच होती. आणि दुसरा महत्त्वाचा दोष असा होता कीं त्यांच्या योजनेचा जन्म भांडवलशाही अर्थव्यवहाराच्या शास्त्रीय मीमांसेंतून झालेला नव्हता. उलटपक्षीं, मार्क्सनें योजनेची जी कल्पना पुढें मांडली ती कल्पना भांडवलशाहींत जें आर्थिक अराजक माजलें आहे त्याला प्रतिद्वंद्वि म्हणून पुढें आली आहे. अर्थात् ती कल्पना वास्तवाच्या

परीक्षणावर आधारलेली आहे. तेव्हां मार्क्सला ज्या प्रकारची आर्थिक योजना अभिप्रेत होती त्या योजनेचें खरें स्वरूप समजावून घेण्यासाठीं आपणास त्यानें केलेल्या आर्थिक अराजकाच्या मीमांसेंत शिरावयास हवें. कारण ज्या कारणांनीं भांडवलदार अर्थव्यवस्थेमध्यें हें अराजक माजतें तीं कारणें नष्ट झाल्याशिवाय आर्थिक योजना येणें अशक्य आहे असा एक सरळ निष्कर्ष त्यामधून निघतो. तीं कारणें कायम ठेवून योजना आणणें अशक्य आहे असा त्याच्या सिद्धांताचा कटाक्ष आहे.

नुसत्या योजनेचा अभाव नव्हे तर अराजक

आर्थिक अराजकतेला प्रतिस्पर्धि म्हणून आर्थिक योजनेची कल्पना पुढें सरसावली असें वर सांगितलें. पण आर्थिक अराजकतेचीं कारणें शोधण्यापूर्वीं आपणास या अराजकाचें स्वरूप समजावून घेतलें पाहिजे. कारण मार्क्स भांडवलशाहींत केवळ योजनेचा अभाव आहे असें म्हणून थांबत नाहीं, तर त्या अर्थव्यवस्थेंत अराजकता किंवा बेबंदशाही माजली आहे असा दोषारोप करीत आहे. या ठिकाणीं योजनेचा अभाव व अराजकता या दोन कल्पना भिन्न आहेत हें स्पष्ट दिसून येईल. योजनेचा अभाव भांडवलशाहीपूर्वीच्या अर्थव्यवस्थेमध्येंहि होता. उदाहरणार्थ, सरंजामशाहींतील आर्थिक व्यवहाराकडे पाहूं. सरंजामशाहींत शेती हा प्रमुख धंदा व त्याच्या अनुषंगानें ग्रामोद्योग व हातधंदे चालत असत. या अर्थव्यवस्थेमध्येंहि योजना नव्हती. पण या आर्थिक व्यवहारांत योजना नसली तरी त्याचें पर्यवसान अराजकतेंत होत नव्हतें. याचें कारण त्या समाजांत उत्पादनाचें क्षेत्र अगदीं मर्यादित असे. चार चार, पांच पांच खेडेगांवांपुरते आर्थिक व्यवहार मर्यादित रहात असत. त्या प्रत्येक गटांतहि अन्न, वस्त्र इ० वस्तू स्वतःची गरज भागविण्याकरितां प्रामुख्यानें निर्माण केल्या जात. विनिमय फार थोडा; आणि तोहि त्याच गटांतील मध्यवर्ति ठिकाणीं जत्रेच्या रूपानें. राष्ट्रीय बाजारपेठ, विनिमयाकरितां संपत्तीचें उत्पादन इ० आर्थिक व्यवहार त्या समाजाच्या गांवींहि नव्हते. साहजिकच या अर्थव्यवहारांत योजना नसली तरी ज्या प्रकारचें अराजक आज समाजाला जाणवतें तें अराजक त्यामध्यें निर्माण होणें शक्य नव्हतें, त्या समाजाला अवर्षण अथवा अतिवर्षण इ० कारणांनीं दुर्गा-

देवीच्या दुष्काळासारखा दुष्काळ पडला तरच त्याची झळ लागणार. यावरून ही अवस्था मोठी स्पृहणीय होती असा या विवेचनाचा बिलकुल रोख नाहीं. या विवेचनाचा रोख या समाजामध्यें ज्या प्रकारचें अराजक भांडवलशाहीमध्यें आपण अनुभवीत आहोंत तशा प्रकारचें अराजक निर्माण होणें शक्य नव्हतें या गोष्टीकडे आहे.

भांडवलदार अर्थव्यवहारामध्यें योजनेच्या अभावाचें अराजकांत रूपांतर झालें याचें कारण भांडवलशाहीनें पूर्वीच्या अर्थव्यवस्थेंत एक आमूलाग्र क्रांति केली हेंच होय. भांडवलशाहीनें केलेल्या आर्थिक क्रांतीची विनिमयाकरितां सर्व वस्तूंचें उत्पादन, उत्पादनाचीं यांत्रिक साधनें आणि त्याला अनुकूल असा श्रमविभाग, अशीं तीन लक्षणें सांगतां येतील. सरंजामशाही अन्न, वस्त्र इ० आवश्यक वस्तू स्वतःच्या गरजा भागविण्याकरितां करीत असे. भांडवलशाहींत दळणवळणाचीं साधनें, उत्पादनाच्या साधनांतील वाढ इ० कारणांनीं संपत्तीचें उत्पादन प्रचंड प्रमाणावर वाढलें आणि त्यामुळें अन्न, वस्त्रासारख्या आवश्यक वस्तू देखील विनिमयाकरितां तयार होऊं लागल्या. उत्पादनाचीं साधनें सरंजामशाहींत मागासलेलीं होतीं हें सांगावयास नकोच. त्या मागासलेल्या साधनांनीं संपत्ति तोकडी तयार होत असे हीहि गोष्ट स्पष्ट होती. भांडवलदारांनीं संपत्ति निर्माण करण्याचीं साधनें नवीन प्रकारचीं आणून संपत्तीचें उत्पादन प्रचंड प्रमाणावर सुरू केलें या गोष्टीवरहि आतां भर देण्यांत हंशील नाहीं. तिसरें वैशिष्ट्य म्हणजे श्रमविभाग. हातधंद्यामध्यें कच्चा माल आणून त्याचें पक्क्या मालांत रूपांतर करीपर्यंत एकच सुतार, एकच कोष्टी राबत असे. भांडवलशाहींत त्या ठिकाणीं प्रत्येक क्रियेसाठीं एकेक इसम इतका परस्परावलंबी, गुंतागुतीचा व सूक्ष्म श्रमविभाग तयार झाला. अर्थात् अशा प्रकारचें गुंतागुंतीचें, परस्परावलंबी व प्रचंड उत्पादनाचें यंत्र जर का अवचित थांबलें तर समाजांत काय अनर्थ ओढवेल याची कल्पनाच केलेली बरी.

मागच्या अर्थव्यवस्थेपेक्षां पुढारलेली, विपुलधन तयार करण्याची शक्यता असलेली अर्थव्यवस्था भांडवलदारांनीं निर्माण केली. पण त्याचबरोबर त्या अर्थव्यवस्थेंत योजना नव्हती इतकेंच नव्हे तर ‘ मोठा मासा लहान माशाला गिळतो ’ हा प्राणिवर्गातील जीवनकलहाचा सिद्धांतहि त्या व्यवस्थेंत

आणला. त्यांतहि मागें सांगितल्याप्रमाणें उत्पादनाचें प्रत्येक वैयक्तिक केंद्र म्हणजे कारखाना योजनेनुसार काम करूं लागला आणि त्या सर्व केंद्रांमध्यें मात्र केवळ योजनेचा अभावच नव्हता; तर एकमेकांना खाऊन टाकणारी स्पर्धा त्यांत चालू होती. एखाद्या कोष्ट्याची दुसऱ्या कोष्ट्याशीं किंवा एखाद्या सुताराची दुसऱ्या सुताराशीं स्पर्धा आणि सुसंघटित अशा एका कारखान्याची दुसऱ्या तितक्याच सुसंघटित कारखान्याशीं स्पर्धा, या दोहोंत मोठें अंतर आहे हें सांगावयास नकोच. हें अंतर परिणामाच्या दृष्टीनें समाजाला जाणवूं लागतें; दोन व्यक्तींमधील स्पर्धा समाजाला बोंचत नाहीं. याच कारणासाठीं भांडवलशाहींत आर्थिक अराजक आहे असें मार्क्स म्हणतो, तेव्हां त्याच्या आक्षेपाचा रोख तें अराजक समाजाच्या मानगुटीस बसतें हें दाखविण्याकडे आहे. ( "It is the Darwinian struggle for individual existence transformed from nature to society like intensified fury."
—Socialism Utopian and Scientific, Page 36-7 )

योजनेचा हेतूहि स्पष्ट

उत्पादनांतील बेबंदशाही किंवा आर्थिक अराजक भांडवलदार अर्थव्यवस्थेमध्यें आहे असें सांगतांना हा त्या अर्थव्यवस्थेंतील मूलभूत दोष आहे असा मार्क्सच्या टीकेचा भावार्थ आहे व हेंच मार्क्सपूर्व अर्थशास्त्रज्ञ व मार्क्स यांमधील वादाचें मूळ आहे. ज्या आर्थिक अराजकतेला मार्क्सनें मूलभूत दोष असें म्हटलें त्यालाच त्यानीं 'सहजगत्या चालणारे अर्थव्यवहार (automatism)' असें गौरविलें आहे. आणि हा केवळ पोकळ स्तुतीचा किंवा फाजील निंदेचा प्रश्न नाहीं. ज्यावेळीं स्मिथ, रिकार्डो आदिकरून अर्थशास्त्रवेत्ते या स्पर्धेच्या तत्त्वावर आर्थिक अराजकाला भांडवलदार अर्थव्यवस्थेचें वैशिष्ट्य म्हणून मानीत होते त्यावेळेस त्यांच्या मतानें व्यक्तिस्वातंत्र्य, खुली स्पर्धा, खुली बाजारपेठ या तत्त्वांवर जर संपत्तीचें उत्पादन, वाटप इ. व्यवहार चालतील तरच, केवळ व्यक्तीची भरभराट नव्हे, तर अखिल समाजाचा आर्थिक विकास होईल असा त्यांच्या समर्थनाचा आशय होता. त्यांचा असा आग्रह होता कीं प्रत्येक व्यक्तीला खुली स्पर्धा करण्यासाठीं पूर्ण मोकळीक दिली, या स्पर्धेंत भाग घेण्यासाठीं नफ्याची प्रेरक शक्ति मागें ठेवली तर या स्पर्धेच्या क्षेत्रांत

प्रत्येक व्यक्तीचें साहस, कौशल्य, संशोधकबुद्धि हे गुण कसाला लागतील, स्पर्धेंत टिकण्यासाठीं आपल्या कसबाची पराकाष्ठा करून प्रत्येक व्यक्ति समाजांत उत्कृष्ट प्रकारचा माल आणूं लागेल आणि अखेरीस त्या स्पर्धेंत त्या व्यक्तीचा फायदा होईल त्याबरोबरच समाजालाहि फायदा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. नाहीं तरी व्यक्तीव्यक्ती मिळूनच समाज बनतो ना ? तेव्हां सर्व व्यक्तींच्या स्वार्थांची बेरीज म्हणजेच समाजहित असें समीकरण यांतून त्यांनीं तयार केलें. उलटपक्षी, या स्पर्धेवर जर सरकारनें नियंत्रण घातलें तर प्रत्येक व्यक्तीला संपत्ति निर्माण करण्याची प्रेरक शक्ति रहाणार नाहीं, समाजांत संपत्तीची वाढ होणार नाहीं किंवा लोकांच्या रहाणीचें मान वाढणार नाहीं. यासाठीं आर्थिक व्यवहारांवर कोणत्याहि प्रकारचें नियंत्रण असतां कामा नये, अर्थात् या नियंत्रणाच्या अभावी कोणतीहि मध्यवर्ति योजना असतां कामा नये असा त्या तत्त्ववेत्त्यांचा कटाक्ष होता.

या समर्थनाला उत्तर म्हणून मार्क्सनें अराजकतेचा दोषारोप भांडवलदार अर्थव्यवस्थेवर केला आहे. ज्या हेतूनें योजना नको असें हे समर्थक म्हणतात तो हेतु अगर तें उद्दिष्ट योजनेच्या अभावीं भांडवलदार अर्थ-व्यवस्थेंत साध्य होणार नाहीं हें मार्क्सला सांगावयाचें होतें. तो हेतु म्हणजे समाजाचा आर्थिक विकास. समाजाचा आर्थिक विकास केवळ संपत्तीची वाढ प्रचंड प्रमाणावर होण्यावरच अवलंबून नाहीं तर उत्पन्न झालेल्या संपत्तीचा उपभोग अधिकाधिक प्रमाणांत त्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीला घेणें शक्य झालें पाहिजे म्हणजेच प्रत्येक व्यक्तीचें रहाणीचें मान ( standard of living ) वाढलें पाहिजे ही आर्थिक विकासाची मूलभूत कल्पना होय. अशा प्रकारचा आर्थिक विकास खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चाललेल्या भांडवलदार अर्थव्यवस्थेंत होईल, किंबहुना याच व्यवस्थेंत होऊं शकेल, इतरत्र होणार नाहीं असें भांडवलशाहीच्या समर्थकांचें म्हणणें होतें. याच्या उलट मार्क्सची टीका अशी होती कीं, या स्पर्धेच्या तत्त्वावर आधारलेल्या अर्थव्यवहारांतून आर्थिक विकास होण्याचें तर दूरच राहो; पण नेमके त्याच्या उलट परिणाम आपणास अनुभवावे लागतील. संपत्ति विपुल तयार होण्याऐवजीं ती कालांतरानें कमी कमी प्रमाणावर तयार करणें भाग पडेल, संपत्तीच्या उत्पादनाची एकसारखी वाढ होण्याऐवजीं आर्थिक

मंदीचे भोवरे सारखे तयार होत जातील, प्रत्येकाला वाढत्या प्रमाणावर काम मिळण्याऐवजीं बेकारी वाढत्या प्रमाणावर निर्माण होत राहील, जनतेच्या रहाणीचें मान एकसारखें वाढत रहाण्याऐवजीं तें त्याच गतीनें कमी होत जाईल आणि अखेर या दुष्ट चक्रांतून सुटका करून घेण्यासाठीं आक्रमक वृत्तीचा अवलंब होऊन जागतिक शांततेऐवजीं जागतिक युद्धाच्या वणव्यांत समाज होरपळून निघेल. हे सर्व विपरीत परिणाम ज्याला व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व असें पूर्वीचे तत्त्वज्ञ म्हणत आले त्याच व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वांतून म्हणजे आर्थिक अराजकतेंतून निर्माण झाल्याशिवाय रहाणार नाहींत आणि या कारणांसाठीं समाजवाद्यांच्या मतें आर्थिक अराजक हा भांडवलशाहींतील फार मोटा दोष आहे. या विवेचनावरून मार्क्स व इतर समाजवाद्यांना ज्या प्रकारची आर्थिक योजना अभिप्रेत होती त्या योजनेचा हेतूहि स्पष्ट होतो. त्यांना आर्थिक अराजकता नष्ट करण्यासाठीं योजना हवी होती आणि दारिद्रय, बेकारी, आर्थिक मंदी व युद्ध हे समाजविघातक परिणाम टाळण्यासाठीं आर्थिक अराजक त्यांना नको होतें. अर्थात् आर्थिक योजनेचा समाजवाद्यांनीं पुरस्कार केला त्या वेळीं समाजाचा आर्थिक विकास करण्यासाठीं म्हणजेच त्या समाजांतील बहुसंख्य जनतेच्या दारिद्रयनाशासाठीं म्हणजेच अर्थशास्त्राच्या परिभाषेंत बोलायचें तर, प्रत्येक व्यक्तीचें रहाणीचें मान वाढवावयासाठीं आर्थिक योजना समाजांतील अर्थव्यवस्थेंत यावी असाच त्यांच्या सर्व टीकेचा आशय होता. समाजवाद्यांना अभिप्रेत असलेल्या योजनेच्या हेतूवर या ठिकाणीं भर देण्याचें कारण प्रत्येक योजना हें ध्येय साध्य करीलच किंवा या ध्येयानें प्रेरित झाली असेलच असें नाहीं. तेव्हां आर्थिक योजना असे शब्द ऐकले कीं समाजवाद आला किंवा मार्क्सला ज्या प्रकारची योजना अभिप्रेत होती तीच योजना त्या शब्दांत असली पाहिजे असा समज केवळ गैरसमजच ठरणार नसून वेळप्रसंगीं तो घातकहि ठरण्याचा संभव आहे.

## योजनेचीं मूलतत्त्वेंहि स्पष्ट

भांडवलदार अर्थव्यवहारांत योजना नाहीं हा दोष सांगतांना भांडवलशाही ज्या मूलभूत तत्त्वांवर आधारलेली आहे तीं तत्त्वें कायम

असेपर्यंत भांडवलशाही उत्पादन पद्धतींत योजना येणें शक्य नाहीं असें मार्क्सला अभिप्रेत आहे. भांडवलशाही व योजना या दोन कल्पना अंधार व प्रकाश याप्रमाणें परस्परविरोधी आहेत; त्यांची एकत्र सांगड घालणें अशक्य आहे हा भांडवलशाहीवरील टीकेंतून निघणारा निष्कर्ष या ठिकाणीं आपण लक्षांत घेणें अवश्य आहे. कारण मार्क्स ज्या वेळीं भांडवलशाहींतील आर्थिक अराजक त्या अर्थव्यवस्थेच्या मूलभूत तत्त्वांतून पैदा झालें आहे अशी टीका करतो त्यावेळीं हें अराजक भांडवलशाहींतील तीं तत्त्वें नष्ट केल्याशिवाय नाश पावणार नाहीं असा त्या टीकेचा सरळ अर्थ आहे. याचाच अर्थ भांडवलशाही आणि योजना परस्परविरोधी आहेत आणि भांडवलशाही व अराजक (मंदी, बेकारी इ.) यांची छाया प्रकाशाप्रमाणें परस्पर–संगति आहे असा करणें क्रमप्राप्त आहे.

यावरून मार्क्सला अभिप्रेत असलेल्या योजनेंतील मूलभूत तत्त्वेंहि आपणांस सहज समजूं शकतील. उत्पादनांतील बेबंदशाही नष्ट करण्यासाठीं जर योजना हवी असेल तर ही अराजकता किंवा बेबंदशाही ज्या कारणांनीं निर्माण होते तीं कारणें नष्ट झाल्याशिवाय आपणास समाजाच्या आर्थिक व्यवहारांत योजना आणणें शक्य नाहीं. मार्क्सच्या मतानें ही बेबंदशाही भांडवलशाहींतील नफ्याच्या हेतूनें संपत्तीचें उत्पादन, उत्पादनाच्या साधनावरील खाजगी मालमत्ता आणि या दोन तत्त्वांचें संरक्षण करणारी राज्यसंस्था या तीन कारणांनीं तयार झालेली आहे. अर्थात् ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे कीं हीं तत्त्वें कायम असेपर्यंत आजच्या समाजांतील माजलेलें आर्थिक अराजक नष्ट करणें म्हणजे मृगजळापाठीमागें धांवण्यासारखें आहे. आतां या तीन तत्त्वांना मूठमाती देण्यास तयार होणें याचा अर्थ असाच होतो कीं भांडवलशाहीला मूठमाती देण्यास तयार होणें. म्हणून मार्क्सचें म्हणणें असें कीं भांडवलशाही व योजना या दोन गोष्टींचें विळयाभोपळयाइतकें सख्य आहे. ह्याचबरोबर मार्क्सला जी योजना हवी होती त्या योजनेचें ध्येय, समाजाचा आर्थिक विकास साधणें हें असून नफ्याऐवजीं समाजाच्या गरजा भागविण्यासाठीं संपत्तीचें उत्पादन, उत्पादनाच्या साधनावर सरकारची मालकी आणि त्या सरकारवर समाजाची मालकी हीं त्या योजनेचीं मूलभूत तत्त्वें होत. भांडवलशाहीचें मार्क्सनें जें शास्त्रीय पृथ-

करण केलें आहे त्या पृथक्करणांतून समाजवादाला अनुकूल अशा योजनेचें ध्येय व त्यांमधील वरील मूलभूत तत्त्वें आपोआप निष्पन्न होतात हें सहज समजून येईल.

## खाजगी मालकी व सामुदायिक उत्पादनपद्धति

या ठिकाणीं अराजकता हा भांडवलशाहीला मुळांत जडलेला रोग कसा आहे याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे. भांडवलशाहींतील अर्थव्यवस्थेचीं जीं मूलतत्त्वें वर सांगितलीं त्यातूनच ही संपत्तीच्या उत्पादनक्षेत्रांतील अराजकता तयार होते याविषयींचें स्पष्टीकरण केलें नाहीं तर मार्क्सला अभिप्रेत असलेल्या योजनेचीं जीं मूलभूत तत्त्वें वर सांगितलीं तींच कां स्वीकारलीं पाहिजेत यावर योग्य प्रकाश पडणार नाहीं. मार्क्सच्या मतानें भांडवलशाहींतील संपत्तीच्या उत्पादनांतील नफा हीच प्रेरक शक्ति होय; किंबहुना तेंच त्या उत्पादनाचें सार होय. ही प्रेरक शक्ति ज्या क्षणाला नष्ट होईल त्या क्षणाला भांडवलशाहीचें उत्पादनाचें यंत्र बंद पडेल. त्याचबरोबर भांडवलशाहीनें संपत्तीच्या उत्पादनावरील खाजगी मालकीहक्कहि कायम राखले आहेत. पण या मूलभूत तत्त्वांना नेमकी विरुद्ध अशी संपत्तीच्या उत्पादनाची पद्धति भांडवलशाहीनें अस्तित्वात आणली. या उत्पादनाच्या पद्धतीला मार्क्सनें 'सामुदायिक उत्पादनपद्धति ( socialised production ) असें नांव दिलें आहे. या पद्धतीच्या पूर्वीं जी उत्पादनाची पद्धति अमलांत होती ती फक्त वैयक्तिक स्वरूपाची होती. उदाहरणार्थ, सरंजामशाहींतील एखाद्या कारागिराच्या काम करण्याच्या पद्धतीकडे बघितलें तर या दोन पद्धतींमधील फरक स्पष्ट होण्यासारखा आहे. त्या वेळचा कोष्टी कापूस पिंजण्यापासून तो कापड तयार करण्यापर्यंत ज्या ज्या प्रकारचे श्रम करावे लागत असत ते तो स्वतः करीत असे आणि हाच खासगी मालमत्तेचा भौतिक पाया होय. कारण माग स्वतःचा, कापूस पिंजणें, सूत काढणें, ताणा तयार करणें, माग चालविणें व पक्कें कापड बाजारांत नेणें या सर्व क्रिया किंवा श्रम स्वतःचे, साहजिकच मालाच्या विक्रींतून होणाऱ्या मिळकतीवर हक्कहि स्वतःचा असें तो सांगत असे. भांडवलदारांनीं ही उत्पादनाची पद्धत बदलली; कारण उत्पादनाचीं साधनें

बदललीं. कोष्ट्याच्या खोपटींतलि मागाचें कापडाच्या गिरणींत रूपांतर झाल्यानंतर कच्या मालाचें पक्क्या मालात रूपांतर करण्यासाठीं अत्यंत सूक्ष्म श्रमविभाग तयार झाला आणि मग असें दृश्य दिसूं लागलें कीं गिरणींतून प्रतिदिनीं अथवा प्रतिवर्षी तयार होणाऱ्या कापडापैकीं अमुक वार कापड अमुक व्यक्तींनीं तयार केलें असा निवाडा करणें मुष्कलि होय. प्रत्येक वार कापड त्या गिरणींतील एकंदर मजुरांच्या श्रमशक्तींनीं बनलेलें आहे असा प्रत्यय येऊं लागला. या सामुदायिक श्रमविभागावरती आधारलेल्या उत्पादन-पद्धतीलाच मार्क्सनें सामुदायिक उत्पादनपद्धति असें नांव दिलें आहे आणि या उत्पादनपद्धतलि खाजगी मालकी हक्काचें तत्त्व नेमकें विरुद्ध पडतें अशी त्याची टीका आहे. ज्या वेळेस वैयक्तिक उत्पादनपद्धति होती त्या वेळेस वैयक्तिक मालकीचें तत्त्व त्याला साजेसेंच होतें. पण ज्या वेळेस सामुदायिक उत्पादनपद्धति आली त्यावेळेस वैयक्तिक मालकी त्या पद्धतीला विरोधी आहे हेंहि त्याबरोबर आपणास मान्य करावयास हवें.

## उत्पादन व विभजन यांमधील विरोध

या विरोधांतूनच भाडवलशाहींतील आर्थिक व्यवहारांत संपत्तीचें उत्पादन व विभजन या दोन क्षेत्रांत एक मूलभूत स्वरूपाचा विरोध तयार झाला आहे आणि तो भांडवलशाहीवरील अनर्थपरंपरेला कारणीभूत झाला आहे असें मार्क्सनें सप्रमाण दाखवून दिलें. या मूलग्राही विरोधाच्या बुडाशीं उत्पादनाच्या हेतूचा संबंध येऊन पोंचतो. वास्तविक संपत्तीच्या उत्पादनसाधनावर खाजगी मालकी तरी कशासाठीं ठेवावयाची ? तर त्या साधनाचा उपयोग करून त्यांतून निर्माण झालेल्या संपत्तीचा उपभोग घेण्याचा हक्क आपणाकडे रहावा यासाठींच ना ? वैयक्तिक उत्पादनपद्धतींत या मालकी हक्काच्या जोरावर शिलकी धन तीच व्यक्ति घेत असे याचें कारण तें शिलकी धन त्याच व्यक्तीच्या श्रमानें तयार झालेलें असे. या सामुदायिक उत्पादनपद्धतींत हा जमाना बदलला. यंत्राच्या साहाय्यानें तयार झालेल्या संपत्तीपैकीं कच्चा माल व यंत्रसामुग्रीची झीज वजा करतां उरलेल्या संपत्तीचें वाटप कोणत्या तत्त्वावर करावयाचें हा प्रश्न या ठिकाणीं उपस्थित होतो. जुनें खाजगी मालकीचें तत्त्व या वाटपाला लागू करतां येईल काय ? कारण त्या तत्त्वा-

बरोबर संपत्ति निर्माण करण्याचे श्रमहि तेथें खर्च केले जात होते. या उत्पादनपद्धतींत श्रम समुदायाचे व मालकी एकाची अशी विभागणी पडली. तथापि त्या एकाच्या मालकी हक्कामुळें उत्पादनसाधनाचा वापर कोणत्या हेतूनें करावयाचा हें अगोदरच ठरल्याकारणानें ती वाटणी संपत्ति निर्माण करावयाला लागणाऱ्या श्रमाच्या तत्त्वावर न होतां नफ्याच्या हेतूनें होऊं लागली. त्यामुळें साहजिकच नफा व श्रमाचा मोबदला यांचें व्यस्त प्रमाण पडूं लागलें आणि त्याचें कारण नफ्याचें प्रमाण वाढल्यास फिरून भांडवलाची वाढ करतां येऊन संपत्ति आणखी वाढवितां येईल व पुढील खेपेस नफ्याचें प्रमाण अधिक वाढेल ही भांडवलदाराची हाव होय. अशा रीतीनें उत्पादन सामुदायिक पद्धतीनें होतें तर संपत्तीची विभागणी जुन्याच वैयक्तिक मालकीच्या तत्त्वावर होत असते असें भांडवलशाहीच्या अर्थव्यवस्थेंत कोणासहि दिसून येईल. याचा परिणाम काय होणार हेंहि त्याबरोबरच स्पष्ट आहे. या विरोधामुळें संपत्तीच्या उत्पादनाची वाढ समाजांतील मोठ्या गटाच्या वाढत्या दारिद्र्यावर बसलेली आहे. उत्पन्न झालेल्या संपत्तीची विषम वाटणी हा भांडवलशाहींतील अर्थव्यवहाराचा एक अटळ परिणाम आहे आणि यासाठींच बर्नार्ड शॉ म्हणतो कीं इंग्लडमधील ९/१० संपत्ति १/१० लोकांच्या खिशांत जाते व १/१० संपत्ति मात्र ९/१० जनतेच्या वाट्याला येते. भांडवलशाहींतील सारी अनर्थांची मालिका या मूलभूत विरोधांतून तयार झालेली आहे ही मार्क्सवादाची भांडवलशाहीवर मूलभूत टीका आहे.

### भांडवलशाहींतील दुष्टचक्र

याच विरोधांतून भांडवलशाहींतील पुढील दुष्टचक्र निर्माण कसें होतें हें पाहाण्यासारखें आहे. या दुष्टचक्राच्या सोयीसाठीं एका कापडाच्या कारखान्याचेंच उदाहरण घेऊं. त्याचबरोबर अशीहि कल्पना करूं कीं या कारखान्यांत राबणारे २००० मजूर व १ मालक इतकाच आपला समाज आहे. आतां काय परिस्थिति होते तें पहा. पहिल्या वर्षीं एक लाखाचें भांडवल गुंतविलें गेलें. त्यामध्यें कच्चा माल, यंत्राची झीज इ. खर्च वजा जातां वट्ट उत्पन्न सालअखेर जर २ लाखांचें आलें अशी कल्पना केली तर त्याची विभागणी २००० मजुरांना मजुरी

कमी देऊन आपलें नफ्याचें प्रमाण वाढवावें याच हेतूनें होणार. समजा, दोन लाखांपैकीं १ लाख मजुरीपायीं दिले गेले तर उरलेले एक लाख फिरून भांडवलांत जमा होणार. तेव्हां पुढील वर्षी भांडवल २ लाखांचें झालें. अनेक गुंतागुंतीच्या प्रश्नांना बाजूस सारून असें आपण गृहीत धरूं कीं २ लाख भांडवलाच्या साहाय्यानें ४ लाखांचें वट्ट उत्पन्न झालें. आतां त्याची वाटणी पूर्वी २ लाखास १ लाख या हिशेबाप्रमाणें ४ लाखास २ लाख अशी होईल काय ? या प्रश्नाचें उत्तर आपणांस नकारात्मकच द्यावें लागेल. यापैकीं जर गतवर्षापेक्षां अधिक टक्के नफा सुटला नाहीं तर कारखाना चालविण्यांत हशील काय हा कारखानदाराचा स्वतःच्या मनाशीं सतत प्रश्न उभा असतो. तेव्हां या वर्षी २॥ लाख १॥ लाख अशी विभागणी झाली तरच एक लाख जादा भाडवल गुंतविल्याचें सार्थक झालें. आणि याच हिशोबानें प्रत्येक वर्षी संपत्तीचें उत्पादन व नफ्याचें प्रमाण वाढत जातें.

मग यांत बांधा कोठें येत असतो अथवा येऊं शकेल ? यांत बांधा गिऱ्हाइकीचा आहे. भाडवलदारी उत्पादनपद्धतींत संपत्ति विनिमयाकरितां तयार होत असते हें मागें सांगितलेंच आहे. माल बाजारांत खपला तर नफा; गुदामांत कापडाचे गठ्ठे पडले तर त्याचा काय उपयोग ? तेव्हां नफा अधिक होण्यासाठीं बाजारांत अधिक माल खपला पाहिजे आणि बाजारांत माल अधिकाधिक खपण्यासाठीं गिऱ्हाईक सतत वाढत राहिलें पाहिजे. गिऱ्हाईक वाढत राहिलें पाहिजे तर त्याच्या खिशांत माल विकत घेण्याची ताकद आली पाहिजे. अर्थशास्त्राच्या परिभाषेंत बोलावयाचें तर त्यांची क्रयशक्ति वाढली पाहिजे. पण गिऱ्हाईक म्हणजे तरी कोण ? २००० मजूर व एक मालक यांचाच समाज आहे अशी कल्पना केली तर त्यांत उघड दिसणारी गोष्ट ही आहे कीं २००० लोक हेच त्या मालाचें गिऱ्हाईक; एक मालक नव्हे. तेव्हां त्यांनीं अधिकाधिक प्रमाणांत माल खरीदावा यासाठीं त्यांची क्रयशक्ति (purchasing power) वाढत राहिली पाहिजे आणि तशी ती वाढावी याकरितां त्यांच्या श्रमाचा मोबदला वाढत्या प्रमाणावर त्यांना मिळत गेला पाहिजे. कारण क्रयशक्ति वाढविण्याचा त्यांना तोच एक राजरोस मार्ग आहे. नेमके या ठिकाणींच भांडवलशाहीचें बिनसतें. क्रयशक्ति वाढविण्यासाठीं २००० लोकांना अधिक वेतन द्यावें तर नफ्याच्या प्रमा-

णाला कात्री बसते आणि नफ्याच्या प्रमाणाला धक्का लावायचा नाहीं, उलट तें एकसारखें वाढत गेलें पाहिजे असें म्हटलें तर या दोन हजारांच्या क्रय-शक्तीला धक्का लावावा लागतो व अखेर मालाचें गिऱ्हाईक तुटत जातें. हा जो एक कारखान्याचा हिशोब आपण मांडला तोच सबंध भांडवलशाहीला लागू करण्यास हरकत नाहीं.

या अगदीं सामान्य विवेचनावरून भांडवलशाही कोणत्या दुष्टचक्राच्या भोवऱ्यांत गटंगळ्या खात आहे याचें स्पष्ट ज्ञान होण्यास हरकत नाहीं. ज्या प्रमाणांत संपत्तीचें उत्पादन वाढत जातें त्याच प्रमाणांत त्या समाजाची संपत्तीचा उपभोग घेण्याची ताकद कमी केली जाते. उत्पादनाचें क्षेत्र जसजसें रुंदावत जातें तसतशी बाजारपेठ आकुंचित होते. कारण संपत्तीच्या उत्पादनाची प्रेरक शक्ति नफा आहे. तो वाढविण्यासाठीं जनता उत्तरोत्तर दरिद्री होत जाणें अपरिहार्यच आहे. पण वाढत्या प्रमाणावर पसरणारें दारिद्रय अखेर बाजारपेठच इतकी गच्च आवळून टाकतें कीं त्याचा परिणाम नफ्यावर झाल्याशिवाय रहात नाहीं आणि अखेर सबंध उत्पादनाचें यंत्रच्या यंत्र बंद पडण्याचा प्रसंग येतो. मार्क्सच्या शास्त्रीय मीमांसेच्या दृष्टिकोनांतून भांडवलशाहींतील आर्थिक मंदी, बेकारी, व महायुद्धें यांची अनर्थपरंपरा या दुष्टचक्रामधून झालेली आहे. हें दुष्टचक्र संपत्तीचें उत्पादन व विभजन यांमधील विरोधांतून तयार झालेलें आहे व तो मूलभूत विरोध नष्ट करावयाचा असेल तर नफा व खाजगी मालमत्ता या दोन तत्त्वांना बाजूस सारून त्या ठिकाणीं समाजाच्या गरजा भागविण्यासाठीं संपत्तीचें उत्पादन ( mass production for cummunity consumption ) व खाजगी मालकी हक्काच्या ठिकाणीं सरकारी मालकी या दोन तत्त्वांची प्राणप्रतिष्ठा करणें आवश्यक आहे.

या धांवत्या विवेचनावरून मार्क्सच्या तत्त्वज्ञानांत भांडवलशाहींतील आर्थिक बेबंदशाही तिच्या मूलभूत तत्त्वापासून तयार झाली आहे असें दाखविण्यांत आलेलें स्पष्ट दिसून येईल. आर्थिक बेबंदशाहीमधूनच जनतेचें दारिद्य निर्माण झालें आहे; आणि तें दारिद्य नष्ट करण्यासाठीं आर्थिक योजना हवी असेल तर या बेबंदशाहीचीं कारणें आपणास नष्ट केलीं पाहिजेत. पण भांडवलशाहीचीं मूलतत्त्वें कायम राखून आपणास हें अराजक घालवतां येईल काय ?

मार्क्सचें त्याला 'नाहीं' असें स्पष्ट उत्तर आहे. तेव्हां आर्थिक योजनेची कल्पना भांडवलशाही अर्थव्यवस्थेला विरोधी स्वरूपांत प्रथम जन्म पावली हा सिद्धान्त आपण मान्य केला पाहिजे. मार्क्स व नंतरच्या समाजवाद्यांनीं आर्थिक योजनेच्या कल्पनेचा पुरस्कार करतांना भांडवलदार अर्थव्यवस्थेचे परिणाम त्यांच्या नजरेसमोर होते. ते दुष्परिणाम टाळावयाचे असल्यास भांडवलशाही ज्या मूलभूत तत्त्वावर आधारलेली तीं तत्त्वेंच मुळांत बदलण्याची गरज आहे असें त्यांना दिसून आलें. ज्या तत्त्वांची प्राणप्रतिष्ठा करणें त्याच्या मतानें इष्ट होतें तीं प्रामुख्यानें तीन होतीं. (१) संपत्तीच्या उत्पादनाचा हेतु बदलणें. (२) उत्पादनाच्या साधनांवरील खाजगी मालकीचें तत्त्व काढून त्या ठिकाणीं सरकारची मालकी स्थापन करणें आणि (३) राज्यसत्ता ज्या वर्गाच्या हातांत आर्थिक सत्ता असते त्याच वर्गाच्या हातांत राहाते यासाठीं भांडवलदार राज्यसत्ता बदलून जनतेच्या हातांत परिणामकारक राज्यसत्ता जाईल असें सरकार स्थापन करणें. कारण समाजांतील उत्पादनाच्या साधनावर सरकारची मालकी (state control) स्थापन व्हावी असें म्हणतांना त्या सरकारामार्फत जनतेची मालकी त्यावर प्रस्थापित व्हावी असाच त्यांच्या टीकेचा आशय होता व यासाठीं सरकारची मालकी उत्पादन-साधनांवर असावी असें सांगतांना सरकारवर समाजाची मालकी असावी हा त्यांचा आग्रह योग्यच होता.

## दोन प्रकारच्या योजना

भांडवलशाहीच्या मूलभूत तत्त्वांत बदल केल्याशिवाय आर्थिक योजना अमलांत येऊं शकत नाहीं या गोष्टीवर या ठिकाणीं भर देण्याचें कारण गेल्या महायुद्धानंतर भांडवलदार समाजाची चौकट कायम ठेवून आर्थिक योजना आखण्याचा प्रयत्न करण्यांत आला. साहजिकच आज आपणांपुढें आर्थिक योजनेचे दोन प्रकार विचाराकरितां पुढें आलेले आहेत. ज्या दोन देशांत या दोन प्रकारच्या योजना व्यवहारांत उतरविण्याचा प्रयोग करण्यांत आला ते दोन देश म्हणजे सोव्हिएट रशिया व नाझी जर्मनी. आर्थिक योजनेची प्रारंभीं जी व्याख्या दिली आहे ती या दोनहि योजनांना लागू पडण्यासारखी आहे. एका मध्यवर्ति सत्तेकडून संपत्तीच्या उत्पादनाचें

नियंत्रण केलें जातें व त्यासाठीं देशांतील आर्थिक परिस्थितीचा आढावाहि त्या त्या देशांतील सरकार घेत असतें. असें असतांहि या दोन योजनांचे परिणाम मात्र परस्परांना विरोधी झाल्याचे आपणांस आढळतात. यासाठीं ज्या अर्थशास्त्रज्ञांनीं प्रथम योजनेचा पुरस्कार केला त्यांच्या मनांत कोणता अभिप्राय होता अथवा त्यांना मान्य असलेल्या योजनेचें ध्येय, स्वरूप व तीमधील तत्त्वें कोणतीं याचा येथवर प्रपंच करणें भाग पडलें. कारण दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळांत अर्थशास्त्रीय विचारांमध्यें आर्थिक योजनेविषयीं बराच घोटाळा उडालेला दिसतो. आर्थिक योजना आली कीं आजचीं आर्थिक व सामाजिक दुःखें धुक्याप्रमाणें विरून जातील असा एक सर्वसाधारण समज झालेला आहे. या समजाचें निराकरण करण्यासाठीं ज्या तत्त्ववेत्त्यानें प्रथम योजनेचा पुरस्कार केला त्याच्या मनांत काय अर्थ होता ही गोष्ट निश्चित करणें जरूरीचें होतें. त्या दृष्टीनें विचार करतांना आपणांस असें आढळलें कीं मार्क्स व नंतरचे समाजवादी यांच्या विचारांत भांडवलशाहीच्या शास्त्रीय टीकेला प्राधान्य होतें. भांडवलशाहीचें शास्त्रीय पृथक्करण करतांना मार्क्सनें असें सिद्ध केलें कीं, ज्याला आर्थिक अराजक असें म्हणतां येईल तें अराजक भांडवलशाहीच्या मूलभूत तत्त्वांमधूनच निर्माण झालें आहे. जर या अराजकाच्या कचाट्यांतून समाजाला सोडवून आर्थिक विकासाचा मार्ग गांठावयाचा असेल तर तीं तत्त्वें बदलण्याची गरज आहे आणि नवीन तत्त्वांवर समाजाचें आर्थिक जीवन संघटित करणें आवश्यक आहे. अर्थात् नफा, खाजगी मालकी, खुली स्पर्धा इ० तत्त्वांवर चाललेले भांडवलशाहींतील आर्थिक व्यवहार नवीन तत्त्वांवर संघटित करावयाचे म्हणजे समाजाच्या गरजा भागविण्याच्या दृष्टीनें ते योजनाबद्ध असले पाहिजेत असा साहजिकच त्यांतून निष्कर्ष निघतो. यावरून मार्क्सला मान्य होणारी आर्थिक योजनेची कल्पना विशिष्ट प्रकारची होती हें उघड आहे. भांडवलशाहीची चौकट कायम ठेवून योजना आल्यास ती त्याच्या विचारसरणीला विरुद्ध आहे. यासाठीं योजना हा कांहीं आजच्या आर्थिक दुःस्थितीवर उपाय नाहीं. योजनेयोजनेमध्यें फरक असूं शकतो, नव्हे त्यांमध्यें विरोधहि असूं शकतो. यासाठीं आर्थिक योजनेची घोषणा ऐकतांच भांबावून न जातां 'कोणत्या प्रकारची योजना', 'तिचें ध्येय काय?',

'तीमधील मूलभूत तत्त्वें कोणतीं' हे प्रश्न आपल्या मनाशीं उपास्थित केले पाहिजेत.

ज्या वेळेस समाजवाद्यांकडून भांडवलशाहींतील आर्थिक दुष्परिणामावर टीका होऊं लागली आणि विशेषतः मार्क्सनें भांडवलशाहीचें आर्थिक भवितव्य काय होईल याचें दिग्दर्शन केलें त्या वेळीं भांडवलशाहीची वाढ होत होती. भांडवलदारवर्ग स्वतःच्या विकासाबरोबर सबंध समाजाचा विकासहि थोड्याबहुत प्रमाणांत साधूं शकत होता. भांडवलशाहीचें हें पुरोगामी कार्य मार्क्सनें मान्य केलेलें आहे. मागासलेल्या साधनांवर उपजीविका करणाऱ्या सरंजामशाहीपेक्षां खुल्या स्पर्धेनें चालणाऱ्या भांडवलशाहीनें सबंध समाजाचें रहाणीचें मान वाढविलें ही गोष्ट कोणासहि मान्य होण्यासारखी आहे आणि भांडवलशाहींत आपला थोडाफार विकास होऊं शकतो याचा अनुभव आला म्हणूनच सामान्य जनतेनें सरंजामशाही उखडून टाकण्यासाठीं भांडवलदारांना साहाय्य केलें. पण भांडवलशाहीनें हें जें प्रगतिपर कार्य केलें त्याचें स्वरूप **सापेक्ष** होतें हेंहि त्याचबरोबर लक्षांत घेणें आवश्यक आहे. सरंजामशाहीच्या अपेक्षेनें भांडवलशाहीनें एकदोन पाउलें पुढें टाकलीं ही गोष्ट मान्य करून देखील मानवी समाजाच्या विकासाचा भाडवलशाही हा अखेरचा टप्पा नाहीं हें सांगण्यास कोणतींच अडचण नव्हती. ज्याप्रमाणें मागच्या सरंजामशाहींत मूलभूत विरोध होते त्याचप्रमाणें भांडवलशाहींतहि अंतर्विरोध आहेत आणि ती जोंपर्यंत वाढत आहे तोंपर्यंत तो विरोध दिसून आला नाहीं तरी भांडवलशाहीची वाढ थांबल्यानंतर या विरोधाचे परिणाम जाणवल्याशिवाय रहाणार नाहींत हा सावधगिरीचा इषारा मार्क्सनें त्यावेळींच दिला होता.

खुद्द मार्क्सनें आपली टीका एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत लिहिली. त्या वेळीं भांडवलशाहीचें साम्राज्यवादांत रूपांतर होण्यास प्रारंभ झाला होता. तथापि त्या वेळीं देखील आर्थिक मंदी, बेकारी इ० परिणामांची झळ समाजाला जाणवण्यास सुरुवात झाली होती. भांडवलदारांना साम्राज्याची हांव धरण्याचें कारण देखील हे परिणामच होत. जीं सुखस्वप्नें रंगविलीं गेलीं तशीं तीं वस्तुस्थितींत कधींच आलीं नाहींत; उलटपक्षीं, इंग्लंड, फ्रान्स इ० भांडवलदार राष्ट्रांच्या इतिहासांत तो काळ असा होता कीं त्या त्या राष्ट्रांतील आर्थिक जीवनांत मंदीचा पेचप्रसंग निर्माण झालेला होता. एक-

सारखी भरभराट होण्याऐवजीं राष्ट्रांतील आर्थिक जीवनाला दर दहा वर्षांनीं आर्थिक मंदीचे आचके बसतच होते आणि एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाला सर्व राष्ट्रीय बाजारपेठ एकदम मंदावल्याचा देखावा दिसूं लागला. विपुल संपत्ति असून भुकेनें पोट खालीं बसलेलीं लक्षावधि माणसें रस्तोरस्तीं भटकतात असा परिणाम पाहून या आपत्तींतून बचावाचा मार्ग काढण्यासाठीं साम्राज्याचा मार्ग निघालेला आहे. *

स्मिथपासून रिकार्डोपर्यंतच्या अर्थशास्त्रीय विचारांत भांडवलशाहींत आर्थिक मंदी, बेकारी अथवा दारिद्य यांची आपत्ति ओढवेल याची फारशी जाणीव नव्हती. उलटपक्षीं भांडवलशाहीच्या त्या वाढीच्या काळांत हें एक सुवर्णयुग (millenium) अवतरलें आहे अशी पर्यायानें दवंडी पिटवण्यास त्यांनीं सुरुवात केलेली आपणांस आढळेल. आतांपर्यंत मानव समाज ज्या ज्या अवस्थेंतून गेला त्या त्या अवस्था टाकाऊ होत्या, पण आतां मात्र वैयक्तिक साहस, खुली स्पर्धा, इ. तत्त्वांवर चालू झालेली अर्थव्यवस्था समाजाच्या विकासास पोषक आहे असें सांगण्याकडे त्यांच्या विचाराचा रोख होता. याच हेतूनें स्मिथनें टांचणीचें उदाहरण देऊन भांडवलशाहींतील श्रमविभागाची तरफदारी केली. याच कारणास्तव रिकार्डोनें आपल्या

---

* भांडवलशाहींतिल या अनर्थांची जाणीव व साम्राज्यवादाचा तोडगा या दोनहि गोष्टी खुद्द भांडवलदारांसच सुचलेल्या आहेत हें लेनिननें आपल्या 'साम्राज्यवाद' ग्रंथांत सेसिल ऱ्होडस् यांची मुलाखत प्रसिद्ध केली आहे तीवरून स्पष्ट दिसतें :— " ... Yesterday I was in the East End at an unemployed meeting, I heard inflammatory speeches. But they all echoed one cry; " we want bread! we want bread! "; I thought about this on the way home, and I became more and more convinced of the importance of imperialism ..... In order to save 40,000,000 inhabitants of United Kingdom from a bloody civil war, we colonial statesmen must take possession of new lands suitable for peopling by the surplus population of this country, when we shall be able to find new markets for the goods produced in our factories and mines. The Empire, as I have always said, is a question of the belley. If you want to avoid civil war, you must become an imperialist. "

—Imperialism by Lenin : (Page 91.

सिद्धान्ताच्या जोरावर मागच्या सरंजामशाहीवर जोराचा हल्ला चढविला होता. अर्थात् या अर्थव्यवस्थेमधूनच सर्व उत्पादनाचें गाडें कधीं काळीं बंद पडेल, आर्थिक भरभराटीऐवजीं दारिद्य वाढेल इ. दुष्परिणाम जर त्यांना कोणी सांगितले असते तर त्यांनीं ते मान्य केले नसते हें सांगण्याची गरज नाहीं. भांडवलशाहींत अराजक आहे, आर्थिक मंदीच्या भोंवऱ्यांत ती सांपडूं शकते इत्यादि गोष्टींचा विचार करण्यास देखील ते रिकामे नव्हते. जुन्या विस्कळित समाजाला एकत्र आणण्याचें काम भांडवलदार वर्ग त्या वेळीं झपाट्यानें करीत होता; व त्याच्या या क्रांतिकारक कार्यांतून त्याला साजेसेच अर्थशास्त्रीय विचार त्या वेळीं मांडले गेले.

पण एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाला हे परिणाम जाणवतील इतके स्पष्ट दिसूं लागले. दर दहा वर्षांनीं आर्थिक मंदीचा एक धक्का नियमानें बसूं लागला इतकेंच नव्हे तर प्रत्येक राष्ट्रांतील उत्पादनाचें गाडें अमर्याद कालपर्यंत बंद ठेवावें लागतें कीं काय अशी भीतिहि निर्माण झाली. सपाटून संपत्ति निर्मावी व त्या संपत्तीचा यथेच्छ उपभोग घ्यावा ही आशा विफल झाली. आणि त्याऐवजीं संपत्तिशेजारीं दारिद्य असा विरोध मात्र दृष्टीस पडूं लागला. अशा रीतीनें प्रत्यक्ष परिणाम दिसूं लागल्यानंतर आणि विशेषतः ते जाणवूं लागल्यानंतर केवळ जुन्या आशावादानें त्याचें समर्थन होणें शक्य नव्हतें. समर्थन करणें तर भाग होतें, नाहीं तर भांडवलशाहींतील मूलभूत तत्त्वें बदलून आर्थिक योजना पतकरा हा समाजवाद्यांचा ससेमिरा चुकविणें शक्य नव्हतें. या परिस्थितींत एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत भांडवलशाहीच्या समर्थकांनीं एक नवाच पवित्रा घेतला आणि समर्थनास सुरुवात केली असें आपणास दिसून येईल. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, आर्थिक मंदी, बेकारी किंवा दारिद्य ही जी अनर्थपरंपरा आपण पाहात आहोंत ती कांहीं भांडवलदार उत्पादनपद्धतींतून तयार झालेली नाहीं. वास्तविक उत्पादनाचें हें यंत्र मुळांत निर्दोष आहे. पण कोणत्याहि यंत्रांत जसा एखादा स्क्रू, बोलट गंजला अथवा निसटला तर तें यंत्र बरोबर काम देत नाहीं; केव्हां केव्हां तें बंद पडतें त्याचप्रमाणें कांहीं नैमित्तिक कारणांनीं भांडवलशाहीमध्यें हे दोष निर्माण झाले आहेत; ते भांडवलशाहीचे समाजवादी म्हणतात त्याप्रमाणें अपरिहार्य असे परिणाम नाहींत. तीं आगंतुक

कारणें नष्ट केलीं तर हे दोष आपोआप नष्ट होतील; त्यासाठीं भांडवलशाही बदलण्याचें कांहींच कारण नाहीं.

या समर्थकांची मजल याच्याहीपुढें एक पाऊल गेली. केवळ भांडवलशाहीचें समर्थन करूनच ते थांबले नाहींत, तर समाजवाद्यांच्या आर्थिक योजनेच्या कल्पनेवर त्यांनीं फार जोराचा हल्ला करण्यास सुरुवात केली. आर्थिक योजनेवर त्यांचा मुख्य आक्षेप असा कीं ही कल्पनाच मुळांत अव्यवहार्य आहे. आर्थिक योजना अमलांत आणावयाची तर मानवी गरजांचें यथायोग्य मोजमाप आपणांस अगोदर घेतलें पाहिजे. पण असें मोजमाप घेण्याचें आपणांजवळ साधन काय आहे? आणि तसें साधन नसलें तर आपण संपत्तीच्या उत्पादनाची योजना आंखणार तरी कशी? भांडवलशाहींत मागणी व पुरवठा यांच्या नियमानुसार खुल्या बाजारपेठेंत होणारे किंमतींचे चढ-उतार हें एक असें साधन आहे कीं त्यामुळें मागणी व पुरवठा यांचा आपोआप मेळ बसतो. संपत्तीचें उत्पादन करतांना या किंमतीच्या सरासरीकडे लक्ष ठेवलें म्हणजे झालें. जर या सरासरीवरून बांधलेला अंदाज चुकला तर नुकसान फक्त एकाच व्यक्तीचें किंवा एकाच कारखान्याचें होईल. पण, ज्या वेळीं सर्व समाजांतील संपत्तीचें उत्पादन आपण नियोजित करतों त्या वेळीं जर चुका झाल्या तर त्याचे परिणाम सबंध समाजाला भोगावे लागतील. यासाठीं कितीहि दोष असले तरी मागणी व पुरवठा, स्पर्धा व बाजारभावांतील अंदाज याशिवाय संपत्तीचें उत्पादन करण्याची कोणतीच व्यवहार्य पद्धति आपणांजवळ नसल्याकारणानें तीच आपणांस स्वीकारली पाहिजे. उगाच आर्थिक योजनेच्या मृगजळापाठीमागें आशाळभूतपणानें धांवण्यांत कांहीं हशील नाहीं.

योजनाबद्ध आर्थिक व्यवहार असावेत यावर होणारी अशा पद्धतीची टीका गेल्या महायुद्धानंतर लंगडी पडूं लागली. याचें कारण १९१७ सालीं जगाच्या एकषष्ठांश भागावर समाजवाद्यांनीं दाखविलेल्या दिशेनें आर्थिक योजनेचा मोठ्या प्रमाणांत प्रयोग सुरू झाला. अव्यवहार्यतेचा आरोप प्रत्यक्ष व्यवहारांत योजना आल्यानंतर टिकणें शक्य नव्हतें. जें दिसतें तें नाकारण्यांत कांहींच हशील नव्हतें; नाकारलें असतें तरी कोणी मानलें नसतें. अर्थात् जुन्या जगाच्या समर्थकांनीं योजनेवर केलेली टीका गेल्या पंचवीस वर्षांत

निरनिराळ्या अवस्थांमधून गेलेली आपणास दिसेल. प्रथम हा प्रयोग अयशस्वीच होणार असें हमखास भाकित प्रत्येकाकडून वर्तविलें जात होतें. आज ना उद्यां ज्या समाजवादाच्या दिशेनें रशियन समाज जाऊं इच्छितो ती दिशा लवकरच त्याला टाकावी लागणार आणि एक दिवस असा उगवेल कीं भांडवलदार अर्थव्यवस्थेशिवाय त्या समाजाला तरणोपाय रहाणार नाहीं. १९२४ सालीं ' The Observer ' या साप्ताहिकांत जे. एल्. गार्व्हिन या लेखकानें रशियाविषयीं पुढीलप्रमाणें भाकित सांगितलें होतें. तो म्हणतो, " सध्यांची पद्धति टिकवून धरणें शक्य नाहीं. आणखी कांहीं वर्षें केवळ नांवाला सध्यांचें सरकार असलें तरी सोव्हिएट रशिया हें भांडवलदारांचें राज्य बनणारच. " (" The existing system cannot be maintained. Soviet Russia, whatever may be its nominal system of Government a few years hence, is bound to become a capitalist state. " –J. L. Garvin, The Observer, December 28 th, 1924.) अर्थात् रशियन प्रयोग कोलमडणार हें भाकित किंवा ही वेडी आशा त्या प्रयोगाच्या अद्भुततेमुळेंच निर्माण झाली. कित्येक शतकें भांडवलदार अर्थव्यवहाराखेरीज दुसरा प्रयोग न पाहिल्याकारणानें; ज्या ज्या समाजवाद्यांनीं असे प्रयोग केले त्यांचे त्यांचे प्रयोग अयशस्वी झाल्याचे दाखले असल्याकारणानें, एवढा मोठा प्रयोग यशस्वी होऊं शकेल ही कल्पना करणें देखील अशक्य होतें. रशियन समाजाच्या प्रयोगाच्या अस्तित्वानेंच अर्थशास्त्रातील सांप्रदायिक विचारांना जबरदस्त धक्का दिला गेला आणि त्या आघाताच्या पहिल्या भरांत ' छे ! छे ! ' असें होणें शक्य नाहीं ही प्रतिक्रिया साहजिकच जन्म पावली.

आश्चर्याचा पहिला भर ओसरल्यानंतर, ' अयशस्वी होणार ' या भाकिताचीं आठनऊ वर्षें वाट पाहिल्यानंतर, हा योजनाबद्ध आर्थिक व्यवहार टिकूं शकतो किंवा दीर्घ काळपर्यंत टिकूं शकेल ही गोष्ट यांना मान्यच करावी लागली. १९२७ च्या मार्च महिन्यांत लंडनमधील इकॉनॉमिस्ट या साप्ताहिकानें जी रशियन पुरवणी प्रसिद्ध केली तीमध्यें रशियांतील अर्थव्यवस्थेविषयीं खालील उद्गार काढले आहेत. " नऊ वर्षांनंतर उद्योगधंदे व व्यापार यांचें राष्ट्रीयकरण करण्याची मूळची सोव्हिएट पद्धति अद्यापि शाबूत आहे. या तत्त्वामध्यें पुष्कळ वेळां फेरबदल केले असले तरी सापेक्षतेनें

ते कमी महत्त्वाचे आहेत. राष्ट्रीयकरणाच्या प्रश्नावर सोव्हिएटची भूमिका दुबळी झालेली दिसत नाहीं. परकीयांना भांडवलशाहीपुढें जी माघार फार मोठी वाटेल तशी माघार रशियांत फारच थोडी आढळते. मोठ्या उद्योगधंद्यावर सरकारचें वर्चस्व फारच मोठें आहे." (" After nine years the original Soviet system of nationalised industry and trade remains almost intact. Departures from nationalisation have been, though fairly numerous, relatively unimportant. Nothing like a weakening of principle on the nationalisation question has taken place. The retreats .before capitalism which seem very considerable to foreigners appear to be very small within Russia. The predominance of the state in big industry is very great " The Economist, Russian supplement, March 19 th, 1927 ) रशियांतील हा योजनाबद्ध आर्थिक व्यवहार टिकणार इतकीच जाणीव झाली, असें नव्हे तर पहिली पंचवार्षिक योजना पुरी झाल्यानंतर या प्रयोगाच्या ठिकाणीं समाजाचा विकास करण्याची ताकद आहे हेंहि स्पष्ट व भडक रीतीनें दिसून आलें. याच्या उलट ज्या भांडवलदार जगाची आपण आजपर्यंत तरफदारी करीत आलों तें एकसारखें घसरगुंडीला लागलें आहे याचीहि अत्यंत तीव्र स्वरूपांत जाणीव होऊं लागली आणि येथूनच समाजवाद्यांप्रमाणेंच भांडवलदार अर्थव्यवहाराचे पुरस्कर्ते व मुत्सद्दी आर्थिक योजनेची भाषा बोलूं लागले. व्यक्तीच्या औद्योगिक हालचालींवर नियंत्रण घालणारी कोणतीहि योजना समाजाला विघातक आहे या विचाराचा अट्टाहासानें उदोउदो करणाऱ्या स्मिथ आदिकरून पंडितांच्या अर्थशास्त्रीय विचारानें अखेर गेल्या महायुद्धानंतर व्यक्तीच्या स्वैरसंचाराला आळा घालणारी योजना हवी असें आग्रहानें सांगण्यापर्यंत मजल मारली. हें विचारांतील मन्वंतर होण्याचें रहस्य काय ?

## दोन जगाच्या दोन गरजा

गेल्या महायुद्धानंतर भांडवलदार जगाला आर्थिक योजनेची गरज भासण्याचें कारण त्या जगाला भेडसावणारी आर्थिक कोंडीच होय. १९१८ नंतर भांडवलदार अर्थव्यवस्था निश्चित रीत्या घसरगुंडीला लागली होती.

१९१८ पासून ज्या प्रकारची उतरती कळा भांडवलदार अर्थव्यवस्थेला लागली तशी पूर्वी कधींहि स्थिति आलेली नव्हती. हें खरें कीं, त्यापूर्वी-देखील आर्थिक मंदीचे तडाके भांडवलशाहीला बसत असत. पण दर दहा-वर्षांनीं येणाऱ्या मंदीचे तडाखे सोसूनहि संपत्तीचें उत्पादन सारखें वाढतच होतें. राष्ट्रसंघानें १९३२ सालीं प्रसिद्ध केलेल्या जगाच्या आर्थिक अहवालावरून १८६० ते १९१३ पर्यंत प्राथमिक वस्तूंचें उत्पादन चौपट ते पांचपट वाढल्याचें दिसून येतें. आणि कारखान्यांतील पक्क्या मालाचें उत्पादन सहापटीच्या वर वाढल्याचें त्याच अहवालांतील आंकडे सांगतात. पण १९१४ नंतर जगांतील संपत्तीच्या उत्पादनांत वास्तविक याच गतीनें वाढ झाली असती तर तो अहवाल लिहितो कीं १९३२ सालीं जितकी संपत्ति तयार झाली त्याच्या दुप्पट किंवा तिप्पट निर्माण व्हावयास हवी होती. पण वस्तुस्थिति असें दाखविते कीं पक्क्या मालाचें उत्पादन १९१३ पेक्षांहि खालीं गेलें.* संपत्तीच्या उत्पादनांतील ही घट याच्यापूर्वी केव्हांहि झाली नव्हती असेंहि त्या अहवालांत नमूद केलें आहे.

संपत्तीच्या उत्पादनांत एकीकडे घट होत असतांना त्याचबरोबर दुसरी-

---

* " If the line of trend from 1860 to 1913 is extended to 1932' the rather startling conclusion is reached that the index of world production, on the hypothesis that nothing had occured to alter its regular upward trend for the fifty preceding years, would today be rather more than twice as great as it actually is. "

—League of Nation's world economcic survey : 1932-33, P. 32.

याप्रमाणें वस्तुस्थितचिें वर्णन करून अहवालांत झालेली टीकाहि वाचनीय आहे.

" There is no precedent for such a marked decline. Statistical series ranging back to 1860 fail to reveal any previous period in which the decline-in either raw material production or manufactures has been so precipitate or so severe. Independent estimates agree that in 1932 the level of industrial production in the world as a whole fell below that of 1913. "

—Ibid : Page 82.

कडे उत्पादनाच्या साधनांत सारखी वाढ होत होती. संपत्ति मोठ्या प्रमाणावर निर्माण करणाऱ्या यंत्रांत सुधारणा करून त्यांची उत्पादकता वाढत होती तर या कार्यक्षम यंत्रांतून कमी संपत्ति कशी तयार होईल या दिशेनें त्यांचा उपयोग केला जात होता. यावरून १९१८ नंतर जी आर्थिक मंदी भांडवलशाहीला भोवूं लागली तिचें कारण नैसर्गिक नसून सामाजिकच होतें हें उघड दिसतें. गेल्या महायुद्धानंतर भांडवलशाहींत निर्माण झालेला हा विरोधाभास अमेरिकेंतील ' Automobile Engineer ' या मासिकाच्या अंकांत '.मशीन टूल ' या मथळ्याखालीं प्रसिद्ध झालेल्या लेखांत मार्मिक रीतीनें विशद करण्यांत आला आहे. तो लेखक असें म्हणतो कीं, " मि. आर्मिटेज यांच्या विधानाप्रमाणें अमेरिकेंत आज जीं यंत्रें तयार होत आहेत त्यांचा उपयोग अमेरिकेंत किफायतशीर रीत्या होणें शक्य नाहीं असें म्हणण्याची पाळी आली आहे " ( The time has now arrived when Mr. Armitage's remarks may be widened to a statement that the latest machine tools now developed in America cannot even be economically used in the United States. ) या विधानांत भांडवलशाहीच्या आर्थिक पेचप्रसंगाचें मार्मिक वर्णन आपणांस पहावयास मिळेल. विपुल संपत्ति तयार करण्याचीं हत्यारें जवळ असतांना त्यांचा उपयोग करून घेतां येत नाहीं; उलटपक्षीं संपत्तीच्या उत्पादनांत घटच दिसते अशी कृत्रिम घट १९१८ नंतर भांडवलदार उत्पादन पद्धतींतून निर्माण झाली. वास्तविक या साधनांचा भरपूर उपयोग झाला तर जगांतील प्रत्येक व्यक्तीला पुरेसें अन्न, पुरेसें वस्त्र व भरपूर निवाऱ्याची जागा दिवसाकांठीं थोडे श्रम करून मिळूं शकेल इतकी ताकद या यंत्रामध्यें आहे असें तज्ज्ञांचें मत होतें. १९१८ सालीं प्रसिद्ध भांडवलदार लॉर्ड लिव्हरह्यूम यानें प्रत्येक व्यक्ति जर सध्यांच्या उत्पादनसाधनांच्या साहाय्यानें फक्त एक तास काम करील तर प्रत्येकाला अन्न, वस्त्र व घर या गरजा भरपूर प्रमाणांत भागवितां येतील असें स्पष्ट म्हटलें होतें. ( " With the means that science has already placed at our disposal, we might provide for all the wants of each of us in food, shelter and clothing by one hour's work per week for each of us from schoolage to dotage. " —Lord Leverhulme, Preface to Professor Spooneer's wealth from Waste Routledge, 1918. )

तथापि खुद्द अमेरिकेंतील आर्थिक परिस्थिति पाहिली तर असें दिसतें कीं तेथील भांडवलदारांना या यंत्रांचा भरपूर उपयोग करून विपुल धन पैदा करणें अशक्य झालें. १९३१ सालीं अमेरिकेंत १३५७ बुटांच्या कारखान्यांपैकीं फक्त २०० कारखाने जर भरपूर प्रमाणांत व दिवसभर सुरू झाले तर अमेरिकन जनतेला लागणारे बूट २०० कारखानेच पुरवूं शकतील आणि ११५७ कारखाने बंद करण्याचा प्रसंग येईल; यासाठीं सर्व कारखान्यांतलि यंत्रसामुग्री भरपूर प्रमाणांत उपयोगांत आणणें कारखानदारांना इष्ट वाटलें नाहीं किंवा शक्य झालें नाहीं. जी गोष्ट बुटांच्या कारखान्यांची तीच कोळशाच्या खाणींची आणि इतर उद्योगधंद्यांची. आणि स्वतःच्या घरांत ही सुधारलेली यंत्रसामग्री वापरतां येईना म्हणून त्यांना ती रशियाला विकण्याचा प्रसंग आला असेंहि Automobile Engineer या मासिकांतलि लेखकानें नमूद केलें आहे.

## जुन्या जगाचें नवें अर्थशास्त्र

या सर्व गोष्टींवरून गेल्या महायुद्धानंतर भांडवलदार जगाची अर्थव्यवस्था संपूर्णपणें उताराला लागली आहे याची भांडवलदारांना पुरेपूर जाणीव झाली होती. या ऱ्हासकालाचें प्रमुख लक्षण थोडक्यांत असें सांगतां येईल कीं यापुढें भांडवलदार अर्थशास्त्र विपुल संपत्ति निर्माण करावी या ध्येयानें प्रेरित राहिलें नसून संपत्ति कमी करावी हीच दिशा त्यानें पतकरली. विपुलतेचें अर्थशास्त्र (economy of plenty) जाऊन त्याची जागा कृत्रिम तुटवडा निर्माण करण्याच्या अर्थशास्त्रानें (economy of scarcity) घेतली. हा महत्त्वाचा बदल कसा होत गेला याचें दिग्दर्शन वर केलेंच आहे. विपुल संपत्ति पैदा करणारीं साधनें जवळ असतांहि त्यांचा उपयोग त्यांना करतां येईनासा झाला आणि त्यांना तसा उपयोग करतां येईना याचें कारणहि Automobile Engineer या मासिकांतलि वरील लेखकानें सांगितलें आहे. तें कारण म्हणजे यंत्रांचा किफायतशीर उपयोग (economic use). संपत्तीच्या साधनाचा वापर नफ्याच्या हेतूनें करणें हें भांडवलशाहीचें मूलतत्त्व आहे. महायुद्धापूर्वीं या साधनांचा उपयोग करून नफा मिळणें शक्य होतें. कारण, सर्व जगाच्या बाजारपेठा त्यांना गेल्या शतकांत मोकळ्या होत्या. माल भरपूर

तयार करावा व जगाच्या बाजारपेठेंत खपवावा आणि त्यापासून भरपूर नफा मिळवावा, फिरून तो नफा भांडवलाच्या रूपानें यंत्रांत गुंतवून अधिक माल तयार करावा व अधिक नफा मिळवावा असा हा क्रम गेल्या शतकांत अव्याहत चालू होता. पण या शतकाच्या प्रारंभींच या धंद्याला हळुहळू मर्यादा पडूं लागली. कारण सर्व जगाच्या बाजारपेठा एकदां पूर्णपणें व्यापल्यानंतर जागतिक प्रमाणावर मागें सांगितलेलें दुष्टचक्र फिरून सुरू झालें. इंग्लंडमधील कारखानदारांना घरची बाजारपेठ आकुंचित होतांच हिंदुस्थान, चीन, आफ्रिका इ० देशांतील बाजारपेठा मोकळ्या होत्या. त्याच न्यायानें फ्रेंच भांडवलदारांचाहि नव्या बाजारपेठा व्यापण्याचा विक्रम चालूच होता. पण जगांतील सगळ्या बाजारपेठा व्यापल्यानंतर आणि स्पर्धेच्या क्षेत्रांत जर्मनीसारखे नवे देश उतरल्यानंतर जें दुष्टचक्र एकेका राष्ट्रीय बाजारपेठेंत एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत तयार झालें तेंच दुष्टचक्र जगांतील सर्व भांडवलदारांना जागतिक बाजारपेठेंत ( world market ) निर्माण झाल्याची जाणीव तीव्र झाली. पूर्वीं एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत इंग्लंडमधील किंवा फ्रान्समधील भाडवलदारांना स्वतःच्या मायदेशांत किफायतशीर रीतीनें भांडवल गुंतवितां येईना म्हणून परदेशांत भांडवल गुंतवावें लागलें. पण आतां जगांतील सर्व बाजारपेठा अशा रीतीनें आकसल्यानंतर आपला धंदा किफायतशीर कसा राहील ही विवंचना जगांतील सर्व भांडवलदारांना पडूं लागलेली दिसते. आपल्या नफ्याचें मान वाढलें नाहीं तरी टिकवून कसें धरावें हीच त्यांची प्रमुख विवंचना होती आणि या विवंचनेच्या पोटांत नव्या अर्थशास्त्राचा व आर्थिक योजनेचा जन्म झाला आहे.

## जुन्या व नव्या जगाची तुलना

भांडवलदार जगानें किफायतशीर धंदा टिकावा या गरजेंतूनच आर्थिक योजनेची कल्पना स्वीकारली आहे या गोष्टीवर या ठिकाणीं भर द्यावासा वाटतो. कारण या गरजेंतून जन्म पावलेली योजना रशियन योजनेपेक्षां निराळी असण्याचें प्रमुख कारण आमच्या मतें ही गरजच होय. पण जुन्या जगाच्या अर्थशास्त्रीय विचारांत योजनेला महत्त्व येण्याचें आणखी एक

कारण दिसतें आणि तें म्हणजे नव्या जगांतील, सोव्हिएट रशियांतील आर्थिक योजनेचें अपूर्व यश. भांडवलदार अर्थव्यवस्था आणि नियोजित रशियन अर्थव्यवस्था यांची तुलना इतकी विदारक आहे कीं त्यामुळें भांडवलदार अर्थशास्त्रीय विचारांत योजनेला अनुकूल मत झाल्यास त्यांत आश्चर्यकारक असें कांहींच नाहीं.

ज्या वेळेस भांडवलशाहीनें विपुल संपत्ति निर्माण करण्याचें ध्येय सोडून दिलें त्याच वेळेस रशियन समाजानें तें ध्येय पत्करलें असें खालीं दिलेल्या तुलनेवरून स्पष्ट दिसेल. "रशियांतील औद्योगिक उत्पादन् ठोकळ मानानें १९२८ सालीं १५·७ बिलियन रूबल होतें तें १९३२ सालीं ३४·३ बिलियन रूबल झालें. म्हणजे १९१८ च्या उत्पादनापेक्षां २१८.५ टक्के वाढलें. १९१३ सालपेक्षां एकंदर औद्योगिक उत्पादन तिपटीपेक्षां अधिक वाढलें आणि १९२८ सालपेक्षां दुपटीनें अधिक वाढलें."[1] एकंदर उद्योगधंद्यांत गुंतवलेलें भांडवल १९२८ सालीं ७०० कोटी रूबल होतें. पंचवार्षिक योजनेच्या अखेरीस हें भांडवल ८१३ कोटि ४० लक्ष रूबल इतकें वाढलें. म्हणजे भांडवलाची वाढ १२० टक्क्यांनीं झाली."[2] आतां इतर देशांशीं तुलना करतां आपणास असें दिसतें कीं १९२५ते३२ या दरम्यान रशियांतील औद्योगिक उत्पादन (१९२५–२९ या वर्षींचें उत्पादन १०० मानलें तर) ५९ टक्क्यांपासून २४० पर्यंत वाढलें आणि त्याच अवधींत अमेरिकेंतील उत्पादन ९५ टक्क्यांपासून५८ पर्यंत, इंग्लंडधील ९९ पासून ८६ पर्यंत आणि जर्मनींतील ८९ पासून ६६ पर्यंत घटलें. (League of Nations, Production and Prices: 1925–32, P. 49.) संपत्तीच्या उत्पादन–क्षेत्रापासून आपण बेकारीच्या प्रश्नाकडे वळलों तरी आपणांस हीच तफावत आढळेल. सोव्हिएट रशियांतील योजनेची खरी करामत काय असेल तर बेकारी नष्ट करणें हीच होय. १९२५ सालपर्यंत रशियांत २० लक्ष लोक बेकार होते. पण १९२८ सालीं पंचवार्षिक योजनेला प्रारंभ केल्यानंतर हा बेकारांचा आंकडा झपाट्यानें कमी होत गेला आणि १९२९ मध्यें तर बेकारीऐवजीं कामगारांचीच चणचण भासूं

1 Soviet communism Page, 650
2 Ibid " 652

लागली. १९३० च्या ऑक्टोबर महिन्यांत कामगारविभागाच्या कमिसारला फतवा काढावा लागला कीं धडधाकड इसम काम करीत नसेल तर त्याला यापुढें बेकारीचा भत्ता मिळणार नाहीं.[१] याच्या उलट आपण भांडवलदार जगाकडे वळलों तर १९३३ सालांत कायम बेकारांची संख्या अधिकृत अहवालाप्रमाणें ३ कोट होती आणि खाजगी रिपोर्टाप्रमाणें ५ कोट होती. संपत्तीच्या उत्पादनानंतर आणि बेकारीच्या प्रश्नाकडे पाहिल्यानंतर या दोन जगातील प्रत्येक व्यक्तीच्या राहणीचें मान कसें होतें याचा तुलनात्मक विचार केल्यास हा विरोध अधिकच उठावदार रीतीनें नजरेंत भरतो. झारशाहीच्या मानानें आजच्या रशियन कामगाराला किंवा शेतकऱ्याला काय मिळतें याचा विचार करतां २ कोट कामगारांना स्वस्तांत चांगलें जेवण मिळूं शकतें. मुलें व आजारी यांना अधिक तरतूद केलेली दिसून येते आणि जमीनदार व सावकार यांचा ससेमिरा चुकल्याकारणानें शेतांत पीक चांगलें आलें असतां सुखाचें जेवण मिळूं शकतें हेंही सांगावयास नकोच. हे तीन वर्ग म्हणजे रशियांतील अर्धी लोकसंख्या होय. उलटपक्षीं १९१३–२८ या काळांत राष्ट्रीय उत्पन्नापैकीं जो भाग कामगारांच्या वेतनापायीं खर्चीं पडत होता त्यामध्यें अमेरिकेंत ३६·४ पासून ३६ व इंग्लंडमध्यें ४२·७ पासून ४०·७ इतकी घट झाली. हा हिशेब पैशाच्या भाषेंत झाला. प्रत्यक्ष भोग्य पदार्थांच्या प्रमाणांत वेतनाचें मोजमाप घेतलें तर अमेरिकेमध्यें पक्क्या मालाच्या किंमती १८३०० कोटि डॉलर पासून २७५०० डॉलर इतक्या चढल्या; पण यांपैकीं कामगारांना मात्र १९२१ सालीं या वाढलेल्या किंमतीचा ५८·७ टक्केच भाग मिळाला आणि तें प्रमाण १९२७ मध्यें ५१ पर्यंत खालीं उतरलें. इंग्लडमध्यें १९२४ ते १९३० च्या दरम्यान दरमाणशीं उत्पादन १०० पासून ११३ पर्यंत वाढलें; पण या वाढलेल्या संपत्तीपैकीं वेतनाच्या रूपानें त्यांना मिळणारा भाग त्याच अवधींत ४१·५ टक्क्यापासून ३८ टक्क्यांपर्यंत घसरला.

## उदारमतवादावर हल्ला

हीं दोन परस्परविरोधी आर्थिक दृश्यें इतकीं स्पष्ट आहेत कीं त्यांसंबंधीं

1 Ibid, Page 656.

अधिक मल्लिनाथी करण्याचें काहींच कारण नाहीं. रशियांतील आर्थिक योजनेचे परिणाम पहिल्या पंचवार्षिक योजनेनंतर अधिक स्पष्ट झाले; पण त्याचबरोबर भांडवलदार जगाला १९२७ सालापासून पूर्वी कधींहि न अनुभवलेल्या आर्थिक मंदीच्या आपत्तींतून जावें लागलें. ज्या वेळीं आपल्या अर्थव्यवस्थेंत उत्पादन घटतें आहे, बेकारी वाढते आहे, दारिद्र्य अधिक भीषण स्वरूप धारण करीत आहे त्याच वेळीं योजनाबद्ध अर्थव्यवहार ज्या रशियांत चालू आहेत त्या ठिकाणीं नेमके याच्या विरुद्ध परिणाम घडून यावेत या देखाव्यानें योजना हा बहात्तर रोगांवरचा रामबाण उपाय असावा असा उत्साह तयार झाल्यास नवल नाहीं. पण आर्थिक योजनेचें तत्त्व स्वीकारतांना भांडवलदार जगानें ज्या हेतूनें तें स्वीकारलें तो हेतूहि आपण या ठिकाणीं विसरतां कामा नये. तो हेतु दुसरा तिसरा कोणता नसून धंदा किफायतशीर झाला पाहिजे हाच होय. भांडवलशाहीच्या मूल तत्त्वांना धक्का न लावतां जर उत्पादन नियोजित केलें तर ज्या दोषापासून भांडवलशाही आजपर्यंत मुक्त होऊं शकली नाहीं त्या दोषापासून ती मुक्त होऊं शकेल असा विचाराचा एक नवीन पवित्रा भांडवलदार अर्थशास्त्रवेत्त्यांनीं स्वीकारलेला दिसतो. त्यांच्या मतानें मंदी, बेकारी किंवा महायुद्धें या आपत्ति भांडवलशाही स्पर्धेच्या तत्त्वावर चालत होती, उत्पादनावर सरकारचें नियंत्रण नव्हतें म्हणूनच निर्माण झाल्या आहेत; जर योजना आली तर या आपत्ति नष्ट होऊन भांडवलशाही पुनः पूर्वींच्या विकसित अवस्थेस जाईल. या सर्व नवीन विचारांचा हल्ला योजनेचें तत्त्व स्वीकारल्यापासून उदारमतवादी भांडवलशाहीवर जोरानें सुरू झाला आणि हिटलरनें ज्या वेळीं जर्मनींत आर्थिक योजना अमलांत आणण्याचा खटाटोप केला त्या वेळीं तर या विचारवेत्त्यांना स्फुरणच चढल्यासारखें झालें.

(" It is beyond doubt that lack of planning production and of economic activities in general leads to immense waste of labour and irreplaceable raw materials It is largely responsible for perennial unemployment, underconsumption and overproduction Periodically recurring crises form an integral part of the system, and as the system tends to become more involved and its financial superstructure heavier and heavier, these crises tend to increase in gravity. Under the weight of incurable facts, the necessity for planning was widely

admitted even before the war During recent years, many former adherents of the laissez faire system have become converted in favour of planning The very existence of Nazi regime in Germany is in itself an indictment of the system of unorganised liberal capitalism inherited from 19 th century "—Hitler's New Order in Europe, Paul Einzig, 1941. )

योजनेच्या या प्रकारच्या पुरस्कारांतील भूमिका आपण लक्षांत घेतली तर हा उदारमतवादी, खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चढविलेला हल्ला भांडवलशाही समाजपद्धतीविरुद्ध नव्हता असें स्पष्ट दिसून येण्यास हरकत नाहीं. भांडवलशाहीचीं गेल्या तीनशें वर्षांच्या इतिहासांत अनेक स्थित्यंतरें झालेलीं आहेत; त्यांपैकीं भांडवलशाहीचें जें प्राथमिक स्वरूप तें आतां टाकाऊ ठरलेलें आहे इतकीच कबुली यामध्यें मिळूं शकते.

## नाझी योजना

उदारमतवादी भांडवलशाहीवर टीका करणाऱ्या नाझी योजनेचें उगमस्थान कोठें आहे याचा यावरून उलगडा होण्यास हरकत नाहीं. अर्थात् भांडवलशाहीच्या मूलभूत तत्त्वांना या योजनेमध्यें धक्का लावलेला नव्हता हें त्या योजनेचें अगदीं वरवर जरी परीक्षण केलें तरी दिसून येण्यासारखें आहे. राष्ट्रीय समाजवादी पक्षाचा नेता म्हणून हिटलर सत्तारूढ झाला असला तरी जर्मनींतील बड्या भांडवलदारांचें व बँकेच्या डायरेक्टरांचें त्याच्या पाठीमागें पाठबळ होतें. शिवाय फासिस्ट योजनेचा पाया ज्या नॅशनल इकानॉमिक कौन्सिलनें घातला त्या कौन्सिलमध्यें क्रप, व्हॉन बोह्लेन, थायसन, होएज्लर हे जर्मनींतील बडेबडे भांडवलदार होते या गोष्टी काय दाखवितात ? या गोष्टी एकच तत्त्व दाखवितात आणि तें हें कीं, या योजनेंत भांडवलशाहींतील खाजगी मालकी व नफा या दोन मूलभूत तत्त्वांना धक्का लागणें शक्य नाहीं. तथापि नाझींनीं हातांत सत्ता घेऊन या योजनेची घोषणा केल्यानंतर जगांतील कांहीं भोळ्या समाजवाद्यांची दिशाभूल होणें स्वाभाविक होतें. कारण योजनेच्या कोणत्याहि कल्पनेंत थोडीबहुत सरकारी नियंत्रणाची कल्पना येतेच. भांडवलदार अर्थव्यवस्था खुली स्पर्धा व मागणी व पुरवठ्याच्या नियमानें चालत असते असें आतांपर्यंत दिसत होतें;

अर्थात् मध्यवर्ति सत्तेमार्फत संपत्तीच्या उत्पादनावर नियंत्रण घालण्याची कल्पना त्या अर्थव्यवस्थेंत बसूं शकत नाहीं. तेव्हां कोणत्याहि योजनेंत स्पर्धेच्या तत्त्वाला थोडेंबहुत नियंत्रण बसत असल्याकारणानें योजना भांडवलशाहीला विरोधी असलीच पाहिजे असा विचाराचा गोंधळ माजल्यास नवल नाहीं.

पण याच ठिकाणीं विवेकाची, सूक्ष्म परीक्षणाची अत्यंत गरज आहे. सगळ्याच योजना भांडवलशाहीला विरोधी असतात हें मानणें चुकीचें आहे, इतकेंच नव्हे तर घातक आहे. भांडवलशाहीचीं मूलभूत तत्त्वें दोन. एक खाजगी मालमत्ता व दुसरें नफ्याची प्रेरक शक्ति. जी योजना भांडवलशाहीला विरोधक या नात्यानें पुढें येते त्या योजनेंत या तत्त्वांना फाटा देण्याची आवश्यकता साहजिकच निर्माण होते. या ठिकाणीं हीं तत्त्वें शाबूत ठेवून खुली स्पर्धा व वैयक्तिक स्वातंत्र्य यावर नियंत्रण मध्यवर्ति सत्तेमार्फत कितीही मोठ्या प्रमाणांत घातलें गेलें तरी ती योजना भांडवलशाहीला मारक ठरूं शकत नाहीं, किंवा तिला विरोध करूं शकत नाहीं. भांडवलदार अर्थव्यवस्थेची मूळ चौकट कायम ठेवूनच त्या योजनेचा कारभार चालत असतो. फरक जर कोणता होत असेल तर पूर्वीच्या भांडवलशाहींत जी थोडीबहुत लोकशाही असेल तिचा मात्र संपूर्ण नायनाट होतो. नाझी जर्मनीच्या राजवटीनें हीं गोष्ट पुरेपूर सिद्ध केली आहे. हिटलर गादीवर येतांच त्यानें पहिली घोषणा केली ती ही कीं राष्ट्रीय समाजवादाच्या राजवटींत सामान्य नागरिकाला स्वातंत्र्य ही आवश्यक वस्तु नाहीं ( " Freedom is not requisite and liberty is not essential to the individual citizen." )

नाझींनीं ही आर्थिक योजनेची कल्पना पुढें मांडतांना त्याला समाजवादाची रंगसफेती दिलेली होती यांत शंका नाहीं. समाजवाद्यांप्रमाणेंच त्यांनीहि भांडवलशाहींतील खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर जोराचा हल्ला चढविला. समाजवाद्यांसारखेंच उत्पादनावर सरकारचें नियंत्रण असलें पाहिजे अशी घोषणा केली; पण समाजवाद्यांप्रमाणें नफा व खाजगी मालमत्ता या तत्त्वांविषयीं मात्र चुकून ब्र काढला नाहीं; अथवा ज्या सरकारचें नियंत्रण आर्थिक उत्पादनावर घालणार त्या सरकारवर नियंत्रण कोणाचें याविषयींहि वाच्यता केली नाहीं. संपत्तीचें उत्पादन सरकारच्या गरजेनुसार ( जनतेच्या

गरजेनुसार नव्हे) नियोजित केलें पाहिजे या तत्त्वाचा पुरस्कार राष्ट्रीय समाजवाद्यांनीं केला आणि लोकशाहीला मूठमाती देऊनहि त्यांच्या मतानें सरकारच अखिल राष्ट्राच्या इच्छेचें प्रतीक असल्याकारणानें त्याच्याच गरजेनुसार संपत्तीचें उत्पादन चाललें पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. अर्थात् वैयक्तिक कारखानदारांची परस्पर स्पर्धा या नाझी योजनेंत बंद पडली असेल, पण सरकारच बडें भांडवलदार बनलें गेलें ही गोष्ट ध्यानांत घेण्यासारखी आहे. वैयक्तिक स्पर्धा बंद पडल्याकारणानें या मक्तेबाज सरकारला योजना आंखणें शक्य झालें असलें तरी व्यक्तिस्वातंत्र्य राखून ही योजना अंमलांत येणें शक्य नव्हतें किंवा स्पर्धेला या योजनेंत मूठमाती मिळाल्याकारणानें ही समाजवादी योजनाहि नव्हती. समाजवाद्यांनीं खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चालणाऱ्या भांडवलशाहीच्या पुढची पायरी म्हणून आर्थिक योजनेचा पुरस्कार केला होता. या योजनेंत भांडवलशाहीच्या मूळ चौकटीला हात न लावता स्पर्धेच्या तत्त्वाला गचांडी दिली म्हणून नाझी स्वतःला कितीहि समाजवादी समजत असले तरी उदारमतवादी भांडवलशाहीचें नियोजित भांडवलशाहींत त्यांनीं रूपांतर केलें इतकाच त्याचा अर्थ आहे आणि असें रूपांतर करतांना जनतेच्या नशिबीं पूर्वीपेक्षांहि खडतर पारतंत्र्य व भयानक दारिद्र्य आल्याकारणानें नाझी योजना ही उदारमतवादी भांडवलशाहीच्या दृष्टीनें देखील पुच्छप्रगति आहे असाच निर्णय देणें भाग पडतें.

आर्थिक योजनेच्या स्वरूपाविषयीं सामान्य विवेचन करतांना आज आपणापुढें नाझी योजना व सोव्हिएट योजना अशा दोन प्रकारच्या योजना विचाराकरतां आहेत. युद्धोत्तर कालांत हिंदुस्थानची आर्थिक घटना कशी व्हावी हा विचार चालू असतांना ‘ आर्थिक योजनेच्या ’ विचाराला अधिक चालना मिळालेली आहे, किंबहुना विचारवंतांमध्यें बहुमत योजनेच्या बाजूलाच जाईल. परंतु कोणत्या प्रकारची योजना हिंदी जनतेच्या आर्थिक विकासाला पोषक होईल या प्रश्नाचा प्रामुख्यानें विचार झाला पाहिजे. गेल्या महायुद्धानंतर दोन प्रकारच्या आर्थिक योजना अंमलात आल्या; त्यांचे परिणाम त्या त्या समाजावर झाले; त्या सर्वांचा अनुभव हिशोबांत धरूनच आपणांस वरील प्रश्नांचें उत्तर शोधलें पाहिजे. याच हेतूनें ज्या दोन योजना दोन देशांत व्यवहारांत उतरल्या त्यांपाठीमागची वैचारिक

पार्श्वभूमि कशी बनत आली याचा येथपर्यंत प्रपंच केला. त्यावरून दोन योजना दोन प्रकारच्या अर्थव्यवस्थेमधून निर्माण झाल्या आहेत ही गोष्ट स्पष्ट होईल. भांडवलदार अर्थव्यवस्थेला गेल्या महायुद्धानंतर आर्थिक मंदीनें पछाडलें होतें आणि या मंदीच्या रोगांतून मुक्त होण्याच्या गरजेंतून नाझी योजना जन्म पावली. उलट १९१७ सालीं रशियन क्रांति यशस्वी झाल्या-नंतर रशियन जनतेच्या दारिद्र्यनाशाच्या हेतूनें सोव्हिएट योजना अस्तित्वांत आली. दोन जगांतील अर्थव्यवस्था भिन्न, त्यांच्या गरजा भिन्न, म्हणून त्या गरजा भागविण्यासाठीं जन्म पावलेल्या योजनाहि भिन्न. अर्थात् त्या योजनांचे त्या त्या देशांतील जनतेवर परिणामहि वेगळे झाले हें ओघानेंच येतें. या दोन योजनांचें स्वरूप कोणत्या प्रकारचें आहे व त्यांत काय फरक आहे अथवा विरोध आहे हें समजण्यासाठीं आपणांस आतां आर्थिक योज-नेच्या मूलभूत विचाराकडे वळलें पाहिजे.

### योजनेचें ध्येय भोंगळ नको

या दोन योजनांमधील फरक समजण्यासाठीं प्रथम योजनेचें ध्येय काय या प्रश्नाचा विचार करूं. 'आर्थिक नियोजनच कां' या प्रश्नाचें समर्पक उत्तर योजनेच्या पुरस्कर्त्यांना प्रथम द्यावयास पाहिजे. आणि त्यांचें उत्तरहि अगदीं स्पष्ट आहे. खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चालणाऱ्या उत्पादनपद्धतींत समाजाचा आर्थिक विकास होऊं शकत नाहीं यासाठीं आर्थिक योजना हवी हें तें उत्तर. पण या ठिकाणीं समाजाच्या आर्थिक विकासाचें ध्येय अधिक विशद व्हाव-यास हवें. समाजांत संपत्तीचें उत्पादन वाढलें तरी त्या समाजाचा विकास झाला असा त्या ध्येयाचा अर्थ होऊं शकतो. पण राष्ट्रीय संपत्ति वाढली म्हणजे त्या देशांतील जनतेचें दारिद्र्य नाश पावतेंच असें नाहीं. गेल्या महायुद्धापूर्वीं व नंतर अशीं कित्येक उदाहरणें दाखवितां येतील कीं त्या त्या देशांत विज्ञानाच्या साहाय्यानें यांत्रिक सुधारणा झाल्या व संपत्तीचें उत्पादन एकसारखें व फार मोठ्या प्रमाणावर वाढत गेलें; आणि त्याच-बरोबर त्या त्या देशांतील जनता उत्तरोत्तर दरिद्री होत गेली. यासाठीं केवळ राष्ट्रीय संपत्तीची वाढ म्हणजे समाजाचा आर्थिक विकास होऊं शकत नाहीं. यानंतर आर्थिक विकासाची दुसरी एक कल्पना पुढें आलेली आहे

व ती कल्पना देखील तितकीच फसवी आहे हें येथें सांगितलें पाहिजे. ती आर्थिक विकासाची कल्पना म्हणजे दर माणशीं उत्पन्नाची वाढ (increase in per capita income). अर्थशास्त्रीय विचारांत दर माणशीं उत्पन्न काढण्याची ही कल्पनाहि तितकीच दिशाभूल करणारी आहे. कारण वट्ट राष्ट्रीय संपत्तीला लोकसंख्येनें भागलें म्हणजे दर माणशीं उत्पन्न येतें. उदाहरणार्थ, हिंदुस्थानचें महायुद्धापूर्वी दर माणशीं उत्पन्न रु. ६५ होतें. पण या दर माणशीं उत्पन्नावरून समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या सांपत्तिक स्थितीची वास्तव कल्पना येऊं शकेल काय ? 'नाहीं.' कारण दर माणशीं ६५ रुपयांचें उत्पन्न गणिताच्या पद्धतीनें आलें तरी या देशांतील बडे भांडवलदार, जमीनदार, व्यापारी या लोकांचें वार्षिक उत्पन्न ६५ रु. आहे असें मानणें म्हणजे वस्तुस्थितीचा निव्वळ विपर्यास होय. दरिद्री व श्रीमंत या दोन व्यक्तींच्या उत्पन्नांची एकत्र बेरीज करून त्याला दोनानीं भागलें म्हणजे येणारें उत्पन्न आंकडेबाजीच्या चमत्कारानें क्षणार्धांत दरिद्र्याला श्रीमंत बनवितें व श्रीमंताला दरिद्री बनवितें. तेव्हां दर माणशीं उत्पन्नाची कल्पनाच मुळांत भ्रामक असल्याकारणानें दर माणशीं उत्पन्नांत वाढ झाल्यानें त्या समाजाचा आर्थिक विकास झाला असें म्हणतां येणार नाहीं. ज्याप्रमाणें यंत्रांच्या साहाय्यानें संपत्ति वाढत जाईल त्याचप्रमाणें या संपत्तीच्या वाढीमुळें गुणाकार, भागाकार इ. कांचें साहाय्य घेऊन दर माणशीं उत्पन्नाचा आंकडाहि वाढत जाईल आणि त्या समाजांतील जनता मात्र उत्तरोत्तर भुकेकंगाल बनत जाईल. यासाठीं आर्थिक विकास म्हणजे दर माणशीं उत्पन्नांत वाढ होणें असाहि अर्थ घेतां येत नाहीं. आर्थिक योजना ही जर खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चालणाऱ्या भांडवलशाहीच्या पुढची पायरी असेल तर तिचें खरें ध्येय जनतेच्या रहाणीचें मान (standard of living) सतत वाढविणें हेंच असलें पाहिजे आणि हें रहाणीचें मान देखील पैशाच्या मापांत न मोजतां प्रत्यक्ष गरजा ज्या पदार्थांनें भागतात त्या वस्तूंच्या मोजमापांत मोजलें गेलें पाहिजे. व्यक्तीच्या किमानपक्षी गरजा अन्न, वस्त्र, निवाऱ्याची जागा, आरोग्य व शिक्षण या होत. या तरी त्या योजनेंत भरपूर प्रमाणांत भागल्या जाणें आवश्यक आहे. भांडवलशाहीनें मानवांच्या भौतिक व सांस्कृतिक गरजा भागविण्यास लागणारी एक अनुकूल भूमि

तयार केली आहे आणि ती म्हणजे भौतिक शास्त्रांच्या साहाय्यानें यंत्रांची पैदास. या यंत्रनिर्मितीमुळें आज प्रत्येक व्यक्तीला पुरेसें भोग्य धन समाजांत देतां येईल. पूर्वीच्या मागासलेल्या अवस्थेंत ही शक्यता नव्हती. पण आर्थिक अराजकानें पछाडलेली भांडवलशाही ही शक्यता व्यवहाराच्या कक्षेंत आणूं शकत नाहीं हें आतां अनुभवानें सिद्ध झालें आहे. तेव्हां भांडवलशाहीच्या पुढें जावयाची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या योजनेला व तिच्या योजकांना केवळ आर्थिक विकास असे मोंगळ शब्द उच्चारून स्वस्थ बसतां येणार नाहीं; त्यापुढें जाऊन जनतेच्या रहाणीचें मान वाढविणें अशी त्या ध्येयाची स्पष्ट फोड करावयास हवी.

## ध्येयाची मार्गाशीं सांगड हवी

जनतेच्या राहाणीचें मान वाढवूं इच्छिणाऱ्या कोणत्याहि योजनेला केवळ संपत्तीचें उत्पादन वाढलें म्हणजे झालें असें म्हणून स्वस्थ बसतां येणार नाहीं. कारण भांडवलशाहींत संपत्तीचें उत्पादन एके काळीं वाढतच होतें. तथापि जनतेच्या वाऱ्याची बेकारी व दारिद्र्य संपुष्टांत तर आलीं नाहींतच, उलट भूमितिश्रेढीनें वाढत मात्र गेलीं. भांडवलशाहीचें उदाहरण या ठिकाणीं देण्यांतील हेतु असा कीं, जनतेचें रहाणीचें मान वाढविण्याचें आमचें ध्येय आहे अशी घोषणा केल्यानें कोणतीहि आर्थिक योजना तें ध्येय साध्य करीलच असें नाहीं. त्या योजनेंत जीं तत्त्वें अंगिकारलीं असतील त्या तत्त्वांचा व वरील ध्येयाचा कार्यकारणसंबंध प्रस्थापित केला पाहिजे. दुसऱ्या भाषेंत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं वरील ध्येय मान्य करणाऱ्या योजनेंत विशिष्ट मूलभूत तत्त्वांचा अंतर्भाव होणें आवश्यक आहे. तीं तत्त्वें तीन. यापैकीं दोन आर्थिक स्वरूपाचीं व एक राजकीय स्वरूपाचें. पहिलें तत्त्व म्हणजे संपत्तीच्या उत्पादनाचा हेतु त्या योजनेंत बदलला गेला पाहिजे. नफ्याच्या हेतूनें चाललेल्या उत्पादनांत संपत्ति वाढली तरी त्या संपत्तीचें विभजन योग्य प्रमाणांत होऊं शकत नाहीं आणि विभजन तसें झाल्याशिवाय जनतेच्या दारिद्र्यनाशाची आशा करणें व्यर्थ होय. दुसरें आर्थिक तत्त्व पहिल्या तत्त्वांतूनच निष्पन्न होतें आणि तें म्हणजे उत्पादनाच्या साधनांवरील खाजगी मालकी नष्ट करणें, संपत्तीच्या उत्पादनाच्या साधनांवरील

खाजगी मालकीमुळेंच नफ्याच्या हेतूनें उत्पादन आजपर्यंत चालत आलें आहे. तो हेतु बदलावयाचा असेल तर ती खाजगी मालकी आपणास बदलली पाहिजे. हीं अभावरूपानें सांगितलेलीं तत्त्वें भावरूपांत सांगावयाचीं तर असें म्हणतां येईल कीं, जनतेच्या रहाणीचें मान वाढविण्याच्या ध्येयानें बद्धकंकण असलेल्या योजनेमध्यें संपत्तीचें उत्पादन नफ्याच्या हेतूनें न होतां, समाजाच्या उपयोगाकरितां झालें पाहिजे आणि त्यासाठीं उत्पादनाच्या साधनावरील खाजगी मालकी जाऊन त्या ठिकाणीं समाजाची मालकी प्रस्थापित झाली पाहिजे. योजनेला आवश्यक असणारें तिसरें राजकीय तत्त्व याच दोन तत्त्वांचा एक पूरक भाग आहे. नफा व खाजगी मालकी यांचें आर्थिक क्षेत्रांत अबाधित राज्य चालू आहे याचें कारण त्या तत्त्वांना संरक्षण देणारी राज्यसत्ता त्यांच्या पाठीमागें उभी आहे. जोंपर्यंत ही राज्यसत्ता कायम आहे तोंपर्यंत हीं तत्त्वें नष्ट होणें शक्य नाहीं. यासाठीं नफ्याच्या ठिकाणीं समाजाच्या गरजा व खाजगी मालकीच्या जागीं सार्वजनिक मालकी आणावयाची असेल तर राज्यसत्ताहि त्याला अनुकूल अशीच निर्माण होणें आवश्यक आहे. ज्यावेळीं उत्पादनाच्या साधनावर खाजगी मालकी जाऊन समाजाची मालकी प्रस्थापित करण्याची भाषा आपण बोलतों त्यावेळीं समाज आपली मालकी सरकार या राजकीय संस्थेमार्फतच बसवणार हें उघड आहे. तेव्हां खाजगी मालकीच्या ठिकाणीं सरकारची मालकी आल्यानेंच समाजाची मालकी बसणार. पण त्याचबरोबर त्या सरकारवर समाजाची मालकी असली पाहिजे हेंहि ओघानेंच प्राप्त होतें. सारांश, ज्या योजनेंत उत्पादनाच्या साधनावर सरकारी ताबा, समाजाच्या गरजेकरितां संपत्तीचें उत्पादन आणि जनतेच्या नियंत्रणाखालीं असलेलें सरकार या तत्त्वांचा समावेश झालेला असेल तीच योजना जनतेच्या रहाणीचें मान वाढविण्याचें ध्येय साध्य करूं शकेल; दुसरी कोणतीहि योजना हें ध्येय साध्य करूं शकणार नाहीं. सोव्हिएट योजनेनें हीं तीनहि तत्त्वें अंगिकारलीं होतीं हें सिडने व बेट्रिस वेब या दंपत्यानें सोव्हिएट संस्कृतीचें थोडक्यांत आपल्या ग्रंथराजाच्या अखेरीस जें सार दिलें आहे त्यावरून स्पष्ट होईल. तें वर्णन असें,

" Will this new civilisation, with its abandonment of the incentive of profit-making, its extinction of unemployment, its planned production for community-consumption, and the consequent liqui-

dation of the landlord and the capitalist spread to other countries? Our own reply is : " Yes, it will ".

—Soviet Communism : Page 1143.

## नियोजित भांडवलशाही ?

ज्या नाझी योजनेचा जगभर या युद्धापूर्वी बोलबाला झाला त्या योजनेंत वरील तीन तत्त्वांपैकीं एकहि तत्त्व नव्हतें. आणि याचें स्पष्ट प्रत्यंतर त्या योजनेचे सर्वांत मोठे पुरस्कर्ते डॉ. शॅट यांनीं केलेल्या वक्तव्यांत आपणांस पहावयास सांपडतें. एके ठिकाणीं डॉ. शॅट यांनीं नफेबाज भांडवलदारावर फार जोराचा हल्ला चढवून सर्व संपत्ति राष्ट्राची असली पाहिजे अशा वल्गना केल्या.* पण या वल्गना संपतात न संपतात तोंच ते पुढें म्हणतात कीं, वैयक्तिक कारखानदारांच्या हिताला डावलून भागणार नाहीं. कोणत्याहि परिस्थितींत आमच्या अर्थव्यवस्थेचें वैयक्तिक (मालकीचें) स्वरूप आम्ही नष्ट होऊं देणार नाहीं. भविष्यांत सदासर्वकाळ आम्हांस भांडवलदारांची गरज ही लागणारच. (" We cannot dispense with the economic well-being of individual business leaders and workers. Under no circumstances shall we destroy the multifarious individual charactre of our economic system For all time to come we shall need the independent employer who, for better or worse, is connected with his enterprise ") डॉ. शॅट यांच्यापूर्वी त्याच अधिकारावर असलेले डॉ. श्मिड् याचे उद्गार तर नाझी योजनेच्या स्वरूपावर अधिक प्रकाश पाडतात. त्यांच्या मतानें नाझी योजनेचें कार्य फक्त सध्यांच्या राष्ट्रीय सरकारशीं जर्मन कारखानदारपद्धतीचा मिलाफ करण्याचेंच आहे. (" Our task is the limited one of co-ordinating with the present idea of national govern-

* " The time is past when the nation of economic selfseaking and unrestricted use of profits made can be allowed to dominate. To be true, no individual enterprise, no less than national economy, can exist without making a surplus, but the gains must once again be applied in the cause of and in service to the total community. The economic system must serve the nation. "

—Opening speech by Dr. Schacht, at the opening of the National Labour and Economic Council at Nurenberg.

ment the organisation of the enormous field of German business administration") यांतील सरळ अर्थ असा कीं, भांडवलदारांना ज्या मंदीचा तडाखा बसत आहे त्यांतून सुटका करण्यासाठीं राष्ट्रीय सरकारची मदत त्यांना देणें. याच हेतूनें १९३४ सालीं फेब्रुआरी महिन्याच्या २७ तारखेला जर्मनीच्या अर्थव्यवस्थेच्या पुनर्घटनेची तयारी करण्यासाठीं जो कायदा पास केला गेला त्या कायद्यांतील हेतु पुढीलप्रमाणें होता : 'जर्मनींतील उद्योगधंद्यांची जी फाजील वाढ झाली आहे ती कमी करणें; त्याचप्रमाणें वैयक्तिक कारखानदारांच्या स्पर्धेमुळें जे अडथळे तयार होतात ते दूर करणें आणि उद्योगधंद्यांच्या सर्व भागाची व्यापक, नियंत्रित व एकजिनसी संघटना तयार करणारी योजना आंखणें.' या सर्व गोष्टींवरून नाझींचा प्रयत्न भांडवलशाही नियोजित करण्याचा होता. प्रो. ब्रेडीनें आपल्या अत्युत्कृष्ट ग्रंथांत म्हटल्याप्रमाणें 'सामर्थ्यशाली बडे जर्मन भांडवलदार जें ठरवतील त्या निर्णयांतून कोणाहि व्यक्तीची सुटका होऊं नये यासाठीं नवीन राष्ट्रीय सरकारची हुकुमशाही जारी करणें' हेंच नाझी योजनेचें सारसर्वस्व होय. ("But this is only to assert that the totalitarian power of the new State can and will be used to see that no one escapes whatever the majority of the more powerful German businessmen decide to do" · The spirit and structure of Fascism, by Robert A. Brady, Page 265).

## नियोजित भांडवलशाहींतून शस्त्रास्त्रांची वाढ

आर्थिक दृष्ट्या या नाझी योजनेचे परिणाम काय झाले याचाहि विचार केला असतां जनतेच्या रहाणीचें मान वाढविण्याचें ध्येय या योजनेनें साध्य होऊं शकत नाहीं, हें ताबडतोब सिद्ध होण्यासारखें आहे. भांडवलशाहीच्या आर्थिक चौकटीला धक्का न लावतां योजना आंखल्यास त्या अर्थव्यवस्थेची वाढ एका विशिष्ट दिशेनेंच होणार हें निर्विवाद होय. हिटलरनें किंवा राष्ट्रीय समाजवाद्यांनीं वल्गना केल्या म्हणून त्याची वाढ भलत्याच दिशेनें होऊं शकत नाहीं. कारण अर्थशास्त्रांतील सिद्धान्त विशिष्ट व्यक्तींच्या लहरीवर अवलंबून नसतात. यासाठीं नाझींनीं बेकारी आम्ही नष्ट करणार अशी घोषणा केली म्हणून त्यांच्या योजनेमुळें बेकारी नष्ट होईलच अशी श्रद्धा

ठेवल्यास तिला अंधश्रद्धेचेंच स्वरूप येईल. जनतेच्या रहाणीचें मान वाढवावयाचें असल्यास अन्न, वस्त्र, घर इ० गरजा भागविणाऱ्या भोग्य वस्तूंचें उत्पादन (consumption goods) मोठ्या प्रमाणावर होण्याची गरज असते. अर्थात् या भोग्य वस्तूंचें उत्पादन होण्यासाठीं त्या वस्तू ज्या यंत्रसामग्रीनें निर्माण होतात त्या यंत्राची पैदास करणारे कारखानेहि (production goods industries) वाढवावे लागतात. पण या यंत्रांतून मानवी गरजा भागविणाऱ्या भोग्य वस्तू तयार झाल्या नाहींत तर नुसत्या यंत्रांच्या निर्मितीचा जनतेला कांहीं उपयोग नाहीं. जर्मनींत या यंत्रनिर्मितीच्या कारखान्यांची वाढ मोठ्या प्रमाणावर झाली; तथापि त्यांतून जीवनाला आवश्यक वस्तू तयार करावयाचें म्हटलें तर बाजारपेठेचा वांधा जर्मन भांडवलदारांपुढें होता. घरच्या बाजारपेठेंत तो माल खपवायचा म्हटलें तर जनतेची क्रयशक्ति वाढविणें भाग होतें आणि क्रयशक्ति वाढविण्यासाठीं कामगारांचें वेतन वाढविणें जरूर होतें. पण मग नफा तुटतो त्याची काय वाट ! परदेशच्या बाजारपेठेंत माल पाठवावा तर प्रत्येक देशांतील संरक्षक जकातीच्या अजस्र भिंती समोर उभ्या होत्या आणि त्याखेरीज ज्या अमेरिकन व ब्रिटिश भांडवलदारांचें कोट्यवधि डॉलर्सचें कर्ज घेतलें त्याच्या व्याजापायींच नफा जाणार ! मग धंद्यांत राम तो काय राहिला ? तेव्हां यंत्रसामग्री तयार झाली, पण त्यांतून जनतेला हवें असलेलें पाव लोणी तयार होईना. त्याऐवजीं त्या यंत्रांतून बंदुका, काडतुसें, विमानें यांची पैदास मोठ्या प्रमाणावर होऊं लागली. जनतेला पाव लोणी याची निस्संशय गरज होती; पण नियोजकांच्या दृष्टीनें भुकेकंगालांची गरज परिणामकारक नसते (effective demand). त्यामुळें त्याला किंमत नाहीं. कारण ते रोख दाम मोजून माल विकत घेऊं शकत नाहींत. उलट शस्त्रास्त्रें—अद्यावत् व प्राणघातक शस्त्रास्त्रें—काढलीं तर त्याला राष्ट्रीय समाजवादी सरकार हें मोठेंच गिऱ्हाईक तयार होतें. या सरकारनें तीं शस्त्रास्त्रें खरीदावीं; त्याच्या जोरावर प्रबळ सैन्य उभारावें व भुकेकंगाल जनतेचा असंतोष दडपण्यासाठीं त्या सैन्याचा घरीं उपयोग करावा आणि शेजारपाजारच्या देशांवरही या प्रबल शस्त्रांचा उपयोग करावा हा एकच मार्ग नियोजित भांडवलशाहींतून निघत होता, आणि तोच नाझी योजनेनें पत्करला याची चालू महायुद्ध ही एक उत्कृष्ट

साक्ष आहे. याचा सरळ अर्थ हाच नाहीं का, कीं नाझींची योजना जर्मन जनतेच्या वाढत्या दारिद्र्यावर उभारलेली होती ? ज्या प्रमाणांत शस्त्रास्त्रांची वाढ होत जाईल त्या प्रमाणांत जीवनाला आवश्यक वस्तूंचें उत्पादन कमी होत जाईल; म्हणजेच त्या प्रमाणांत रहाणीचें मान कमी होऊन जनतेचें दारिद्र्य वाढत जाईल. भांडवलशाहीची आर्थिक चौकट कायम ठेवून यापेक्षां दुसरी कोणती दिशा नाझी योजनेच्या समोर होती ? तेव्हां योजनेचा पुकारा करणाऱ्या नाझींच्या अर्थव्यवस्थेंतून जनतेचें वाढतें दारिद्र्य, हुकुमशाही, शस्त्रास्त्रांची वाढ आणि अखेर आक्रमक युद्ध हेंच परिणाम जन्मास येणें क्रमप्राप्त होतें आणि भांडवलशाही कायम टिकवून आंखल्या जाणाऱ्या कोणत्याहि योजनेचें भवितव्य अखेरीस हेंच आहे.*

## योजना नव्हे, योजनेचा आभास

वास्तविक नाझींच्या योजनेला वास्तव अर्थानें योजना म्हणतां येणार नाहीं. कारण आर्थिक योजनेची कल्पना भांडवलशाहींतील मंदी, बेकारी इ० दोष टाळण्यासाठीं पुढें आलेली आहे. स्पर्धेच्या तत्त्वावर बसलेल्या भांडवलशाहींत ही योजना बसूं शकत नाहीं हें मागें सांगितलेंच आहे; कारण उत्पादन नियोजित करावयाचें म्हणजे कोणता माल किती प्रमाणावर तयार

* नाझींच्या अर्थव्यवस्थेस सहानुभूति दाखविणाऱ्या ग्रंथकारालाहि वरील परिणाम मान्य करावे लागले हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल.
" During the economic recovery, there was a very onesided development of the production goods industries Even in March 1938, the consumption goods industries were not working to full capacity, and earnings there were low, and hours relatively short. Any large increase in the standard of living of the German people must depend upon the expansion of these latter industries. There are, therefore, strong prima facie grounds for believing that Germany's economic well-being is not bound up vitally with the rearmament in the sense that the end of rearmament would mean the collapse of her prosperity. "

—The Economic recovery of Germany 1933–38
By Mr. C W. Guillebaud, P. 241–260.

करावयाचा याचा निर्णय घ्यावयाचा असतो. हा निर्णय घेतांना सामाजिक गरजांचें मोजमाप प्रथम घ्यावयाचें असतें. नाझींच्या आर्थिक योजनेंत हें मोजमाप घेतलें जात नाहीं हें सांगावयास नकोच. मग कोणत्या आधारावर नाझींच्या योजनेंत उत्पादनासंबंधीं निर्णय घेतले जातात? तर कोणते धंदे किफायतशीर आहेत याच आधारावर. याला आपण योजना म्हणणें हें भ्रामक आहे. पूर्वींच्या अनियोजित भांडवलशाहींतहि उत्पादन याच तत्त्वावर चालत असे. त्या भांडवलशाहींत व नाझींच्या अर्थव्यवस्थेंत फरक इतकाच कीं प्रत्येक कारखानदारांत व्यक्तिगत स्पर्धा त्या वेळीं चालत असे; आतां नाझी राजवटीमध्यें एकेका देशांतील सर्व कारखानदारांची एकजूट करण्यांत येऊन त्या कारखानदारांची स्पर्धा दुसऱ्या देशांतील कारखानदारांशीं सुरू झाली. स्पर्धा अधिक व्यापक झाली. राष्ट्राच्या अंतर्गत जीवनांतील स्पर्धा नष्ट होऊन ती राष्ट्राराष्ट्रातील भांडवलदार गटांमध्यें सुरू झाली. आणि त्या स्पर्धेंतहि नाझींच्या वाट्याला दुय्यम दर्जाचें स्थान आलें. कारण शस्त्रास्त्रांची वाढ कर्जाऊ भांडवलावर करून नाझींची अर्थव्यवस्था दिवाळखोर बनली होती आणि दिवाळखोर व्यापारी लष्करी दृष्टीनें प्रबल झाला असला तरी आर्थिक स्पर्धेच्या क्षेत्रांत त्याची ताकद कमीच होती. तेव्हा स्पर्धेचें क्षेत्र नाझी योजनेनें बदललें, स्पर्धा अजिबात नष्ट होऊं शकली नाहीं. सामाजिक गरजा लक्षांत घेऊन संपत्तीचें उत्पादन नियोजित करणें तिला शक्य नव्हतें. मागच्या अनियंत्रित अर्थव्यवस्थेच्या पुढें एक पाऊलहि तिला टाकणें शक्य नव्हतें. मग नाझींची योजना कशासाठीं होती? त्या योजनेचा इतकाच अर्थ होतो कीं, जी उत्पादनाची पद्धति सामाजिक विकास करण्यास असमर्थ बनली आहे आणि जी टिकली असतां समाजाचा आर्थिक ऱ्हास निश्चितपणें होत आहे ती पाशवी जोरावर टिकवून धरावयाची. याला आर्थिक योजना असें नांव देणें शक्य नाहीं. ही उत्पादनाची योजना नसून बहुसंख्य जनतेच्या माथीं गुलामगिरी कायम लादण्याची अल्पसंख्य भांडवलदारांची पद्धतशीर एकजूट होय. समाजांतील आर्थिक व्यवहार या योजनेंत पद्धतशीर नियोजित होत नसून त्यांतील अल्पसंख्य भांडवलदारांचे हितसंबंध अधिक संघटित होत असतात. आणि यासाठीं नाझींच्या योजनेला वास्तव

अर्थानें योजना म्हणतां येणार नाहीं; तो योजनेचा आभास होय. ती नियोजित अर्थव्यवस्था नसून तो फॉसिझमचा भस्मासुर आहे.*

## योजनेला रशियांतील अनुकूल भूमिका

याच्या उलट गेल्या महायुद्धानंतर जी सोव्हिएट योजना अस्तित्वांत आली—आणि जिला खऱ्या अर्थानें योजना असें यथार्थ नांव देतां येईल—त्या योजनेचें ध्येय, तिचें स्वरूप, तीमधील मूलभूत तत्त्वें व तिचे परिणाम सर्वस्वी नाझी योजनेच्या विरुद्ध झालेले आपणांस पहावयास सांपडतील. रशियन क्रांतीनंतर महत्त्वाची अशी पहिली गोष्ट कोणती घडली असेल तर वेब्स ज्याला ‘ भांडवलदार व जमिनदार वर्गाचें विसर्जन ’ ( liquidation of land-lords and capitalists ) असें गौरवानें उल्लेखितात ती होय. अर्थात् या खाजगी मालकी हक्कांचें विसर्जन आपोआप झालेलें नाहीं ही गोष्ट रशियन क्रांतीच्या इतिहासावरून कोणालाहि कळून येण्यासारखी आहे. या वर्गाचे हितसंबंध अर्थव्यवस्थेंतून नाहींसे करण्यासाठीं तीन वर्षें रशियन भांडवलदार व जमीनदार यांजबरोबर व जगांतील साम्राज्यवादी गटाबरोबर लढा करावा लागला. आणि त्यानंतरहि या नाहीं त्या स्वरूपांत ही झुंज चालू होतीच. अर्थात् हे नफेबाजांचे हितसम्बन्ध वितळल्यानंतर संपत्तीच्या उत्पादनाचा हेतु बदलला हें सांगावयास नकोच. आणि या दोन तत्त्वांबरोबर ज्या राजकीय तत्त्वाचा वरतीं उल्लेख करण्यांत आला तेंहि तत्त्व म्हणजे जनतेच्या प्रभावी नियंत्रणाखालीं असलेलें सरकारहि रशियन क्रांतीनें जन्माला घातलें. अर्थात् भांडवलदार अर्थव्यवस्थेच्या टीकेंतून मार्क्सनें ज्या आर्थिक योजनेचा पुरस्कार केला तीं तत्त्वें रशियन परिस्थितीशीं थोड्याफार प्रमाणांत जुळतीं घेऊन रशियन सरकारानें अस्तित्वांत आणलीं आणि म्हणूनच जनतेच्या रहाणीच्या मानांत सतत वाढ होत जाईल या ध्येयानें प्रेरित झालेल्या आर्थिक योजनेला अनुकूल भूमिका तयार झाली असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

* " Planned capitalism will not only be a fascist society but a gangster fascist society "

—Economics of Socialism by H. D. Dickinson : page 23.

## उत्पादनाची आंखणी

रशियांतलि आर्थिक योजनेचें तपशीलवार विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. पण नाझी योजनेच्या तुलनेनें कांहीं महत्त्वाचे विशेष या ठिकाणीं दाखविणें जरूर आहे. योजनेच्या प्रारंभीं जी व्याख्या दिली आहे त्या-प्रमाणें, रशियांतील उत्पादनाच्या क्षेत्रांतील आढावा एका मध्यवर्ति योजना-समितीमार्फत ( Gosplan ) प्रथम घेतला जातो. या मध्यवर्ति समितीला हा आढावा घेणें शक्य होतें याचें कारण योजनासमित्यांचें जाळें दुहेरी पद्ध-तीनें सर्व देशभर पसरलेलें आहे. एक पद्धत अशी कीं प्रत्येक कारखाना, सामुदायिक शेती, सरकारी शेती इ. उत्पादनकेंद्रांत एक योजना-समिति असते व ती आपापल्या केंद्रापुरती एक योजना आंखण्याचें कार्य करते. या उत्पादनकेंद्रावरती अनेक कारखाने, किंवा सामुदायिक शेती मिळून एक ट्रस्ट बनलेला असतो, त्याकडे प्रत्येक उत्पादन केंद्राच्या वेगवेगळ्या योजना जातात, आणि तेथून त्या कमिसारमार्फत योजनासमितीकडे जातात. दुसऱ्या पद्धतीनें म्हणजे भौगोलिक दृष्ट्या गांव, जिल्हा, प्रांत, अशा क्रमानें अहवाल वरतीं येत असतात. या वैयक्तिक योजनांचा साकल्यानें विचार करून प्रत्येक उत्पादनकेंद्राला पुढील वर्षीं किती माल निर्माण करावयाचा याचा कार्यक्रम आंखून दिला जातो. प्रथम त्याची एक तात्पुरती योजना आंखली जाते व ती त्या उत्पादन केंद्राकडे विचाराकरितां पाठविली जाते. तेथें त्या-वरती सूचना, दुरुस्त्या, भर यांसहित परत वेगवेगळ्या योजना मध्यवर्ती समितीकडे परत येतात. अशा रीतीनें दुबार योजनेचा विचार झाल्यानंतर प्रत्येक उत्पादनकेंद्राच्या उत्पादनाची आंखणी पक्की करण्यांत येऊन त्या-प्रमाणें त्याला तो आराखडा ( production programme ) पाठविला जातो. या ठिकाणीं उत्पादनाचाच विचार केला जात नाहीं; तर संपत्तीच्या वाट-पाऱ्या अनुरोधानेंच उत्पादनाची योजना आंखली जाते. कारखाना, गिऱ्हाइकांचे सहकारी संघ आणि कामगार संघ या तीन संघटनाच्या एकत्र विचारविनिमयानें ही योजना बनविली जाते ही गोष्ट ध्यानांत घेतल्यास नाझी योजनेपेक्षां यांत काय फरक आहे हें सहज दिसून येईल.

## भांडवलाचा पुरवठा

दुसरें वैशिष्ट्य सोव्हिएट योजनेमध्यें असें कीं या योजनेला लागणाऱ्या भांडवलाचा पुरवठा योजनेंतूनच सतत मिळत जातो. भांडवलदार वर्ग नसतांना उद्योगधंद्यांच्या वाढीला लागणारें भांडवल या योजनेला कोठून मिळतें याबाबत अनेकांनीं आश्चर्य प्रकट केलें आहे. या आश्चर्याच्या अथवा गैरसमजाच्या बुडाशीं भांडवलाविषयीं असलेली चुकीची समजूतच आहे. वास्तविक भांडवलदारांना भांडवल तरी कोठून मिळतें याचा विचार केल्यास या कोड्याचा उलगडा चटकन होण्यासारखा आहे. कोणत्याहि देशांतलि संपत्ति मानवी श्रम व निसर्ग यांच्या मिलाफानें तयार होत असते. यांपैकीं मानवी श्रमशक्ति हा उत्पादनांतलि असा घटक आहे कीं तो आपल्याला जितकें लागतें त्यापेक्षां अधिक तयार करीत असतो. समजा, एक हजार व्यक्तींचा समाज आहे आणि त्या समाजांत त्या हजार व्यक्ति इतकीच संपत्ति दररोज निर्माण करतात कीं त्यांना ती सर्व रोजच्या गरजा भागविण्याकरितां लागते तर तो समाज विकास पावूं शकणार नाहीं. मानवी श्रमांनीं यापेक्षां अधिक धन नेहमीं तयार होत असतें. हें जें अधिक किंवा शिल्लक धन तें नफ्याच्या, व्याजाच्या अथवा खंडाच्या स्वरूपांत भाडवल-दाराच्या, सावकारांच्या किंवा जमीनदाराच्या हातात येतें व त्याचें भांडवलांत रूपांतर होत असतें. सोव्हिएट योजनेंतील अर्थव्यवस्थेंत हे वाटे नाहींसे झाल्याकारणानें राष्ट्रीय संपत्तीचे प्रामुख्यानें दोन भाग पडतात; एक श्रमाचें वेतन ( work-income ) आणि दुसरा शिल्लक किंवा बचत. प्रत्येक उत्पादन-केंद्राला ज्यावेळीं उत्पादनाची योजना दिली जाते त्यावेळीं 'नफा' या सदराखालीं या बचतीचा अंदाज दिलेला असतो. आणि 'टर्नोव्हर टॅक्स'च्या रूपानें सरकारच्या हातांत हें शिलकी धन गोळा होत असतें. सोव्हिएट सरकारच्या अंदाजपत्रकांत या कराचें उत्पन्न सर्वांत मोठें आहे. आणि या उत्पन्नाच्या जोरावर प्रत्येक उत्पादन केंद्राला सरकारी बँकेमार्फत भाडवलाचा पुरवठा केला जातो. ज्या भांडवलासाठीं नाझी योजनेला जनतेच्या खिशांतून जबरदस्तीनें पैसे काढावे लागले ( forsed savings) तें भांडवल या योजने-नुसार उत्पन्नाचें यंत्र चालू होतांच आपोआप पैदा होऊं लागतें आणि

नफ्याचा हिस्सा तेथें नसल्याकारणानें पैदा झालेलें भांडवल सरकारला विनासायासें गोळा करतां येतें. खाजगी मालकी ज्या अर्थव्यवस्थेंत नष्ट झाली आहे त्या कोणत्याहि योजनेंत भांडवलाचा बागुलबोवा वाटण्याचें कांहींच कारण नाहीं; उलटपक्षीं राष्ट्रीय संपत्तींतील शिल्लक ज्या ठिकाणीं नफ्याच्या रूपानें मूठभर कारखानदारांच्या खिशांत जाते तेथें मात्र ती शिल्लक भांडवलाच्या रूपानें अशाच धंद्यांत गुंतली जाईल कीं ज्यामध्यें नफ्याचें प्रमाण वाढतें आहे. अर्थात् त्या अर्थव्यवस्थेला कोणतीहि योजना आंखतांना भांडवल कसें जमा करावयाचें हें प्रश्नचिन्ह सतत भेडसावीत रहाणार.

## रहाणीचें मान वाढलें का ?

यानंतरचा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे रशियन जनतेचें राहणीचें मान. राष्ट्रीय उत्पन्न दरमाणशीं पाच पटीनें वाढलें आहे याची कबुली सर्वांनीं दिलीच आहे. तथापि ही राष्ट्रीय संपत्तीची वाढ करतांना किंवा रशियाचें औद्योगीकरण करण्यासाठीं रशियन जनतेला मनस्वी हाल सहन करावे लागले असा आरोप सोव्हिएट योजनेवर पुष्कळांनीं केलेला आहे. आपल्या देशांतील एक बडे भांडवलदार श्री. घनश्यामदास बिर्ला यांनीं डॉ. लोकनाथन् यांच्या 'योजनेचीं तत्त्वें' या पुस्तकाला जी प्रस्तावना दिली आहे तीमध्यें रशियानें आपलें औद्योगिक सामर्थ्य वाढविलें असलें तरी रशियन जनतेला विलक्षण त्रास सहन करावा लागला आणि यासाठीं रशियाचें आपण अनुकरण न करतां जपानचा मार्ग स्वीकारावा अशी आपल्या देशबांधवांना ( म्हणजे वर्गबांधवांना ) कळकळीची सूचना केलेली आहे. खुद्द टाटा-बिर्ला योजनेमध्येंहि दरमाणशीं उत्पन्न वाढविण्याच्या सदरांत रशियांतील योजनेच्या या परिणामाविषयीं पुढें दिल्याप्रमाणें मत व्यक्त केलें आहे. " .. As we are anxious to avoid the heavy cost in terms of human suffering which the U. S S R. , had to pay to acheive this spectacular result ... ". ( Bombay plan, Page 23 ) तेव्हां रशियन जनतेच्या करुण कहाणीपाठीमागें काय सत्य दडलें आहे याचा विचार करूं.

सोव्हिएट रशियानें जी पहिली पंचवार्षिक योजना आंखली तीमध्यें व त्यानंतरच्या योजनांमध्येंहि यंत्रांच्या पैदाशीवर ( production goods )

अधिक भर दिला होता. याचें कारणहि उघड होतें. सर्व भांडवलदार जग रशियन प्रयोगाच्या विरुद्ध होतें आणि यासाठीं 'देशाच्या संरक्षणाची तयारी' हा त्या योजनेंत एक महत्त्वाचा भाग होता. यासाठीं झपाट्यानें औद्योगीकरण करण्याची रशियन योजनेला गरज भासली व त्या योजनेंत भोग्य वस्तूंपेक्षा यंत्रांची पैदास ज्या धंद्यांतून होईल ते धंदे वाढविण्यावर भर दिला गेला. पण याचा अर्थ असा होता काय कीं हे उद्योगधंदे वाढत असतांना जनतेचें रहाणीचें मान कमी कमी होत होतें? असें असेल तर रशियन योजना खरोखरीच दोषार्ह ठरेल. पण अनेक वार्ताहर, प्रवासी अथवा या देशांतील बिर्लासारखे बडे भांडवलदार यांच्या भरमसाट विधानांवर विसंबून न रहातां प्रत्यक्ष परिस्थितीचें थोडें जवळ जाऊन निरिक्षण केलें पाहिजे. एक बुटाचेंच उदाहरण घ्या. बूट व इतर पादत्राणें यांचा तुटवडा आहे अशी रशियन जनतेची ओरड असल्याचें आपण नेहमीं ऐकतों. या ओरडीचा अर्थ टीकाकारांच्या मतें बुटांचें उत्पादन १९१३ पेक्षां घटलें असा घ्यावयाचा काय? प्रत्यक्ष आंकडेच यावर निर्णायक मत देतील. १९१३ सालीं रशियांत १ कोट ७० लक्ष बुटांच्या जोड्या तयार होत असत; १९३१ सालीं हें उत्पादन ७ कोट ६८ लक्षापर्यंत वाढलें. दुसरी घरांत नित्याची गरज साबणाची. त्याबाबतहि असें दिसतें कीं १९१३ मध्यें रशियांत ९४००० टन साबण तयार होत असे; १९३१ मध्यें त्याची वाढ एक लक्ष ८९ हजार टनापर्यंत गेली. याप्रमाणें प्रत्येक भोग्य वस्तूच्या उत्पादनाचे आंकडे देऊन असें दाखवितां येईल कीं त्याचें उत्पादन दरवर्षीं एकसारखें वाढतच आहे. यासाठीं वेबसाहेबानीं इषारा दिल्याप्रमाणें या टीकाकारांनीं रशियन जनतेची ओरड ऐकून रशियांत या मालाचा तुटवडा आहे किंवा त्याचें उत्पादन घटत आहे असा सुतानें स्वर्गाला जाण्याचा प्रयत्न करूं नये.

("None of these critics seem to realise that the continuance of an experience of scarcity, of which many a household in the U. S S R complains, does not imply in itself any dimunition in the aggregate income of the community or even any lessening of the total supply of the various commodities that the consumers, furnished with steadily increasing purchasing power, are anxious to buy" ... ...Soviet communism, Page 656 )

हा विजय कीं पराजय ?

मग रशियन जनतेची माल कमी पडतो अशी ओरड कां ? अशी ओरड किंवा तक्रार निर्माण होणें हा जनतेच्या राहाणीचें मान वाढविणाऱ्या योजनेचा सर्वांत मोठा विजय होय. झारच्या अमदानींत तीन चतुर्थांशापेक्षां अधिक जनता अत्यंत मागासलेल्या अवस्थेंत होती; या जनतेला योजनेनें त्याची क्रयशक्ति वाढवून जागें केलें, साहजिकच तिच्या दैनंदिन गरजा सारख्या वाढतच जाणार आणि माल कितीहि वाढवला तरी तो मागणी पुरी करण्यास अपुरा पडेल हें सहज दिसून येण्यासारखें आहे. तेव्हां मालाच्या तुटवड्याची रशियांतील तक्रार ही अशा स्वरूपाची आहे. उदाहरण बुटाचेंच घेऊं. झारच्या राजवटींत पांच सहा कोट रशियन शेतकऱ्यांना व त्याच्या मुलाबाळाना बूट हा पदार्थ माहीत नव्हता. कॅनव्हास, गवत किंवा ताग यांपैकीं कशाचें तरी ओबडधोबड आच्छादन पायांवर घालून थंडी वाऱ्यांत त्यांना वापरावें लागे. आज जवळजवळ प्रत्येक शेतकरी बूट वापरीत आहे. तथापि वृद्धांना सुखसोयीसाठीं आणि तरुणांना फॅशनसाठीं किंवा चांगलें दिसावें यासाठीं वेगवेगळ्या ऋतुमानाप्रमाणें वेगवेगळ्या प्रकारचे बूट आपण वापरावेत असें वाटतें. अर्थात् ही वाढती मागणी पुरवण्यासाठीं आज जरी पूर्वीपेक्षां बुटाचें उत्पादन चौपटीनें वाढलें असलें तरी आणखी चौपट उत्पादन वाढल्याखेरीज हा तुटवडा कमी होणार नाहीं. जी गोष्ट बुटांची तीच इतर आवश्यक पदार्थांची. तेव्हां बिर्लासाहेबांनीं रशियन जनतेच्या कष्टाची जी करुण कहाणी गायिली आहे तिचें वास्तव स्वरूप अशा प्रकारचें आहे व हा त्या योजनेचा पराभव नसून त्या योजनेचा विजयच आहे असेंच म्हटलें पाहिजे. ( " Paradoxically enough, this continued experience of a scarcity of commodities and services in general consumption or use is actually a triumph for planned Economy —Soviet communism : Page 657. " )

तथापि ही गोष्ट खरी कीं विरोधी वातावरणांत सोव्हिएट योजना काम करीत असल्याकारणानें त्या योजनेंतील बराच मोठा भाग संरक्षणासाठीं ( defence ) व झपाट्यानें औद्योगिक वाढ व्हावी म्हणून मौलिक धंद्याच्या

वाढीसाठीं ( production goods industries ) खर्चावा लागला. तेव्हां टीकाकार सापेक्षतेने जर असें विधान करतील कीं देशाच्या संरक्षणाची तरतूद व मौलिक धंद्याची वाढ यावर प्रथम भर न देता सोव्हिएट योजना आखली गेली असती तर आज जितकें रहाणीचें मान वाढलें आहे त्यापेक्षां कितीतरी मोठ्या प्रमाणावर जनतेचें रहाणीचें मान वाढलें असते तर त्या विधानांत काहीं तथ्य आहे. पण सापेक्ष विधान करताना त्यात ज्या अपेक्षा धरलेल्या असतात त्या जर व तर याच स्वरूपाच्या असल्याकारणानें त्या विधानापासून सोव्हिएट योजनेच्या स्वरूपावर प्रकाश पडूं शकत नाहीं. याच ठिकाणीं पहा. ' जर संरक्षणाची तरतूद करण्याची खटपट केली नसती तर ' असें सापेक्ष विधान करताना सोव्हिएट रशियाला संरक्षण करण्याची वास्तविक गरज नव्हती आणि उगाच काल्पनिक भीतीनें हा देशांतील संपत्तीचा अपव्यय केला असें म्हणावयाचे असेल तर हें शुद्ध वस्तुस्थितीचें अज्ञान आहे. गेल्या बावीस वर्षांच्या राजकीय इतिहासावरून रशियन धुरीणानीं आक्रमणाची भीति अस्थानीं मानलेली नव्हती असेंच म्हणणें भाग पडेल. प्रत्यक्ष आक्रमण, आर्थिक बहिष्कार, राजकीय डाव इ० विविध प्रकारानीं रशियाभोंवतीं विरुद्ध भांडवलदार राष्ट्रें एक कडें निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होतीं, त्या वेळीं रशियानें याची दखल न घेतां आपली योजना आंखणें हें नैतिक दृष्ट्या उच्च आचरण ठरलें असतें तरी व्यावहारिक दृष्ट्या तो शुद्ध मूर्खपणा गणला गेला असता. अशा रीतीनें संरक्षणाची वास्तव गरज असल्यानंतर त्याची तरतूद झाली नसती तर आहे यापेक्षां रहाणीचें मान वाढलें असतें या सापेक्ष विधानांत काहींच अर्थ नाहीं. ज्याचा आपण विचार करावयास हवा तें हें कीं झारच्या अमदानीपेक्षां आज रशियन जनता सुखी आहे कीं नाहीं. याचें नकारात्मक उत्तर कोण देऊं शकेल ? आणि त्यांतहि भांडवलदार जगात उत्पादन घटत असतांना व बेकारी वाढत असतांना रशियन योजनेनें संपादिलेलें यश अपूर्वच होय असें म्हणणें भाग आहे.

योजनेसंबंधीं जें सामान्य विवेचन आतांपर्यंत झालें त्याचा सारांश थोडक्यांत खालीलप्रमाणें देता येईल:—

( १ ) आर्थिक योजना व दारिद्र्याचा विनाश यांचा कार्यकारणसंबंध

नियमानें असतोच असें नाहीं; यासाठीं ' योजना ' म्हटली म्हणजे पुरोगामी अर्थव्यवस्था आली असें आपणांस म्हणतां येणार नाहीं. गेल्या महायुद्धानंतरच्या इतिहासाकडे पाहिल्यास या कल्पनेचा दोन अत्यंत विरोधी ध्येयांसाठीं उपयोग केल्याचीं उदाहरणें आपणांस मिळतात.

( २ ) प्रथम आर्थिक योजनेच्या कल्पनेचा जन्म मार्क्स व नंतरचे समाजवादी यांच्या अर्थशास्त्रीय विचारांतून झाला. भांडवलदार अर्थव्यवस्थेंतील मूलभूत दोष काढून टाकण्यासाठीं त्यांनीं आर्थिक योजनेची कल्पना पुढें मांडलेली दिसते.

( ३ ) अर्थात् समाजसत्तावादाला अभिप्रेत असलेल्या योजनेंत भांडवलदार अर्थव्यवस्थेचीं मूलभूत तत्त्वें बदलण्याची कल्पना होती. ' योजना ' म्हणजे केवळ मध्यवर्ति सत्तेचें आर्थिक व्यवहारावर नियंत्रण ही व्याख्या त्यांना मान्य होती असें दिसत नाहीं. त्यांच्या योजनेची कल्पना संपत्तीच्या उत्पादनाचा हेतु नफ्याच्या ऐवजीं उपयोग, खाजगी मालकीच्या ठिकाणीं समाजाची मालकी आणि समाजाच्या नियंत्रणाखालीं असलेलें सरकार या तीन तत्त्वांवर बसलेली होती.

( ४ ) गेल्या महायुद्धानंतर दोन प्रकारच्या आर्थिक योजना अस्तित्वांत आल्या. एक सोव्हिएट योजना व दुसरी नाझी योजना. यांपैकीं सोव्हिएट योजनेचीं मूलभूत तत्त्वें वर दिलेल्या समाजवाद्यांना मान्य असलेल्या आर्थिक योजनेचींच होतीं. उलटपक्षीं नाझी योजनेमध्यें भांडवलशाहीच्या मूलभूत तत्त्वांना—नफा व खाजगी मालकी—धक्का न लावतां आर्थिक व्यवहार नियोजित करण्याचा प्रयत्न होता.

( ५ ) अर्थात् या दोन योजना दोन अर्थव्यवस्थांमधून निर्माण झाल्या आहेत. दोघांचीं मूलभूत तत्त्वें भिन्न आहेत. त्यांचे परिणामहि भिन्न आहेत. सोव्हिएट योजनेमुळें जनतेचें रहाणीचें मान वाढलें, नाझी योजनेमुळें शस्त्रास्त्रें व आक्रमक युद्धें निर्माण झालीं. सोव्हिएट योजना समाजवादाच्या दिशेनें जात होती, नाझी योजना भांडवलशाही टिकविण्याचा प्रयत्न करीत होती. सोव्हिएट योजना रशियन क्रांतींतून जन्म पावली, नाझी योजना भांडवलशाहीच्या आर्थिक मंदींतून जन्म पावली.

( ६ ) प्रत्येक देशांतील अर्थव्यवस्थेसमोर या योजनांनीं दोन मार्ग दाखविले आहेत; आणि त्या दृष्टीनें या दोन योजनांना महत्त्व आहे.

राष्ट्रीय स्वावलंबन कीं आंतरराष्ट्रीय सहकार्य ?

आर्थिक नियोजनाचे हे दोनहि प्रकार राष्ट्र या नांवानें जेवढ्या समाजाचा आपणांस बोध होतो तेवढ्याच समाजापुरते आज तरी मर्यादित दिसतात. सर्व जगाला व्यापील अशी जागतिक योजना अमलांत येण्याची आज तरी शक्यता नाहीं किंवा लगतच्या भविष्यकाळांतहि तशी कल्पना करणें शक्य नाहीं. असें असलें तरी या दोन योजनांना आंतरराष्ट्रीय स्वरूप हें रहाणारच. सोव्हिएट योजनेच्या धर्तीवर युद्धोत्तर काळांत इंग्लंड, फ्रान्स इ. देशांत आर्थिक योजना आंखल्या गेल्या तरी इतर देशांशीं त्यांना आर्थिक व्यवहार आयातनिर्यातीच्या स्वरूपांत करावा लागणार. कारण सोव्हिएट रशियासारखीच नैसर्गिक संपत्ति इतर देशांजवळ असेल असें म्हणतां येणार नाहीं. उद्यां समजा इंग्लंडनें आर्थिक योजनेचें तत्त्व अंगीकारिलें तर कच्चा माल, धान्य इ. वस्तूंसाठीं त्या समाजाला इतर देशांच्या तोंडाकडे पहावें लागणारच. आणि जी गोष्ट इंग्लंडची तीच युरोपखंडांतील प्रत्येक देशाची आहे हें उघड उघड दिसतें. तेव्हां या दोन योजनांचा आंतरराष्ट्रीय दृष्टिकोन कोणत्या स्वरूपाचा रहाणार हाहि प्रश्न या ठिकाणीं विचारांत घेतला पाहिजे. यांपैकीं समाजवादाच्या दिशेनें जाणाऱ्या योजनेला बरोबरीच्या नात्यानें परदेशांशीं आर्थिक देवाण घेवाण करण्यास कोणतीच अडचण येणार नाहीं. आर्थिक स्वावलंबनाचें अथवा स्वयंपूर्णतेचें तत्त्व आज एकंदर जग ज्या पातळीवर आहे त्या दृष्टीनें मानवी प्रगतीचें द्योतक आहे असें मानणें चुकीचें ठरेल. ज्या वेळीं देशादेशांत आर्थिक वैमनस्यें होतीं त्या वेळीं युद्धकालाचा हिशोब लक्षांत घेऊन आपला देश शक्य तितका स्वावलंबी असावा या विचाराला महत्त्व होतें. पण आपण ज्या योजनेचा विचार करीत आहोंत त्या अर्थव्यवस्थेंत स्पर्धा, वैमनस्यें व अंतीं कलह यांचा प्रश्नच उद्भवत नाहीं. उलटपक्षीं समानतेच्या भूमिकेवर जर देशादेशांत आर्थिक देवाणघेवाण चालू राहिली तर प्रत्येक देशांत आर्थिक योजना आणणें सुकर होईल. साम्राज्यशाहीच्या कालखंडांत जबरदस्तीनें दुसऱ्या समाजांतून धन

आणलें जात असे. ती भूमिका सोडल्यानंतर आर्थिक योजनेला आंतरराष्ट्रीय सहकार्य पोषकच ठरेल असें मानण्यास कोणतीच अडचण नाहीं. किंबहुना असेंहि म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं कीं समाजवादी योजनेचा दृष्टिकोण आंतरराष्ट्रीय सहकार्याचाच असला पाहिजे, राष्ट्रीय स्वावलंबनाचा असतां कामा नये. जो श्रमविभाग भांडवलदारांनीं प्रत्येक कारखान्यांत निर्माण केला तोच श्रमविभाग ही आर्थिक योजना राष्ट्राराष्ट्रामध्यें निर्माण करूं इच्छिते आणि असा आंतरराष्ट्रीय श्रमविभाग या प्रकारच्या योजनेंत शक्य आहे. याचें कारण परदेशांशीं होणाऱ्या व्यापारापासून राजकीय सत्तेची कल्पना या अर्थव्यवहारानें वेगळी काढली आहे.

## नाझी योजनेचें भवितव्य

उलटपक्षीं भांडवलशाहीची तळी टिकवून धरणाऱ्या नाझींच्या योजनेला जागतिक व्यवहारांतील स्पर्धेचें निर्मूलन करणें अशक्य होय असें दिसतें. नाझींनीं ज्या प्रकारची योजना जर्मनींत या युद्धापूर्वी आणली तशी योजना प्रत्येक देशांत आली तर सबंध जगाचें भवितव्य काय होईल हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पहिली गोष्ट अशी लक्षांत घेतली पाहिजे कीं, भांडवलशाहींत केवळ भांडवलदार व कामगार यांचाच विरोध असतो असें नाहीं; तर भांडवलदार भांडवलदारामध्यें स्पर्धा चालू असते. भांडवलशाही कायम टिकवून ही स्पर्धा नष्ट करतां येईल काय? भांडवलशाहीचें साम्राज्य-शाहींत रूपांतर होत असतांना ही वैयक्तिक स्पर्धा नष्ट करण्याचा एक प्रयत्न झाला आणि तो म्हणजे मक्तेबाजी ( monopoly ). प्रत्येक देशांत समजा पूर्वी तेलाचे कारखाने होते, साम्राज्यशाहीच्या कालखंडांत जागतिक प्रमाणावर दोनच तेलाच्या कंपन्या अस्तित्वांत आल्या. पण हें वैयक्तिक कारखान्यांचें प्रचंड मक्त्यांत रूपांतर सलोख्यानें किंवा सहकार्यानें झालें नाहीं, तर 'बळी तो कान पिळी' या न्यायानें झालें असें साम्राज्याचा इतिहास आपणांस सांगतो. जे कारखानदार या संघांत सामील होण्यास राजी नव्हते, त्यांना हर उपायांनीं इतरांनीं किंवा त्यांच्यापैकीं बड्यांनीं रंजीस आणलें व अखेरीस कांहींना त्यांनीं दिवाळखोर बनवून त्यांचे कारखाने आपल्या घशांत घातले. आणि इतकेंहि करून स्पर्धा संपली काय? नाहीं; ती आंतरराष्ट्रीय प्रमाणा-

वर सुरू झाली. त्याच इतिहासाची साक्ष घेऊन नाझी योजनेचें भवितव्य काय होईल याचा आपणास अंदाज बांधणें कठीण जाणार नाहीं. नाझी योजनेनें राष्ट्र या घटकांत रहाणाऱ्या कारखानदारांची अंतर्गत स्पर्धा कदाचित् थांबेल. पण प्रत्येक देशांत असा सुसंघटित नाझीवाद आल्यास त्यांमधील परस्पर वैमनस्यें किंवा स्पर्धा नष्ट होण्याचा मार्ग दिसतो काय? त्यांतून एकच मार्ग आहे आणि तो म्हणजे कोणत्या तरी एका गटाचा बाकीच्या सर्व गटांवर संपूर्ण विजय. हिटलरची विश्व जिंकण्याची महत्त्वाकांक्षा कशी जन्म पावली याचा उलगडा आतां होण्यास हरकत नाहीं.

पण एका फासिस्ट राष्ट्राचा सर्व जगावर विजय होण्यास कित्येक वर्षांचा काळ युद्धामध्यें जाण्याची आवश्यकता आहे. तेव्हां फासिस्टाफासिस्टांतील यादव्या चालू असतांना राजकीय क्रांतीचा धोका वाढण्याचा संभव अधिक आहे. हा धोका कमी करण्यासाठीं नाझी योजनेला भांडवलशाही अर्थव्यवस्थेतून सर्व समाज मध्ययुगीन अंधकारांत लोटला पाहिजे. आपण जर नाझी योजनेचें बारकाईनें परीक्षण केलें तर नाझी योजनेचा हल्ला भांडवलदार उत्पादनपद्धतीवर आहे असें आपणास दिसून येईल. कारण भौतिक शास्त्रें, यंत्रें व सामुदायिक उत्पादनपद्धति यांमुळेंच जगांत आंतरराष्ट्रीय बाजारपेठ, कामगारवर्ग व कामगार चळवळी जन्म पावल्या, आणि जोंपर्यंत या तीन गोष्टी आहेत तोंपर्यंत भांडवलशाहीची मारक शक्ति समाजांत वाढणारच. तेव्हां जर क्रांतीचा धोका नष्ट करावयाचा असेल तर यांत्रिक सामग्रीनें चालणारी सामुदायिक उत्पादनपद्धतीहि आपणास टाकून दिली पाहिजे, ही दिशा नाझी योजनेनें स्वीकारलेली दिसते. याचा अर्थ काय? याचा अर्थ ज्यावेळीं जगांत भांडवलशाहीतील स्पर्धा संपून एका कोणत्या तरी गटाचें स्वामित्व बसेल त्यावेळीं ज्याला आधुनिक संस्कृति असें आपण म्हणतों ती नष्ट झालेली असेल आणि त्या वेळच्या फासिस्ट गटाचें साम्राज्य हें आधुनिक साम्राज्याप्रमाणें रहाणार नसून रोमन साम्राज्यासारखें राहील. राष्ट्रीय स्वावलंबनाचें तत्त्व स्वीकारणाऱ्या नाझी योजनेपुढें याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. नाझी योजनेनें दाखविलेलें हें काळेंकुट्ट भवितव्य स्कॉट नेअरिंग या लेखकानें आपल्या ‘ फासिझम ’ या पुस्तकांत चांगल्या रीतीनें रेखाटलें आहे. त्याची कल्पना येण्यासाठीं खालील उतारा उद्धृत करणें आवश्यक वाटतें.

" Autarchy implies the abandonment of National specialisation in production ... ... Mass production will be drastically restricted. The abandonment of national specialisation will go hand in hand with the decline of international trade ... ... Localism and individualism will have once again replaced the efforts at social coordination .. ... Automatic machinery will be abandoned with the abandonment of mass producttion The villages will rely on hand-agriculture and handcrafts. Railroads will disappear Roads will be tracks through muds ... ... . Bridges will be distroyed in the course of constantly recurring wars and military expeditionss and forays. ... ... If this picture seems fantastic to a modern American or European, let him compare Roman imperial economy in 50 A. D. with the economy of the same territory in 650 A. D ... ... ... Mass wage-labour will disappear with the disappearance of specialised mass-production. The modern proletariat will be eliminated by war, disease, famine and the flight back to the land, quite as effectively as the proletariat and the slave-masses of Imperial Rome were eliminated by the same means .. ... "

—Scott Nearing, Fascsism : P. 48—51.

## विकासाचा मार्ग

नाझी योजनेच्या वर दिलेल्या भवितव्यावरून हें दिसून येईल कीं ती योजना समाजाला पुढें नेऊं शकत नाहीं, ती मागें रेटील. जर मानव समाजाला आर्थिक विकासाचा मार्ग चोखाळावयाचा असेल तर सोव्हिएट योजनेच्या दिशेनें वाट चोखाळली पाहिजे. गेल्या चारशें वर्षांत भांडवलशाहीनें सामुदायिक उत्पादनाची पद्धति रूढ केली. त्या अर्थव्यवस्थेमधून जागतिक बाजार, व्यापार व देवाणघेवाण तयार झाली. सर्व जगाचें राजकीय व तात्त्विक ऐक्य होण्याच्या अगोदर भौतिक ऐक्य होण्याची आवश्यकता आहे आणि त्याचा पाया भांडवलदार उत्पादन पद्धतीनें घातला असें वर दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येण्यासारखें आहे. " Mass-production, International trade आणि Automatic machinery " हें त्या भौतिक पायाचें थोडक्यांत स्वरूप आहे. ज्यावेळीं लमाण उंटाच्या पाठीवर गोण्या देऊन व्यापार करीत होते त्यावेळीं आर्थिक योजना हा शब्दहि कोशांत नव्हता. तेव्हां आजपर्यंत समाजाचा झालेला विकास हिशेबांत जमेस धरून पुढें पाऊल टाकावयाचें असेल तर

सोव्हिएट योजनेनें जे प्रश्न उपस्थित केले आहेत आणि आखें जग विरुद्ध असतांना खंबीर धैर्यानें हे प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न केला त्याच मार्गानें युद्धोत्तर कालांत प्रत्येक देशांतील जनतेला जाण्याशिवाय गत्यंतर नाहीं. तेव्हां युद्धोत्तर कालांतील हिंदुस्थानच्या आर्थिक प्रश्नांचीं उत्तरेंहि आपणास याच योजनेच्या प्रकाशांत सांपडूं शकतील कीं काय याचा यापुढें विचार प्रस्तुत होय.

# मुंबई–योजना



आर्थिक योजनेच्या मूलभूत कल्पनेचा विकास कसा होत गेला, जगासमोर आज असलेल्या दोन योजना कोणते मार्ग दाखवितात व त्या योजनांचें भवितव्य काय याचें मागील प्रकरणांत विस्तारानें विवेचन केलें. त्यांतील मुख्य हेतु हा कीं आर्थिक योजनेंतील मूलभूत कल्पना स्पष्ट झाल्या कीं, हिंदुस्थानच्या आर्थिक प्रगतीसंबंधीं ज्या योजना आज विचाराकरितां पुढें आलेल्या आहेत त्यांचें परीक्षण सोपें जावें. आणखी एका दृष्टीनें हिंदुस्थानच्या युद्धोत्तर आर्थिक प्रश्नांचें विवेचन सुलभ झालेलें आहे. हिंदुस्थानचा आर्थिक विकास करण्याच्या दृष्टीनें देशांत दोन योजना पुढें आलेल्या आहेत. एक ' टाटा–बिर्ला योजना'[1] आणि दुसरी ' जनता–योजना. '[2] या दोन योजना प्रसिद्ध झाल्याकारणानें आपल्या आर्थिक प्रश्नांच्या विचारांचा. आतां ' श्रीगणेशा ' करण्याची गरज नाहीं. दोन योजनांनीं आपल्या आर्थिक भवितव्यावर व राजकीय भवितव्यावर निश्चित दोन दिशा दाखविल्या आहेत. अर्थात् हा सावधगिरीचा इषारा यावेळींच देणें इष्ट वाटतें कीं ज्या दोन योजना पुढें आल्या आहेत त्या विचाराकरितां पुढें आल्या आहेत. त्यांचें महत्त्व आपल्या विचारांची व देशाच्या विकासाची दिशा दाखविण्यांत आहे. जणूं काय आतांच किंवा युद्ध संपल्यानंतर तावडतोब एक मध्यवर्ति योजना समिती नेमली जाऊन यांपैकीं कोणत्या तरी योजनेबरहुकूम त्यांतील तपशिलाची अंमलबजावणी व्हावयाची आहे अशा कल्पनेनें कोणी जर त्या योजनेचा विचार करूं लागेल तर त्याच्या पदरीं निराशाच येईल. याचें कारण या योजनांतील सूचना सध्यां उपलब्ध असलेल्या माहितीवरून ठोकळ अंदाजवजा बांधलेल्या आहेत. ज्याप्रकारें सोव्हिएट रशियांतील मध्यंवर्ति योजनासमिति ( gosplan ) योजना आंखते त्याप्रकारें योजना आंखणें सरकार या संस्थेशिवाय कोणासहि शक्य नाहीं. पण जी गोष्ट शक्य

1 A Plan of Economic Devolopment for India, available at New Book co Price Re 1

2 Peoples plan for Economic Development of India, Price Re. 1,

आहे ती ही कीं, हिंदुस्तानचा आर्थिक विकास कोणत्या दिशेनें व्हावा याची दिशा दाखविणें. आश्चर्याची गोष्ट अशी कीं जगापुढें ज्याप्रमाणें दोन योजनांनीं दोन मार्ग दाखविले आहेत त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या भवितव्या-चेहि या दोन योजनानीं दोन मार्ग दाखविले आहेत; आणि त्यांमध्यें आप-णास निवड करावयाची आहे. त्या दृष्टीनें या प्रकरणांत प्रथम मुंबई योजनेचा विचार करण्याचें ठरविलें आहे.

## विभजनाच्या योजनेचें आश्वासन

योजनेच्या प्रवर्तकांनीं ही योजना संपत्तीचें उत्पादन वाढविण्याची आहे अशा दृष्टीनें आंखलेली आहे. कोणतीहि योजना आपण परीक्षावयास बसलों कीं गेल्या प्रकरणीं लिहिल्याप्रमाणें तिचें ध्येय काय हा पहिला प्रश्न विचा-रांत घेतला पाहिजे. ‘ आर्थिक विकास ’ या मोंगळ शब्दांनीं त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळणार नाहीं, त्याची निश्चित कल्पना पुढें मांडा-वयास हवी. त्या दृष्टीनें विचार करतांना हिंदी जनतेच्या भीषण दारिद्र्याचा नाश हाच त्या आर्थिक विकासाचा अर्थ होऊं शकतो आणि ‘ दारिद्र्याचा नाश ’ या शब्दप्रयोगांतील दारिद्र्य हा शब्दहि असाच फसवा असल्या-कारणानें त्याचीहि नेमकी कल्पना देणें जरूरीचें ठरतें. हिंदी जनतेचें दारिद्र्य कोणत्या प्रकारचें आहे याची कल्पनाहि आतां पोकळ राहिली नाहीं. या देशांतील सामान्य जनतेला एक वेळ देखील पुरेसें जेवण मिळत नाहीं ही तक्रार आजची नसून दादाभाई नौरोजी यांच्या कालापासून चालत आलेली आहे. तेव्हां दारिद्र्याचा नाश याचा या ठिकाणीं विवेचनाच्या सोयीसाठीं प्रत्येक व्यक्तीला पुरेसें अन्न, पुरेसें वस्त्र, भरपूर निवाऱ्याची जागा, आरोग्य व शिक्षण यांची सोय इतका अर्थ घेऊन चालण्यास हरकत नाहीं. या अगदीं किमानपक्षीं भौतिक गरजा भागविण्यासाठीं संपत्तीचें उत्पादन वाढविण्याची खटपट झाली पाहिजे हें उघड आहे. पण मागें इषारा दिल्याप्रमाणें संपत्तीचें उत्पादन वाढलें कीं आपोआप जनतेला ती उपभोगावयास मिळेलच अशी खात्री नाहीं; उलटपक्षी संपत्ति विपुल तयार होऊनहि जनता भुकेकंगाल होत गेली असाच सुधारलेल्या जगाचा इतिहास साक्ष देत आहे. यासाठीं कोणत्याहि उत्पादनाच्या योजनेबरोबरच संपत्तीच्या विभागणीची योजनाहि

मांडणें आवश्यक आहे. मुंबई योजनेच्या प्रवर्तकांनीं ही गोष्ट लक्षांत घेऊन ' विभजनाची योजना ' आम्ही लवकरच तयार करीत आहोंत असें आश्वासन दिलें आहे. (" For instance neither the problem of distribution, which is vital to any scheme for raising the standard of living, nor the allied question of the control to be exercised by the state over economic activities are discussed in it These matters, the importance of which is fully present to our minds, are at present under examination by us. The results of this examination will form the subject of a seperate report which we hope to issue at an early date." Economic Plan, P. 1) हें आश्वासन देतांना जनतेच्या रहाणीचें मान वाढविण्यासाठीं विभजनाचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे अशी त्यांनीं कबुली दिली आहे. तथापि उत्पादनाचा प्रश्न प्रथम मांडून त्यावर जी देशांत चर्चा होईल तिचा अंदाज घेण्यासाठीं ही केवळ संपत्तीच्या उत्पादनाची योजना मांडण्याचें त्यानीं ठरविलें.

## विभजनाची योजना गृहीतच आहे

योजकांनीं अशा रीतीनें आपली सोडवणूक करून घेण्याचें ठरविलें तरी त्यांतून त्यांची सुटका होण्याचा रंग दिसत नाहीं. आर्थिक व्यवहारांत संपत्तीचें उत्पादन व विभजन यांची अशी कृत्रिम रीतीनें ताटातूट करतां येत नाहीं. कोणत्याहि समाजांत संपत्तीचें उत्पादन ज्या पद्धतीनें होत जातें त्या पद्धतीवरून संपत्तीचें वाटप कसें होईल याचा अंदाज बांधणें कठीण नाहीं, हें मुंबई योजनेच्या प्रवर्तकांनीं लक्षांत घ्यावयास हवें. संपत्तीचें वाटप कसें होत जातें ? संपत्तीच्या उत्पादनांत जे जे भाग घेतलि त्यांना संपत्ति दिली जावी हा नैतिक नियम अर्थशास्त्रांत कुचकामाचा आहे. संपत्तीच्या उत्पादनावर आणि विशेषतः उत्पादनाच्या साधनावर ज्यांची प्रभावी सत्ता आहे त्यांच्या तंत्रानें व गरजेनुसार संपत्ति वाटली जात असते असें सर्व देशांतलि आर्थिक व्यवहारांवरून दिसून येईल, हिंदुस्थानांतील बहुसंख्य जनतेच्या वाट्याला उपासमार आली याचें कारण त्यांनीं निर्माण केलेल्या संपत्तीचा मोठा भाग अल्पसंख्यांच्या खिशांत खंड, व्याज, नफा व सारा यांच्या रूपानें जात असतो हें होय आणि हा मोठा भाग या अल्पसंख्यांच्या खिशांत जात

असतो याचें कारण आजच्या उत्पादनपद्धतीवर मालकी हक्कामुळें त्यांचा प्रभावी ताबा आहे याशिवाय दुसरें कोणतेंहि नाहीं. मग जर संपत्ति आहे यापेक्षां आणखी वाढविण्याची योजना आंखली आणि उत्पादनपद्धतीचें आहे हें स्वरूप कायम ठेवलें, अल्पसंख्य धनिकांच्या हितसम्बंधाला धक्का लावला नाहीं तर संपत्तीच्या विभागणींत फारसा फरक पडेल किंवा आमूलाग्र फरक होईल असें मानण्यास काय जागा आहे ? तेव्हां कोणत्याहि योजनेंत उत्पादन–साधनावरच्या खाजगी मालकीचा प्रश्न हाच मूलभूत प्रश्न होय. मुंबई योजनेंत या मूलभूत व महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार राहोच, पण चुकून उच्चारहि कोठें केलेला नाहीं. या महत्त्वाच्या प्रश्नाला अनुल्लेखानें बाजूस सारण्याचा त्यांनीं कितीहि प्रयत्न केला आणि विभजनाची योजना मागाहून येते, जरा कळ काढा अशा आश्वासनाची सारवासारव करण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी उत्पादनक्षेत्रांतील चालू हितसम्बंध राखून विभजनाची योजना कोणत्या प्रकारची असणार याचीं लक्षणें या योजनेंतूनच प्रकट झालेलीं आहेत. विभजनाच्या योजनेचे पाय या योजनेच्या पाळण्यांतच स्पष्ट झालेले आहेत. यदाकदाचित् ही विभजनाची योजना प्रसिद्ध झालीच तर तपशील आपणास पहावयास मिळेल इतकेंच. कोणत्याहि उत्पादनाच्या योजनेंत विभजनाचीं मूलतत्त्वें गृहीत असतात. या योजनेच्या प्रवर्तकांपैकीं एक, श्री. बिर्लाशेठ यांनीं अखिल भारतीय कारखानदार व व्यापारी संस्थेच्या वार्षिक अधिवेशनप्रसंगीं भाषण करतांना ‘ आमच्या योजनेंत विभजन स्वाभाविक आहे ’ ( Distribution is inherent in the plan ) असे उद्गार काढले आहेत व ते सर्वस्वी सुसंगत आहेत. यासाठीं मुंबई योजनेवर पहिला आक्षेप असा कीं उत्पादनाच्या क्षेत्रांतील चालू टाकाऊ ठरलेले मालकी संबंध न बदलतां जनतेच्या रहाणीचें मान वाढविण्याचें ध्येय या योजनेला साध्य करतां येईल असें मानण्यास कोणताच आधार नाहीं.

### हा अतिविनय तर नाहीं !

जनतेच्या रहाणीचें मान आम्ही वाढविणार अशी नुसती घोषणा करून आर्थिक योजनेचें काम भागणार नाहीं. आर्थिक योजना असली कीं

रहाणीचें मान वाढतेंच असा त्या दोहोंमध्यें कार्यकारणसंबंध नाहीं. योजनेंत जीं तत्त्वें व ज्या सूचना असतील त्यांवर हें ध्येय साध्य होईल कीं नाहीं हें अवलंबून रहातें. मुंबई योजनेंत त्या दृष्टीनें विचार करतांना पाहिल्याच घासाला माशी लागली असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. आता ही गोष्ट खरी कीं राहणीचें मान वाढविण्यापूर्वी संपत्तीचें उत्पादन वाढलेंच पाहिजे. त्या दृष्टीनें देखील मुंबई योजना जरा घोटाळ्याची वाटते. आपल्या योजनेच्या ध्येयाचा योजनाकार पुढीलप्रमाणें खुलासा करतात, 'आमच्या योजनेचें प्रमुख ध्येय योजना अमलात आल्यापासून पंधरा वर्षांच्या कालावधींत दर माणशीं उत्पन्न ( per capita income ) दुपटीनें वाढविण्याचें आहे. गेल्या दशवार्षिक खानेसुमारीवरून लोकसंख्येच्या वाढीचें जे प्रमाण उपलब्ध झालें आहे, त्याप्रमाणें दर वर्षी ५० लक्ष लोकसंख्या वाढेल अशा हिशेबानें, आमचा असा अंदाज आहे कीं दरमाणशीं उत्पन्न दुप्पट वाढविण्यासाठीं वट्ट राष्ट्रीय संपत्तीची तिपटीनें वाढ करावी लागेल.' ( Bombay plan, p. 3 ) यावरून पंधरा वर्षांच्या अवधींत राष्ट्रीय संपत्तीची तिपटीनें वाढ व दरमाणशीं दुपटीनें वाढ या योजनेला करावयाची आहे. योजनेंत दिलेल्या आंकड्यांवरून १९३१–३२ या वर्षांत राष्ट्रीय संपत्ति २२०० कोटि रुपये व दर माणशीं उत्पन्न ६५ रु. होतें; पंधरा वर्षांत ही राष्ट्रीय संपत्ति ६६०० कोटि रुपये होणार आणि दरमाणशीं उत्पन्न १३० रु. इतकें वाढणार. सोव्हिएट रशियानें १२ वर्षांच्या अवधींत राष्ट्रीय संपत्तीची वाढ २५ बिलीयन रूबल पासून १२५ बिलीयन रूबलपर्यंत म्हणजे पांचपटीनें केली ही गोष्ट लक्षांत घेऊन आपली तिपटीची वाढ करण्याचें ध्येय फारच मवाळ आहे असें कोणास वाटेल म्हणून योजनाकार त्याचें समाधान असें करतात कीं, रशियाइतकी आमची नैसर्गिक संपत्ति विविध प्रकारची व व्यापक स्वरूपाची नाहीं आणि शिवाय रशियन जनतेला ही वाढ करण्यासाठीं फारच त्रास व कष्ट सहन करावे लागले. हिंदी जनतेला अगोदरच फार कष्ट पडतात; तेव्हां त्यांना अधिक कष्ट पडूं नयेत यासाठीं महत्त्वाकांक्षा जबर असून देखील तिला पायबंद घालावा लागतो व यासाठीं हें मवाळ ध्येय आम्हांस पत्करावें लागलें. ही जनतेच्या कष्टाबद्दलची सहानुभूति आपण ऐकून जरा समाधान वाटतें तोंच यापूर्वी " योजनेच्या प्रारंभीं

वैयक्तिक त्रास व स्वार्थत्याग फार मोठ्या प्रमाणावर होण्याची गरज आहे" अशी भाषा ऐकूं येते. ( "...in the initial stages it will call for a very large measure of personal discomfort and sacrifice ", page 4 ). दुसऱ्या एका ठिकाणीं भांडवल कसें गोळा होईल याचा विचार करतांना जनतेला अधिक ताण पडूं नये या उदात्त हेतूनें भावी राष्ट्रीय सरकारला आर्थिक जीवन इतकें नियंत्रित करावें लागेल कीं वैयक्तिक स्वातंत्र्य व साहस यांना तात्पुरतें ग्रहण लागेल असाहि इषारा त्यांनीं दिला आहे. आणि अखेरीस योजनाकार असें ठाम निश्चयानें बजावतात कीं " आंसवें गाळल्याशिवाय योजना अशक्य. " ( planning without tears is almost an impossibility. ) मग रशियन जनतेच्या कष्टाचा लाल कंदील पुढें कशासाठीं ? त्यामध्यें व या योजनेंत फरक काय ? फरक इतकाच कीं रशियन जनता फार रडली, हिंदी जनतेला आम्ही कमी रडवणार आहोंत, कारण फार रडल्यानें डोळे सुजतात आणि कमी रडल्यानें पाण्याच्या वाटे डोळ्यांतील गदळ बाहेर जाऊन डोळे स्वच्छ होतात !! कष्ट, त्रास सहन करावे लागणारच; व्यक्तिस्वातंत्र्याला मुकावें लागणारच, अश्रुपातहि होणारच आणि इतकें करूनहि ध्येयाच्या बाबत ही विनयाची भाषा पाहून हा अतिविनय तर नाहीं अशी दाट शंका येते. पण विनय का अतिविनय याचा निवाडा आपण योजनेच्या पुढील परीक्षणावरच सोंपवलेला बरा.

## १३० पासून ७४ पर्यंत

राष्ट्रीय संपत्तीची तिप्पट वाढ कशा पद्धतीनें होणार याचा विचार करण्यापूर्वीं योजकांनीं लोकांच्या किमान रहाणीचें मान काय असावें याविषयीं एक स्वतंत्र प्रकरणच खर्चीं घातलें आहे. टीकाकाराच्या दृष्टीनें या विचाराना योजनेंत अधिक महत्त्व आहे. आर्थिक विकासाचा खरा अर्थ म्हणजे रहाणीचें मान. राष्ट्रीय संपत्तीची वाढ ही त्याची पहिली भूमिका तयार करते. दरमाणशीं उत्पन्नाच्या वाढीनें जनतेच्या रहाणीचें मान वाढलें असें होत नाहीं. यासाठीं सबंध योजनेंत सामान्य श्रमजीवी माणसाच्या दृष्टीनें या प्रकरणाला फार महत्त्व आहे व यात योजनाकाराच्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील सामान्य जनतेच्या रहाणीचें मान कोणतें यावर चांगला प्रकाश पडूं शकेल.

प्रारंभींच लोकांच्या किमान रहाणीची ( minimum standard ) आम्ही कल्पना मांडीत आहोंत असें सूतोवाच करून ही किमान रहाणी म्हणजे किमानपक्षी गरजा भागून योग्य शिल्लक टाकतां येणें अशी किमान रहाणीची व्याख्या दिली आहे ( A reasonable margin over the minimum requirements of human life : Page 7 ). याप्रमाणें किमान राहणीची कल्पना सांगितल्यानंतर योजनाकार म्हणतात, " अशा प्रकारें किमान रहाणीची हमी देण्यासाठीं, युद्धपूर्व किंमतीच्या प्रमाणांत दर माणशीं ७४ रु. चें उत्पन्न आवश्यक आहे. " ( " ... in order to secure a minimum standard of living, a per capita income of Rs. 74 at prewar prices is essential : Page 20. ) योजनेची ध्येयाबाबत इतक्या जलद घसरगुंडी झालेली पाहून आश्चर्य वाटतें. दरमाणशीं उत्पन्न १३० रु. पर्यंत ही योजना वाढविणार आहे अशी घोषणा आपण ऐकतों तोंच जनतेचें किमान रहाणीचें मान ७४ रुपयांत भागूं शकेल ही दुसरी घोषणा ऐकून हा काय प्रकार आहे, ही बनवाबनवी तर नाहीं ना अशी कोणासहि शंका येणें अगदीं स्वाभाविक आहे. आपण १३० पासून ७४ पर्यंत कसे आलों याविषयीं योजनाकार समाधान असें सांगतात कीं सध्यांचें रहाणीचें मान रु. ६५ आहे. ७४ रुपयांपेक्षा ६५ हे कमी नाहींत का ? याशिवाय ६५ रुपयांचा अंदाज हा १९३१-३२ सालचा होता. त्यानंतर दरवर्षी ५० लक्षांप्रमाणें लोकसंख्या वाढत गेली व त्याबरोबर हें ६५ रुपयांचें उत्पन्नहि कमीकमी होत गेलें. मग त्यांत ९ रुपयांची वाढ ही काय कमी वाढ झाली ? ही वाढ भरीव आहे असें ते आग्रहानें बजावीत आहेत ( substantial increase ). आतां आपण वट्ट राष्ट्रीय उत्पन्नाच्या परिभाषेंत हेंच उत्पन्न मोजा. एकंदर ६६०० कोटि रुपयांपैकीं २९०० कोटी रुपये रहाणीपायीं खर्चीं घालणार आहोंत हे काय कमी झाले ? योजनाकारांच्या या खुलाशाचा अर्थ अगदीं सरळ व स्पष्ट आहे. आज हिंदी जनतेचें रहाणीचें मान माणुसकीच्याहि खालीं गेलें; त्याची वाढ ज्याला जीवन—वेतन ( subsistance-level ) म्हणतात तेथपर्यंत करावयाची. पण मग १३० रुपयांपैकीं ५६ रु. वाचतात त्याची वाट काय ? अर्थात् ते कोणाच्या खिशांत जाणार आहेत याची वाच्यता न केलेलीच बरी.

**याहि दृष्टीनें निराशाच**

आतांपर्यंतचा हिशोब आपण रुपयांत पाहिला. आतां भोग्य वस्तूंच्या हिशोबांत रहाणीचें मान किती वाढणार याचा विचार केला तरीहि दारुण निराशाच पदरीं पडते. योजनेमध्यें ' समधात पौष्टिक अन्ना 'ची (well-balanced nutritive diet) जी आंखणी केली आहे त्यामध्यें साखर, फळें, भाज्या, मांस इ. आवश्यक पदार्थांचें प्रमाण अत्यंत हास्यास्पद आहे; युद्धानंतर सध्यांच्या महागाईच्या काळांतील किंमती उतरतील असें मानण्यास जागा नाहीं. तेव्हां इतक्या अपुऱ्या अन्नाला देखील ६५ रुपये लागतील. मग उरलेल्या नऊ रुपयांत घराचें भाडें, औषधपाणी, कापडचोपड इ. वर कसा खर्च करावयाचा हें एक योजनाकारच जाणोत. अन्नाच्या गरजेनंतर कापडाच्या योजनेकडे वळूं. योजनाकारांच्या मतानें ३० वार कापड दर माणशीं पुरें होईल; कारण आज दर माणशीं १६·१ वार इतकेंच कापड मिळतें. मग ३० वार कापड ही काय कमी वाढ झाली ! आणि आपण धरलेली वाढ न्याय्य आहे याकरितां त्यांनीं ' राष्ट्रीय योजना-समिती 'च्या सूचनेचा हवाला दिला आहे. योजनाकारांनीं ही गोष्ट लक्षांत घ्यावी कीं, हवाल्यानें इतक्या जिव्हाळ्याच्या प्रश्नावर काम भागत नसतें. त्यांनींच दिलेल्या कोष्टकावरून असें दिसून येईल कीं, अमेरिकेंत सुती कापडाचें प्रमाण दर माणशीं ६४ यार्ड म्हणजे योजनेंतील प्रमाणाच्या दुपटीपेक्षां अधिक आहे. त्यांतहि अमेरिकेंत दर माणशीं एकंदर कापड जितकें लागतें त्यामध्यें सुती कापडाचें प्रमाण फारच कमी असतें ही गोष्ट लक्षांत घेतली तर राष्ट्रीय योजना समितीचा हवाला किती कुचकामी आहे हें सहज दिसून येईल. अन्न, वस्त्र याप्रमाणेंच इतर गरजांच्या बाबतींतहि याच अपुऱ्या प्रमाणांनीं मोजमाप धरलेलें आपणांस आढळेल. सर्व तपशिलाचा विस्तार-भयास्तव या ठिकाणीं विचार करणें शक्य नाहीं. पण ज्या एकदोन गोष्टी उदाहरणादाखल वरतीं विचारांत घेतल्या त्यावरून याही दृष्टीनें आपल्या पदरीं निराशाच येते.

**मग विकासाची बात कशाला ?**

हा ७४ रुपयांचा अजब हिशोब सांगण्यापूर्वीं योजनाकार म्हणतात, ' जें

किमान रहाणीचें ध्येय गांठावयाचें आहे त्याची थोडीबहुत कल्पना येण्यासाठीं, या विभागांत स्पष्ट शब्दांत विद्यमान परिस्थितीमध्यें किमान रहाणी कशाला म्हणतां येईल याची आम्ही व्याख्या करण्याचें ठरविलें आहे' (Plan, Page 7). या ध्येयवाक्याच्या घोषणेंत खरी मेख 'विद्यमान परिस्थिति (human life under the existing conditions in India)' या शब्दांत आहे. साहजिकच योजकांना विद्यमान परिस्थितीला धक्का न लावतां रहाणीचें मान वाढवावयाचें आहे असें दिसतें. चालू घडी टिकवून धरावयाची असेल तर आर्थिक विकासाची भाषा बोलण्यांत काय हशील आहे ? आमच्या देशाची विद्यमान स्थिति म्हणजे जनतेचें घोर अज्ञान, भयानक दारिद्र्य व मृत्युसंख्येचें वाढतें प्रमाण. या परिस्थितींत सुधारणा करावयाची असेल तर या योजनेंत जितकी राष्ट्रीय संपत्ति निर्माण होत आहे तिची समान वाटणी होण्याची आवश्यकता आहे. योजनेच्या सर्व भागांत हें समान किंवा अधिक वाटणीचें तत्त्व बसतें काय ? नाहीं असेंच या प्रश्नाचें उत्तर द्यावें लागेल. जी योजना चालू परिस्थितींतील आर्थिक हित-संबंध न बदलतां रहाणीचें मान वाढविण्याची आकांक्षा बाळगील तिच्या पदरीं हेंच जीवन-वेतनाचें ध्येय येणार यांत तिळमात्र शंका नाहीं.

## हें पहा योजनेचें खरें ध्येय

राष्ट्रीय संपत्तीची तिपटीनें वाढ करून दुपटीनें दरमाणशीं उत्पन्न वाढविण्याचें ध्येय जाहीर केल्यानंतर दरमाणशीं रहाणीचें मान फक्त २५ टक्क्यांनीं वाढविण्याची भाषा योजनाकार करतात यांत आमचे मतें बनवाबनवीचा कांहींच प्रकार नाहीं; किंवा हें त्यांचें गणित चुकलें असावें अशी शंका घेण्याचेंहि कारण नाहीं. कारण, योजनेचें खरें ध्येय यापेक्षां वेगळें आहे आणि त्या ध्येयाचा उच्चार योजनेच्या दुसऱ्या प्रकरणांत प्रारंभींच केला आहे. तें ध्येय असें : " हिंदुस्थानांतील नैसर्गिक संपत्ति ज्या प्रमाणांत आहे त्या प्रमाणांत आर्थिक उत्पादन पूर्णपणें वाढविणें हेंच कोणत्याहि योजनेचें अखेरचें ध्येय असलें पाहिजे. " (" the ultimate objective of any planning should be to increase the volume of India's economic production to the fullest extent which its natural resources would allow. " Plan, page 7.) या ध्येयाच्या घोषणेंत दोन गोष्टी स्पष्ट झालेल्या

आहेत. योजनेचें खरें ध्येय संपत्तीचें उत्पादन वाढविण्याचें आहे आणि संपत्तीच्या उत्पादनाला देशांतील नैसर्गिक संपत्तीची मर्यादा घातलेली आहे. तेव्हां योजनेचें वास्तव ध्येय उत्पादनांत वाढ करण्याचें असून जनतेच्या सांपत्तिक स्थितींत सुधारणा करण्याचें नाहीं. जनतेच्या आर्थिक स्थितींत सुधारणा करण्यासाठीं उत्पादनाच्या साधनांवरील मालकी हक्कांत मूलभूत फरक करावयास हवेत; त्यासाठीं संपत्तीच्या वाट्याची पद्धति व्यापाराऐवजीं दुसरी आणली पाहिजे आणि मानवी श्रमशक्तीची भांडवलदारांच्या बाजारपेठेंत जी खरेदीविक्री चालते ती थांबली पाहिजे. पण अशा प्रकारचे फरक करणारी योजना उत्पादनाचा हेतु बदलून टाकणार नाहीं तर तिला हे फरक घडवून आणतांच येणार नाहींत. तो हेतु नफा नसून समाजाच्या गरजा भागविणें हाच असला पाहिजे. हा सामाजिक हेतु मुंबई योजनेंत नाहीं. ‘भूमिगत नैसर्गिक संपत्तीच्या प्रमाणांत आर्थिक उत्पादन वाढविणें’ हें ध्येय वरवरतीं बरोबर वाटण्याचा संभव आहे. पण खरी गोम ‘आर्थिक उत्पादन’ या शब्दांत आहे. त्याचा खरा अर्थ काय होतो? एका विशिष्ट वेळीं उत्पादन ‘आर्थिक’ ( म्हणजे फायदेशीर ) रहाणार नाहीं. ती वेळ कोणती? ती वेळ म्हणजे बाजारांत ज्यावेळीं विशिष्ट नफा येण्याइतका मालाला भाव येणार नाहीं अशी वेळ. त्यावेळीं ‘नैसर्गिक संपत्तीच्या’ मर्यादेच्या नांवाखालीं उत्पादन आतां आर्थिक राहिलें नाहीं या सबबीवर बंद करण्यांत येईल आणि संपत्तीचें उत्पादन बंद करतांना प्रामुख्यानें नफ्याची सबब पुढें केली जाईल, जनतेला त्या संपत्तीची गरज आहे किंवा नाहीं हा प्रश्न त्या ठिकाणीं विचारांतहि घेतला जाणार नाहीं. समाजांतील विद्यमान आर्थिक हितसंबंधांत मूलग्राही बदल न करतांना मुंबई योजनेला या ध्येयाव्यतिरिक्त दुसरें कोणतेंहि ध्येय स्वीकारणें अशक्य होय.

वास्तविक जनतेच्या दारिद्र्याचा नाश करण्याच्या हेतूनें प्रेरित झालेली कोणतीहि योजना समाजाच्या वट्ट गरजा मोजून त्या भागविण्याच्या दृष्टीनें उत्पादनाची आंखणी करीत असते. सामाजिक विकासाच्या या योजनेला ‘नैसर्गिक संपत्तीची’ मर्यादा कां भासावी हें समजणें कठीण आहे. आपल्या देशांत नैसर्गिक संपत्ति ( खनिज पदार्थ इ. ) कमी असेल तर दळणवळणाचीं यांत्रिक साधनें आजच्या जगांत असल्याकारणानें देवाणघेवाणीच्या भूमिकेवर

आपल्याला कमी पडणारी संपत्ति इतर देशांतून या योजनेला आणणें अशक्य नाहीं. सामाजिक विकासाची कोणतीहि योजना ‘ आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या ’ तत्त्वावरच बसली पाहिजे आणि त्या दृष्टिकोनानें काम करणाऱ्या योजनेला नैसर्गिक संपत्तीची मर्यादा भासण्याचें कांहींच कारण नाहीं. उलट जी योजना ‘ राष्ट्रीय स्वावलंबन ’ (autarchy) साधूं इच्छिते त्याच योजनेला या मर्यादा जाणवणार यांत शंका नाहीं. बड्या भांडवलदारांना या मर्यादा जाणवतात याचा अर्थ त्यांना समाजाचा विकास साधणारी खरीखुरी योजना नको असाच होतो. ‘ आंथरूण पाहून पाय पसरावेत ’ हा भांडवलदारांकडून याबाबत येणारा युक्तिवाद भ्रामक आहे. यांतील वास्तव अर्थ हाच कीं, बहुसंख्य जनतेला पाय पसरण्यासाठीं आंथरूण देखील रहाणार नाहीं.

## योजनेचा आराखडा

योजनेच्या ध्येयाचें खरें स्वरूप इतक्या जवळून पाहिल्यानंतर योजनेचें स्वरूप काय आहे याचा अधिक खोलांत जाऊन विचार करण्यास हरकत नाहीं. पण तसें करण्यापूर्वीं एकंदर योजनेचा थोडक्यांत सारांश मांडणें आवश्यक आहे. एकंदर योजना थोडक्यांत अशी :

या योजनेला एकंदर १० हजार कोटींचें भांडवल लागणार असून त्याची वेगवेगळ्या धंद्यांत वाटणी खालीलप्रमाणें आहे :

( आंकडे कोटींचे )

| | |
|---|---|
| उद्योगधंदे ... ... ... | ४४८० |
| शेती ... ... ... | १२४० |
| वाहतुकीचीं साधनें ... ... ... | ९४० |
| शिक्षण ... ... ... | ४९० |
| आरोग्य ... ... ... | ४५० |
| घरें ... ... ... | २२०० |
| किरकोळ ... ... ... | २०० |
| **एकूण** ... ... ... | १०००० |

( पान ४१ )

आर्थिक वाढीसाठीं अशा रीतीनें लागणारें भांडवल पुढील मार्गांनें गोळा करतां येईल असें योजनाकारांचें म्हणणें आहे :—

( आंकडे कोटींचे )

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| बाह्यमार्ग—साठे | ... | ... | ... | ३०० | |
| पौण्डाची गंगाजळी | | ... | ... | १००० | |
| परदेशी व्यापारांतून येणें | | ... | ... | ६०० | |
| परदेशांतून कर्जाऊ | | ... | ... | ७०० | |
| | | | | | २६०० |
| देशांतून—ठेवी | ... | ... | ... | ४००० | |
| चलनवाढ | ... | ... | ... | ३४०० | |
| | | | | | ७४०० |
| **एकूण** | ... | ... | ... | | १०००० |

( पान ४८ )

योजनाकार पुढें असें म्हणतात; योजना अमलांत येण्यापूर्वी पंधरा वर्षांची योजना पांच पांच वर्षांनीं एक याप्रमाणें तनि पंचवार्षिक योजनांत विभागली जावी. या प्रत्येक पंचवार्षिक योजनेंत जो खर्च करावयाचा त्याचा अंदाज खालीं दिल्याप्रमाणें :

( आंकडे कोटींचे )

| | पहिली योजना | दुसरी | तिसरी |
|---|---|---|---|
| उद्योगधंदे | (७९०) | (१५३०) | (२१६०) |
| यंत्रसामग्रीचे कारखाने | ४८० | १२०० | १८०० |
| भोग्य वस्तूंचे कारखाने | ३१० | ३३० | ३६० |
| शेती ... | २०० | ४०० | ६४० |
| दळणवळणाचीं साधनें | ११० | ३२० | ५१० |
| शिक्षण ... | ४० | ८० | ३७० |
| आरोग्य ... | ४० | ८० | ३३० |
| घरें ... | १९० | ४२० | १५९० |
| किरकोळ ... | ३० | ७० | १०० |
| **एकूण** | १४०० | २९०० | ५७०० |

( पान ५३ )

राष्ट्रीय संपत्तीची वाढ तिप्पट व दरमाणशीं उत्पन्नाची वाढ दुप्पट याविषयींची सविस्तर चर्चा वर आलीच आहे. इतकें मवाळ ध्येय राखतांना रशियन जनतेच्या करुण कहाणीचा जो दाखला दिला आहे तो किती भ्रामक आहे याविषयींचा उलगडा मागील प्रकरणांत सोव्हिएट योजनेविषयीं लिहितांना केला गेला आहे.

## एक थोडीशी चूक

तथापि १३० रु. दर माणशीं उत्पन्न वाढण्याचा जो हिशोब सांगितला आहे त्यांत जरा घोटाळा झालेला दिसतो. कारण योजना जरी पंधरा वर्षांची असली तरी योजनेच्या प्रवर्तकांच्या मतें योजनेच्या पूर्वतयारीसाठीं आणखी पांच वर्षें तरी लागतील. ("It may be pointed out that the fifteen years period we have suggested is intended to cover only the execution of the plan and does not include the time required for the necessary preparatory work, which may take about three or five years." Page 5.) म्हणजे एकंदर योजना वीस वर्षांची झाली. नंतर दुसरें गृहीत कृत्य असें कीं, युद्ध संपतांक्षणींच एक राष्ट्रीय सरकार स्थापन होऊन तें योजनेच्या कामाला लागेल. या दोन गृहीत कृत्यांना धरून १९४५ सालीं योजनेला सुरुवात होऊन १९६० सालीं ती पुरी होऊं शकेल असें योजनाकार म्हणतात. हें विधान कितपत शक्यतेला धरून आहे याची जबरदस्त शंका वाटते. युद्ध १९४५ सालीं संपेल असें मानलें तरी जो राजकीय बदल योजनेंत गृहीत धरला आहे तो आज युद्ध संपलें आणि उद्यां राष्ट्रीय सरकार स्थापन झालें इतक्या तांतडीनें होईल असें मानण्यांत आपण कल्पनाशक्तीला फार ताण देत आहोंत. त्या बदलाला जर दोन तीन वर्षांचा काल धरला तर १९४८ सालापासून योजनेची सुरुवात धरावयास हवी आणि त्यानंतर वीस वर्षें म्हणजे १९६८ साल उगवतें. आणखी आठ वर्षें जास्त लागतील असें मानलें तर दरसाल ५० लक्ष लोकसंख्येची वाढ या प्रमाणानें ८ वर्षांत ४ कोटी लोकसंख्या सहज वाढणार व दर माणशीं उत्पन्नाचा आंकडा १३० रु. जो धरला आहे तो १२० पर्यंत खालीं आणावा लागेल. १३० काय नी १२० काय, फरक दहाचाच ना; हें

म्हणणें योजनेच्या प्रवर्तकांना ठीक दिसत असलें तरी सामान्य जनतेच्या दृष्टीनें तो फरक भरीव स्वरूपाचा आहे असें मानण्यांत अतिशयोक्ति खास होत नाहीं.

## हा मार्ग कोणता ? फॅसिझमचा नाहीं ?

योजनेंत ‘ रहाणीचें मान ’ सुधारण्याची गर्जना केल्यानंतर त्या योजनेंत एकंदर उद्योगधंद्यांची वाढ कशी असावी याविषयीं साहजिकच कांहीं अपेक्षा निर्माण होत असतात. रहाणीचें मान म्हणजे अन्न, वस्त्र इ. भोग्य वस्तू. आजच्या सुधारलेल्या उत्पादनपद्धतींत एकंदर संपत्तीचे दोन भाग स्थूलमानानें पाडले जातात. एक उत्पादक संपत्ति ( production goods ). आणि दुसरा भोग्य संपत्ति (consumption goods) उत्पादक संपत्ति निर्माण करणाऱ्या धंद्यांना उत्पादन वस्तूंचे कारखाने ( production goods industries ) व भोग्य संपत्ति निर्माण करणाऱ्या कारखान्यांना भोग्य वस्तूंचे कारखाने ( consumption goods industries ) असें म्हणतात. भांडवलदार उत्पादनपद्धतींत संपत्ति निर्माण करण्याची पद्धति जरा द्राविडी आहे ( a roundabout process ). भोग्य वस्तूंचें उत्पादन होण्यासाठीं ज्या यंत्रांची गरज आहे तीं यंत्रें पैदा करण्याचे कारखाने या अर्थपद्धतींत वाढवावे लागतात व त्या कारखान्यांतून यंत्रें निर्माण झाल्यानंतर त्या यंत्रांच्या साहाय्यानें उपभोग्य वस्तू मोठ्या प्रमाणावर तयार होऊं लागतात. मुंबई योजनेच्या प्रवर्तकांचा युक्तिवाद असा कीं हिंदुस्थानमध्यें भोग्य वस्तू मोठ्या प्रमाणावर तयार व्हावयाच्या असतील तर प्रथम या यंत्रांच्या पैदाशीवर भर दिला पाहिजे व याच हेतूनें आम्ही वीज, रासायनिक द्रव्यें, लोखंड व पोलाद इ. वस्तूंच्या कारखान्यांवर योजनेंत भर दिला आहे. कारण हे कारखाने एकदां वाढले कीं यंत्रें तयार होतील व भोग्य वस्तू तयार होऊन देशांत सुबत्ता होईल.

हा युक्तिवाद ऐकावयास गोड आहे. पण नाझी व सोव्हिएट योजनांची आपण तुलना करून असें पाहिलें कीं यंत्रनिर्मितीचे कारखाने तयार झाले कीं त्यांतून अन्न, वस्त्र इ० कांची नियमानें पैदास होईलच असें नाहीं. त्या यंत्रामधून अन्नवस्त्राऐवजीं बंदुका व काडतुसें निघूं लागतील असा नाझी योजनेचा अनुभव आहे. मग यंत्रांमधून अन्न वस्त्र हें भोग्य धनच तयार

होईल हें कसें समजावयाचें ? त्या योजनेच्या हेतूवरून व स्वरूपावरून. आपण मुंबई योजनेच्या ध्येयाचा विचार करतांना हें पाहिलें कीं या योजनेंत समाजाच्या गरजा मोजण्याच्या व भागविण्याच्या हेतूनें संपत्तीचें उत्पादन होऊं शकत नाहीं. तें प्रामुख्यानें नफ्याच्या हेतूनें होणार. नफा मिळविण्यासाठीं बाजारांत भोग्य वस्तूला गिऱ्हाईक असलें तर तो निर्माण केला जाईल. त्या मालाला गिऱ्हाईक मिळावयाचें तर गिऱ्हाइकाला तो माल विकत घेण्याची ऐपत पाहिजे. दरिद्री जनता हें या प्रकारच्या मालाला खात्रीलायक गिऱ्हाईक नाहीं. कारण त्यांना गरज आहे; पण ती भागविण्याची ऐपत नाहीं. अर्थशास्त्राच्या परिभाषेंत सांगावयाचें तर त्याची गरज परिणामकारक नसते. (effective demand). नफ्याच्या हेतूनें चाललेल्या अर्थव्यवस्थेंत मानवी गरज परिणामकारक करावयाची तर त्यांचें वेतन वाढविलें पाहिजे आणि त्यांचें वेतन वाढवावें तर नफ्याच्या हेतूला कात्री लावावी लागते. तेव्हां मुंबई योजनेंत मानवी गरज (human demand) भागविण्याची ऐपत नाहीं. परिणामकारक गरज लक्षांत घेऊनच त्या योजनेंत उत्पादन होत रहाणार. अर्थात् त्या योजनेंत ज्या प्रमाणांत उत्पादक वस्तूंचे कारखाने वाढत रहातील त्या प्रमाणांत भोग्य वस्तूंचें उत्पादन त्यांना कमी करावें लागेल. नफा व खाजगी मालकी कायम ठेवणाऱ्या कोणत्याहि योजनेला या दिशेनें जाण्याशिवाय गत्यंतर नाहीं. तेव्हां योजनेमध्यें भोग्य वस्तूंच्या उत्पादनाकडे आम्ही अधिक लक्ष दिलें आहे (more attention to consumption goods) असें आळवून सांगितलें असलें तरी त्यावर विश्वास ठेवणें जडच आहे. स्पष्ट शब्दांत सांगावयाचें तर ज्या गृहीत कृत्यावरून मुंबई योजना चालली आहे त्याचा स्वाभाविक विकास नाझींच्या अर्थव्यवहाराच्या दिशेनें होत जाणार. योजनेचे प्रवर्तक म्हणतात म्हणून ती दिशा बदलेल असें मानणें चुकीचें ठरेल.

## हें प्रमाण पहा

मुंबई योजनेकडे आपण याबाबत बारकाईनें पाहिलें तर या अनुमानाची सुद्धां गरज नको. ज्या पंचवार्षिक योजना त्यांनीं शेवटीं दिल्या आहेत त्यांत उत्पादक वस्तूंच्या धंद्यांचें भोग्य वस्तूंच्या धंद्यांशीं प्रमाण उत्तरोत्तर

कसें पडतें याचा पडताळा बघितला तर वरील विधानाची हा सूर्य हा जयद्रथ या न्यायानें सत्यता पटणार आहे. त्या प्रमाणावरून असें स्पष्ट दिसतें कीं ज्या प्रमाणांत एकापाठीमागून एक योजनांत उत्पादक वस्तूंच्या धंद्यांचें प्रमाण वाढत गेलें त्याचबरोबर त्या धंद्याशीं भोग्य वस्तूंच्या कारखान्यांचें प्रमाण घटत गेलें. तुलनेकरितां पुढील कोष्टक पहाण्यासारखें आहे :—

( आंकडे कोटि रुपयांचे )

| | (अ) उत्पादक वस्तूंच्या धंद्यासाठीं भांडवल | (ब) भोग्य वस्तूंच्या धंद्यासाठीं भांडवल | (क) (अ) व (ब) यांचें एकमेकाशीं प्रमाण |
|---|---|---|---|
| पहिली योजना | ४८० | ३१० | १०० : ६४ |
| दुसरी योजना | १२०० | ३३० | १०० : २७ |
| तिसरी योजना | १८०० | ३६० | १०० : २० |

एक नजरेंत भरण्यासारखें साम्य म्हणून नाझींच्या योजनेंतहि औद्योगिक वाढ कशी होत गेली याचें कोष्टक वरील कोष्टकाशीं पडताळून पहाणें उद्‌बोधक ठरेल. उत्पादक वस्तूंच्या कारखान्यांत तयार होणारा माल आणि भोग्य वस्तूंच्या कारखान्यांतील माल यांचें प्रमाण नाझी योजनेंत* खालील-प्रमाणें होतें :—

| | (अ) उत्पादक मालाच्या निर्मितींतील बदल ( शेंकडेवारीनें ) | (ब) भोग्य मालाच्या निर्मितींतील बदल ( शेंकडेवारीनें ) | (क) (अ) व (ब) यांचें परस्पर प्रमाण ( शेंकडेवारीनें ) |
|---|---|---|---|
| १९२६–२९ | + ५८ | + ४३ | १०० : ७० |
| १९२९–३२ | – ५६ | – २९ | १०० : ५० |
| १९३२–३७ | + १७२ | + ३९ | १०० : २३ |

त्याचप्रमाणें या दोन प्रकारच्या धंद्यांत कामगारांचें प्रमाणहि विचारांत घेण्यासारखें आहे. तें पुढीलप्रमाणें होतें :—

* C. W. Guillebaud, the Economic Recovery of Germany, 1933-38 : Page 36.

| | (अ) उत्पादक कारखाने शेंकडा प्रमाण | (ब) भोग्य वस्तूंचे कारखाने शेंकडा प्रमाण | (क) (अ) व (ब) यांचें परस्पर प्रमाण |
|---|---|---|---|
| जून १९३२ पासून जुलै १९३७ पर्यंत | १५० | ४० | १०० : २७ |

नाझी योजनेशीं मुंबई योजनेंतील हें प्रमाणसाम्य आपण घटकाभर बाजूस सारलें तरी मुंबई योजनेंतील प्रमाणाचाच काय अर्थ होतो? ज्या प्रमाणांत वीज, लोखंड, कोळसा, रासायनिक द्रव्यें यांचें उत्पादन या देशांतील भांडवलदार वाढविणार त्या मानानें भोग्य वस्तूंचें उत्पादन घटत जाणार असाच ह्याचा अर्थ होत नाहीं काय? पहिल्या योजनेंत जें भोग्य वस्तूंचें प्रमाण आहे त्यापेक्षां दुसरींत कमी आणि दुसरीपेक्षां तिसऱ्या योजनेंत त्याहून कमी ह्याचा अर्थ काय लावायचा? वास्तविक जी योजना जनतेच्या गरजा भागविण्यासाठीं बद्धपरिकर झाली आहे त्या योजनेंत यापेक्षां उलटा क्रम असावयास पाहिजे; म्हणजे योजनेच्या शेवटच्या हप्त्यांत भोग्य वस्तूंचें उत्पादन वाढलें पाहिजे. मुंबई योजनेकडे पहावें तर पहिल्या हप्त्यांत यंत्रांच्या पैदाशीकरितां ४८० कोटी रुपये खर्चीं पडतात व अखेरीस १८०० कोटी रुपयांपर्यंत हा आंकडा वाढत जातो. जवळजवळ चौपटीनें हे कारखाने वाढले जात असतांना जीवनाला आवश्यक लागणाऱ्या वस्तूंच्या कारखान्यांकडे नजर फेकली तर त्यांची वाढ अवघी ३१० कोटी रुपयांपासून ३६० कोटींपर्यंत होणार आहे. पंधरा वर्षांत पन्नास कोटि भांडवलाच्या साहाय्यानें पोटभर भाकर व लाज राखण्यापुरतें वस्त्र पैदा होईल का हें खुद्द योजनेच्या प्रवर्तकांना सुद्धां सांगणें जड जाईल. मग साहजिकच प्रश्न असा निर्माण होतो कीं हा यंत्रांचा पांढरा हत्ती तयार झाल्यानंतर काय करावयाचें? लोणी व पाव निघूं शकत नाहीं; कारण त्याची गरज भुकेकंगालांना रहाणार; पंधरा वर्षांत ही अवस्था वाढतच जाणार. मग यांतून मार्ग? यांतून एकच मार्ग आणि तोहि नाझी जर्मनीनें दाखविलेला. लोणी व पाव जनतेच्या हातांत देण्याऐवजीं बंदुका व काडतुसें त्यांना बहाल करावयाचीं. आणि मुंबई योजनेनें याहीबाबत संदेह राखला नाहीं. आपल्या

औद्योगिक विकासाचा पाया या उत्पादक वस्तूंच्या धंद्यांनीं घातला जाणार आहे व त्यासाठीं या देशांत वीज, यंत्रें, रसायनें, फर्टिलायझर, जहाजें इ० वस्तूंची आपणांस गरज आहे अशा प्रकारचें उदात्त समर्थन करून ते योजक पुढें म्हणतात " केवळ हे धंदे न वाढल्याकारणानें, ब्रिटिश साम्राज्यांतील कॅनडा, ऑस्ट्रेलिया इ० देशांच्या मानानें **युद्धपरिस्थितीला लागणाऱ्या** औद्योगिक वाढींत हिंदुस्थान मागें पडला आहे. " (" But for the lack of most of these industries, India would not have been left so far behind other countries of British empire such as Canada and Australia in the matter of industrial development in response to war conditions. " Page 26 ). जो मार्ग युद्धपूर्व जर्मनीनें चोखाळला त्याच मार्गाकडे ज्या भूमिकेवरून मुंबई योजना आंखली आहे ती भूमिका त्या योजनेला खेचीत आहे असें यावरून स्पष्ट दिसतें.

## ग्रामोद्योगाची प्रशंसा ! !

यावर मुंबई योजनेच्या समर्थकांकडून काय समर्थन होईल याचीहि अटकळ करणें कठीण नाहीं. समर्थक साहजिकच ग्रामोद्योग व लहान हात-धंदे यांजकडे बोट दाखवून म्हणतील कीं " हें पहा, भोग्य वस्तू अधिक प्रमाणावर तयार करण्यासाठीं व लोकांना सुखी करण्यासाठीं मुंबई योजनेला या मार्गाचा अवलंब करावा लागणार आहे. उगाच कां तिच्या नांवानें खडे फोडतां ? " आणि ग्रामोद्योगाविषयीं त्या योजनेंत काय म्हटलें आहे हें बघितलेंत तर भोग्य वस्तू तयार करण्यासाठींच त्याचा उपयोग आम्ही करणार असा त्यांत उल्लेख आपणास सांपडेल. पण ग्रामोद्योगाची प्रशंसा प्रामुख्यानें त्या योजनेंत दोन कारणांकरितां केलेली आहे. एक तर या लहान प्रमाणावरच्या हातधंद्यांच्या सहाय्यानें योजनेच्या प्रारंभींच्या कालांत पर-देशांतून भांडवल आणण्याची गरज कमी करतां येईल. आणि दुसरें असें कीं भोग्य वस्तूंच्या कारखान्याला हे धंदे पूरक ठरतील.

अत्यंत सुधारलेल्या देशांतहि मोठ्या धंद्यांच्या शेजारीं लहान धंदे काम करीत असतात असें दिसतें. पण मुंबई योजनेंत या ग्रामोद्योगांची प्रशंसा करतांना भांडवलाची गरज कमी होईल, असें जें म्हटलें आहे त्यांतलि

स्वारस्य काय याचा येथें उलगडा केला पाहिजे. वास्तविक परदेशांतील भांडवलाची गरज यामुळें कमी होणार या विधानांत कांहींच तथ्य दिसत नाहीं. १००० कोटी रुपये गंगाजळी, ६०० कोटी रुपये परदेशी व्यापारांतून नफा व ७०० कोटि रुपये कर्ज यांमध्यें कोणती गरज ग्रामोद्योगाच्या योगानें कमी होणार याचा उलगडा त्या योजनेंत कोठेंहि केलेला नाहीं. मग परदेशी भांडवलाची गरज यामुळें कमी होईल या विधानाचा वास्तव अर्थ काय ? का हें विधान निरर्थक आहे ? थोड्या विचाराअंतीं असें दिसेल कीं हें विधान निरर्थक नसून सार्थ आहे. ग्रामोद्योगामुळें परदेशांतून भांडवलाची गरज कमी होईल याचा अर्थ ग्रामोद्योगाची मुंबई योजनेच्या एकंदर आराखड्यांत मदत घेतली नाहीं तर परदेशांतून आणखी भांडवल आणावें लागेल असा या ठिकाणीं करणें भाग आहे. वर जो योजनेचा आराखडा दिला आहे त्यामध्यें परदेशांतून भांडवल चार प्रकारें मिळणार अशी योजकांची अपेक्षा. यांपैकीं साठ्याच्या रूपानें, गंगाजळीच्या स्वरूपांत असलेलें अथवा कर्जाऊ म्हणूनच जें भांडवल लागणार त्यापैकीं कोणतेंही सदर ग्रामोद्योगांतून होणाऱ्या मिळकतीवर अवलंबून नाहीं. ग्रामोद्योगाची खरी मदत होणार ती परदेशी व्यापारांतून यांना ६०० कोटींची १५ वर्षांत शिल्लक मिळणार त्या रूपानें. जर ग्रामोद्योगाचा आसरा घेतला नाहीं तर आयात व निर्यात व्यापार यांमधील सालिना ४० कोटींचें अंतर योजनेला राखतां येणार नाहीं.

## आधुनिक रामाची विदेशी लंकेवर स्वारी

मुंबई योजनेंत ग्रामोद्योगाचें महत्त्व अशा प्रकारचें रहाणार आहे. या ग्रामोद्योगांतून तयार होणाऱ्या वस्त्रप्रावरणादि भोग्य वस्तू येथील जनतेच्या उपभोगाकरितां राखल्या जाणार नसून त्यांची परदेशी निर्यात व्हावयाची आहे; आणि यासाठीं ग्रामोद्योगाची प्रशंसा ग्रामोद्योगाचें ज्या उत्पादनपद्धतीला वावडें आहे त्या पद्धतीच्या समर्थकांकडून होत आहे. ग्रामोद्योगाचें महत्त्व मुंबई योजनेला या कारणासाठीं वाटतें हा त्या योजनेचा ओढून-ताणून अर्थ लावलेला नाहीं; तर तो अर्थ मुंबई योजनेंतील एकंदर रचनेमधून स्वाभाविकपणें निघतो. असें पहा कीं, आयात व्यापारापेक्षां निर्यात

व्यापार ४० कोटींचा अधिक राहील असें योजनाकार म्हणतात तें कशाच्या जोरावर ? शेतीची वाढ योजनेच्या प्रवर्तकांना इतकीच करावयाची आहे कीं ज्यायोगें देशांतील जनतेला पुरेसें अन्न मिळूं शकेल. (" Our idea is that in respect of agricultural commodities India should as far as possible aim at feeding her own population adequately and should not aspire in the initial years of planning to export to foreign markets. "—Page 30 ). कच्चा माल पिकेल तो येथील उद्योगधंद्यांनाच लागेल. तेव्हां शेतीवर होणाऱ्या कच्च्या मालाच्या व धान्याच्या जोरावर ही ४० कोटींची मिळकत मिळण्याची त्यांना आशा नाहीं. यंत्रसामुग्री निर्यात करणेंहि शक्य नाहीं व करूं म्हटलें तरी इंग्लंड, अमेरिका इ० सुधारलेल्या देशांपुढें त्यांचा निभाव लागणार नाहीं या दोन गोष्टी वगळल्यानंतर वस्त्रप्रावरणादि ज्या भोग्य वस्तू आहेत त्यांच्याच निर्यातीवर ४० कोटी सालिना मिळत जातील अशी महत्त्वाकांक्षा योजक मनाशीं बाळगून आहेत आणि ग्रामोद्योगाचें रामराज्य त्यांच्या मदतीला धांवून येईल अशी त्यांना आशा वाटते. ग्रामोद्योगाच्या बळावर, थोडक्यांत सांगावयाचें तर, हा आधुनिक राम ( अर्थात् कोदंडधारी नव्हे तर बंदुकधारी ) विदेशी बाजारपेठेच्या लंकेवर स्वारी करूं इच्छितो !

## बिर्ला शेठजींचा लाडका जपान

पण या ठिकाणीं थोडीशी अडचण निर्माण झाल्यासारखी वाटेल. कापडचोपड इत्यादि माल परदेशच्या बाजारपेठेंत पाठवून ४० कोटींची सालिना बचत करूं असें योजक म्हणतात खरें; पण हें कसें जमणार ? युद्धोत्तर जगांत या मालाची निपज सगळ्याच देशांत होणार. तेव्हां परदेशच्या बाजारपेठेंत इंग्लंड, अमेरिका व इतर युरोपियन राष्ट्रें यांमधूनहि त्याच प्रकारचा माल येणें स्वाभाविक आहे. त्या बाजारपेठेंत आपला माल खपवावयाचा म्हणजे या मालाशीं स्पर्धा करावी लागणार हें उघड आहे. या पुढारलेल्या देशांशीं ज्याचे उद्योगधंदे नुकतेच वाढीला लागले आहेत तो हिंदुस्थान कशी काय स्पर्धा करूं शकेल ? आणि स्पर्धा करावयाची इच्छा धरली तरी स्पर्धेंत टिकाव लागला पाहिजे का नको ? तेव्हां योजनाकार पर-

देशच्या व्यापाराचे उगाच मनांतल्या मनांत मांडे खात आहेत असें वाटण्याचा संभव आहे. पण व्यवहारी कारखानदारांनीं हे मनचे मांडे खाण्याचा अव्यवहारी हिशोब मांडलेला नाहीं. जगाच्या बाजारपेठेंतील स्पर्धेंत टिकावयाचें तर मालाच्या किंमती कमी करावयास पाहिजेत. म्हणजेच इतर देशांपेक्षां माल स्वस्त दरानें देतां आला पाहिजे आणि नेमकें या ठिकाणींच ग्रामोद्योगाचें काय वर्म आहे हें समजून चुकेल. माल स्वस्त दरांत विकण्यासाठीं नफ्याच्या दराला चाट न बसतां दोन गोष्टी केल्या कीं काम संपलें. एक कच्चा माल स्वस्त दरात पदरीं पाडावयाचा आणि दुसरें मजुरी कमी करावयाची. मुंबई योजनेचे प्रवर्तक अशा रीतीनें शेतकऱ्यांच्या वाढत्या दारिद्र्यावर आणि कामगारांच्या वाढत्या पिळवणुकीवर परदेशची बाजारपेठ काबीज करूं इच्छितात. स्वाभाविक जें राष्ट्रीय सरकार योजनेच्या प्रवर्तकांना हवें आहे तें आर्थिक क्षेत्रावर संपूर्ण ताबा चालविणारें असें सरकार त्यांना हवें आहे ( with full freedom in economic matters , Page 2. )

ग्रामोद्योग व हातधंदे यांच्या सहाय्यानें अत्यंत स्वस्त मजुरी देऊन माल तयार करण्याचा व स्पर्धेच्या क्षेत्रांत आपली ताकद वाढविण्याचा मार्ग गेल्या महायुद्धानंतर जपाननें दाखविला. योजनेच्या प्रवर्तकांपैकीं एक बिर्ला शेठ यांना जपान इतका लाडका कां यांतील रहस्य जपानच्या अर्थव्यवस्थेंत पहावयास मिळेल. डॉ. लोकनाथन् यांनीं ' योजनेचीं मूलतत्त्वें ' या नांवाखालीं जें एक छोटेखानी पुस्तक प्रसिद्ध केलें आहे त्याला बिर्लाशेठजींनीं एक वाचनीय प्रस्तावना दिली असून त्यांत रशिया व जपान या दोन देशांतील अर्थव्यवस्थेपैकीं कोणाचें अनुकरण करावें असा प्रश्न उपस्थित केला आहे आणि त्याचें उत्तरहि जपानच्या बाजूनें देऊन टाकलें आहे.* जपान हा अवघ्या तीस वर्षांच्या अवधींत जगांतील चार बलाढ्य

---

* त्या प्रस्तावनेंतील खालील उतारा या दृष्टीनें उद्बोधक वाटेल म्हणून तो देणें जरूर वाटतें :—

" Japan seems to have had a better luck ( better than the Soviet Union which figures in the context ). She was weak and backward as late as the middle of the last century. In 1867 Emperor

( पुढील पानावर पहा )

राष्ट्रांपैकीं एक झाला याचें कारण शेठजींच्या मतानें जपाननें आपली अर्थ-पद्धति योग्य पायावर योजली हें आहे. यासाठीं जपानी अर्थयोजनेंतील कोणता योग्य पाया होता—कीं ज्या सामर्थ्यावर जपाननें परदेशच्या बाजारपेठा काबीज केल्या आणि ज्याचें अनुकरण आमचे बडे भांडवलदार या देशांत करूं इच्छितात—त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करावयास हवें. कारण त्यामुळें मुंबई योजनेंत ग्रामोद्योगाचें काय स्थान आहे यावरती चांगला प्रकाश पडेल.

कापडाचा धंदा हा जपानचा प्रमुख धंदा. यासाठीं त्या धंद्याची संघटना कशी आहे याचा विचार केला असतां जपानची स्पर्धेंतील ताकद कां वाढली याचा उलगडा होईल. हबर्ड या ग्रंथकारानें दिलेल्या माहितीप्रमाणें "एकंदर कापड तयार करणाऱ्या मागांपैकीं एकचतुर्थांश माग स्पिनिंग मिलच्या मालकीचे होते व या मिलमध्यें प्रत्येकीं एकहजारापेक्षां अधिक कामगार कामावर असत." उलटपक्षीं "ज्या कापडाच्या गिरण्या प्रामुख्यानें स्वदेशांतील बाजारपेठेसाठीं कापड तयार करीत असत आणि ज्या गिरण्यांतच प्रामुख्यानें या धंद्यांतील कामगारांचा भरणा अधिक आहे अशा ५० पेक्षां कमी मजूर असलेल्या कारखान्यांकडे पाहिलें तर आपणांस असें आढळतें कीं यामधील $\frac{२}{३}$ हून अधिक कामगार पांचाहूनहि कमी मजूर ज्या कारखान्यांत काम करीत आहेत अशा कारखान्यांत काम करीत असतात आणि यांपैकीं पुष्कळ कदाचित् बहुतेक हातमाग चालवितात. मोठमोठ्या गिरण्यांनीं परदेशीं पाठविण्यासाठीं शर्टिंग व साधे तागे तयार करण्यांत प्रावीण्य मिळविलें आहे;

---

( मागील पानावरून चालू )

Mutsuhito came to the throne and he ruled till 1912. He gave his people, or rather nature gave him the security and stability which made it possible for him, to give Japan education, reform and economic uplift. It enabled him to plan Japan's economics on a proper basis and to rebuild its army and navy in a manner which made Japan within a short span of thirty years one of the Big Four or Five. Subsequent history is irrelevant. It could thus be seen that while we need a plan and a national Government to execute it, we also need security and stability among other things for full success."

कारण साऱ्यांतून अशा प्रकारचेंच कापड चांगलें तयार होऊं शकतें. लहान कारखाने परदेशात पाठविण्यासाठीं इतर प्रकारचें कापड तयार करीत असतात. अशा रीतीनें मोठ्या गिरण्या व हातधंदे यांच्या साहाय्यानें या धंद्याची परदेशच्या बाजारपेठेंत स्पर्धा करण्याची ताकद वाढली आहे असें सांगण्यांत येतें. ”[1]

मोठमोठे कारखाने व लहान प्रमाणावरील धंदे यांच्या मिश्रणानें जपानची स्पर्धेची ताकद वाढली याचें कारण कमी मजुरी. जपानी जनतेचें रहाणीचें मान फार कमी आहे आणि या लहान लहान धंद्यांत जुनें सरंजामशाहीचें वातावरण राखण्याचा प्रयत्न करून तें कमी करण्याचा सतत प्रयत्न केला जातो. हा लहान कारखाना अविभक्त कुटुंबपद्धतीच्या तत्त्वावर जपानमध्यें चालतो. कुटुंबातील माणसें व कांहीं गडी ( मजूर ) इतकाच यांचा व्याप. मजुरांना अर्थात् कुटुंबांतीलच इसम अशा आपुलकीनें घरांत उरेल तें अन्न व सांदीकोपऱ्यांत पथारी मिळते ! याव्यतिरिक्त रोख मजुरी फारच थोडी दिली जाते. वाफेच्या इंजिनाच्या साहाय्यानें जो धंदा चालत नसेल व ज्यामध्यें दहापेक्षां कमी कामगार कामावर असतील त्यांना फॅक्टरी ॲक्ट लागू नाहीं; व त्यामुळें त्यांची सरकाराकडून तपासणी होण्याचा संभव नसतो. या धंद्यामध्यें रूढी, नातेवाईक किंवा शाळा यांखेरीज कोणाचेंहि दडपण येऊं शकत नाहीं. लहान मुलें, बायका, पुरुष सर्वांचे कामाचे तास अनियंत्रित असतात.[2] या लहान धंद्यांवर वेतन किंवा कामाचे तास याबाबत संप्रदाय किंवा रूढीचें दडपण येतें असें सांगितलें. त्या रूढीचें या कारखान्यांत वर्चस्व कसें काय पडतें याचाहि विचार उद्बोधक ठरेल. औद्योगिक युग येण्यापूर्वीचे कौटुंबिक संबंध वाढविण्याचा प्रयत्न केला जातो. मोठमोठे उद्योगधंदे सुरू झाल्याकारणानें भौतिक परिस्थितींत बदल झाला असला तरी कामगारांचा जुन्या काळचा दृष्टिकोन अद्यापि कायमच आहे. ‘ कर्तव्य, जबाबदारी ’ या कल्पनांमुळें त्याचें स्वतंत्र व्यक्तिमत्व

---

1. G. E. Hubhard. Eastern Industrialisation and its effects on the West, Page 75.
2. Ibid, Page 121.

मारण्याचा प्रयत्न केला जातो आणि यालाच भांडवलदार ‘ शहाणा स्वार्थ ’ म्हणतात.*

जपानच्या या अर्थव्यवस्थेमध्यें आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. परदेशाच्या बाजारपेठेंत आपल्या देशांतील मालानें स्पर्धेत टिकावें यासाठीं जपानी सरकार प्रत्यक्ष मदत (subsidity) देत नाहीं. पण निर्यात व्यापाराला चालना देण्याचा नवीन उपाय जपाननें शोधून काढला आहे. या कापडाच्याच धंद्याचें उदाहरण घेतलें तर हबर्ड म्हणतो कीं, “ देशातील जनतेच्या उपयोगासाठीं जें सूत वापरलें जातें व परदेशांत जें पाठविलें जातें अशा दोघांना वेगवेगळ्या किंमती ठेवून निर्यात व्यापाराला लागणारी मदत गिऱ्हाइकाकडून अनिच्छेनें वसूल केली जाते. घरच्या गिऱ्हाइकांना परदेशी पाठविण्यात येणाऱ्या मालापेक्षां अधिक किंमत लावल्याकारणानें, परदेशच्या व्यापारांत कमी किंमतीमुळें जी तूट येते ती पुष्कळ जपानी गिरण्यांना भरून काढतां येते. अशा तऱ्हेची किंमतीमधील तफावत राखणें शक्य होतें याचें कारण देशांतील खपासाठीं कापड काढणारे लहान कारखाने सर्वस्वीं ‘ जपान कॉटन स्पिनर्स असोसिएशन ’ या संस्थेवर अवलंबून आहेत आणि ही संस्था त्यांना लागणाऱ्या सुतावर आपल्या मर्जीप्रमाणें किंमत आकारून मिळालेल्या नफ्याचा परदेशांत व्यापार वाढविण्याच्या कामीं उपयोग करीत

---

*हबर्ड यानें याविषयीं पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे :

“ In small enterprises, paternal relations are fostered between the master and his workmen by close personal contact. With the change of the scale in industry resulting from the rise of a modern capitalist economy, the relationship has undergone inevitable modifications without any fundamental change in the outlook of the workers. Ancient concepts of mutual responsibility and duty, deriving from an epoch in which the family was the national unit in all social and economic affairs, have simply been carried over into industrial life. The docility which many observers have noted in Japanese Workers has its roots here. Thus in jealously preserving the atmosphere of fundal loyalty in industrial life while suppressing all manifestations of an independent spirit the employer may feel that he is pursuing a policy of ‘ enlightened self-interest ’ : Ibid 122-23.

असते. " ( Hubbard, Eastern Industrialisation and its effects on the West, Page 80-81 ). जपाननें दाखविलेला हा ग्रामोद्योगाचा उपयोग या देशांतील भांडवलदारांना उपयुक्त वाटावा यांत नवल असें कांहींच नाहीं.

मुंबई योजनेचें बारकाईनें परीक्षण केल्यास या ग्रामोद्योगाबाबत जपानच्या अर्थव्यवस्थेशीं साम्य सांपडतें यावर भर देण्याचें कांहींच कारण नाहीं. आपल्या देशांत अद्यापि जुनें सरंजामशाहीचें वातावरण कायम आहे. कर्तव्य व धर्म यांची पक्कड जनतेच्या मनावर पक्की आहे. रूढींचें प्राबल्य कोठवर आहे याविषयीं वाच्यता देखिल करण्याचें कारण नाहीं आणि अद्यापि राजकीय चळवळींतहि स्वराज्य म्हणजे रामराज्य असा अर्थ लावला जातो. अर्थात् या मध्ययुगीन वातावरणांत उद्योगधंद्यांची वाढ झाली असतां जनतेच्या रहाणीचें मान उत्तरोत्तर कमी होत जाईल हें ओघानेंच प्राप्त होतें. आमच्या देशाची आर्थिक भरभराट अशा प्रकारें लोकांच्या वाढत्या दारिद्र्यावर होणार आहे. आणि स्वाभाविकच या योजनेंत राष्ट्रीय सरकारला आपलें अंतर्गत जीवन इतकें नियंत्रित करावें लागेल कीं त्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याला ' तात्पुरतें ग्रहण ' लागेल असें खुद्द योजकहि कबूल करतात. हें राष्ट्रीय सरकार कोणत्या पद्धतीनें योजना आखील त्याची दिशा औद्योगिक वाढीची जी कल्पना या योजनेंत मांडली आहे तीवरून स्पष्ट दिसून येण्यासारखी आहे.

सारांश, एक मार्ग नाझी योजनेच्या दिशेनें जात आहे आणि दुसरा मार्ग जपानी योजनेच्या दिशेनें जात आहे. दोनहि मार्ग ' सगळे रस्ते रोमला मिळतात ' या म्हणीप्रमाणें एकाच ठिकाणीं मिळतात आणि तें ठिकाण म्हणजे फासिझम. जर्मनींतील योजनेमुळें त्या देशांत एकदम शस्त्रास्त्रांची वाढ झाली व युद्धांत त्याचा शेवट झाला. जपानच्या अर्थव्यवस्थेंत देशांत दारिद्र्य व परदेशांत भरभराट असली ' वरतीं पाया व खालीं शिखर ' उलटी आर्थिक उन्नति अनुभवास आली आणि अखेर या वळचणीचें पाणी आढ्याला जाणाऱ्या उलट्या दिशेनें जाऊन जपानला कोरिया, मांचुरिया व अखेरीस चीन यांवर आक्रमण करण्याचा प्रसंग आला. जपानच्या आर्थिक उन्नतीचें हें पर्यवसान १९१२ नंतरच प्रामुख्यानें घडलें आणि आमच्या घनश्यामदास बिर्लांना साहजिकच ' तो इतिहास गैरलागू आहे '

( subsequent history is irrelevant ) असें वाटतें. पण त्यांना गैरलागू आहे असें वाटलें तरी कोश्यवधि जनतेच्या दृष्टीनें तो दाखला लागूच आहे; कारण, आक्रमणाचा प्रसंग आला असतांना बिर्ला किंवा त्याचे वरिष्ठ वर्गांतील जातभाई यांना कांहीं कुत्र्याच्या मोतीनें रणांगणावर मरावें लागणार नाहीं, मरावें लागणार सामान्य जनतेला. त्यांना फक्त परदेशांतील बाजारपेठा कशा काबीज करतां येतील याचें सुखस्वप्न पडतें आणि हें एकट्या बिर्लाशेटजींचेंच स्वप्न नाहीं, तर सध्यांच्या मध्यवर्ति कार्यकारी मंडळांतील एक सभासद श्री. ज्वालाप्रसाद श्रीवास्तव यांनाहि तीच सहसंवेदना होऊं लागलेली दिसते. युद्धोत्तर पुनर्घटना खात्याच्या 'जनरल पॉलिसी कमिटीपुढें' भाषण करतांना त्यांनीं जपानच्या बाजारपेठा आपल्याला काबीज करतां येतील असा आत्मविश्वास व्यक्त केला आहे " The time has come when we shall have to examine our trade relations with the outside world. India has made some advance industrially and there is every reason for India to look forward to development of her export market in finished goods in some of our neighbouring countries such as Burma, China, Malaya, Afganistan, Turky, Persia and Red Sea countries. Our trade relations with these countries will have to be viewed in that perspective. We should at all events be in a position to capture many of the Japanese markets. " पण हें सुखस्वप्न सत्यसृष्टींत अवतरलें तर सामान्य जनांची काय वाट ? त्यांची वाट आधीं दारिद्य व मागाहून युद्ध. मुंबई योजनेंतील औद्योगिक विकासाचें अखेर पर्यवसान अशा रीतीनें जनतेचें जीवन भकास करण्यांतच होईल यांत तिळमात्र संदेह रहात नाहीं.

× × ×

मुंबई योजनेंतील औद्योगिक विकासाचें चित्र कितपत आशादायक आहे याचा विचार केल्यानंतर आमच्या आर्थिक जीवनांतील महत्त्वाचा घटक शेती होय व त्यासंबंधीं योजनेंत काय योजना आहे याचा अवश्य विचार केला पाहिजे. ७० टक्के जनता ज्या धंद्यावर आपला गुजारा आज कसाबसा करीत आहे त्यांच्या जीवनांत तरी कांहीं आशेचे किरण चमकतील काय अशी स्वाभाविक अपेक्षा कोणत्याहि आर्थिक योजनेसंबंधीं निर्माण होते. मुंबईयोजनेनें ती आशा सफल होऊं शकेल का या प्रश्नाचें होकारार्थी अथवा

नकारार्थी उत्तर शोधण्यापूर्वी योजनाकारांचें यावर काय म्हणणें आहे तें प्रथम पाहूं. योजनेंत उद्योगधंदे, शेती व अवांतर पेशा या तीन विभागांची वाढ पुढीलप्रमाणें दिली आहे.* :—

| | निव्वळ उत्पन्न १९३१–३२ | निव्वळ उत्पन्न योजनेच्या अखेरीस | शेकडा वाढ |
|---|---|---|---|
| उद्योगधंदे | ३७४ | २२४० | ५०० |
| शेती | ११६६ | २६७० | १३० |
| पेशा(services) | ४८४ | १४५० | २०० |

(पान २४)

शेती व उद्योगधंदे यांच्या विकासांतिल इतकें अंतर कां पडलें पाहिजे याविषयीं योजनेंतील कारणांचा सारांश थोडक्यांत असा देतां येईल :

उद्योगधंद्यापेक्षां शेतीची वाढ कमी ठेवण्याचें कारण आपल्या देशांत उद्योगधंदे शेतीपेक्षां फार मागासलेल्या अवस्थेंत आहेत. उद्योगधंद्याच्या वाढीला लागणारें साहित्य भरपूर असूनहि त्याचा आजतागायत भरपूर उपयोग करून घेतलेला नाहीं. तेव्हां शेती व उद्योगधंदे या दोहोंमधलि आगाऊ पडलेलें अंतर भरून काढण्यासाठीं व दोहोंचें प्रमाण समतोल राखण्यासाठीं उद्योगधंद्याच्या वाढीवर अधिक भर देणें भाग आहे. शेतीच्या वाढीचें प्रमाण कमी राखण्याचें दुसरें कारण योजनाकारांच्या मतानें असें आहे कीं शेतीवर पिकणाऱ्या मालाची मागणी फारशी वाढणार नाहीं. आम्हीं जें रहाणीचें मान वाढविणार आहोंत व उद्योगधंद्याच्या वाढीसाठीं

*"But it has to be borne in mind that our industrial potentialities have to a great extent remained unexploited so far, and adequate provision to make up this lag in industrial development would naturally mean a large percentage increase over the present level. On the other hand, as the demand for food crops which form the bulk of our agricultural products is comparatively inelastic, even after taking into account the probable increase in population and the higher level of income which the plan will bring about and the larger demand for industrial raw materials, it is not likely that more than 130 percent increase will be absorbed within the country." Plan P. 24.

जो कच्चा माल वाढत्या प्रमाणावर लागेल त्या सर्वांची वाढ धरूनहि १३० टक्क्यांपेक्षां अधिक प्रमाणांत शेतीच्या मालाला मागणी रहाणार नाहीं. तिसरें व अखेरचें कारण योजनेंत असें दिलें आहे कीं आपल्या देशाला धान्य इ० आवश्यक वस्तूंकरितां इतर देशांच्या तोंडाकडे बघण्याचा प्रसंग येऊं नये इतकीच वाढ करण्याची कल्पना गृहीत धरलेली आहे.

## योजनेंतील वाढ एकांगी

या तीन कारणांपैकीं पहिलें कारण आपल्या मनांत शेतीची वाढ औद्योगिक वाढीपेक्षां फार झालेली आहे असा ग्रह निर्माण करते आणि हा ग्रह चुकीचा आहे हें आमच्या आर्थिक परिस्थितीचा विचार केल्यास दिसून येईल. हिंदुस्थानांत दारिद्र्य आहे याचें प्रमुख कारण हा देश शेतीप्रधान आहे ही कल्पना आपल्यामध्यें इतकी रूढ व लोकप्रिय झाली आहे आणि त्यामुळेंच आमचें दारिद्र्य नाहींसें करावयाचें असेल तर शेतीवर भर न देतां औद्योगिक वाढीवर भर दिला पाहिजे हा उपायहि इतका बद्धमूल झाला आहे कीं त्याविषयीं साधकबाधक विचार करणें हें फार नाजुक काम होऊन बसलें आहे. तथापि लोकप्रिय कल्पना नेहमींच बरोबर असतात असें नाहीं, किंबहुना त्या नेहमीं बरोबर नसतात हेंच म्हणणें अधिक सयुक्तिक ठरेल. आणि लोकप्रिय कल्पना बरोबर नसतात यासाठींच त्या तावून सुलाखून पारखण्याची गरज अधिकच भासते. त्या दृष्टीनें प्रस्तुत शेतीच्या वाढीच्या कल्पनेचें किंवा लोकभ्रमाचें परीक्षण करावयास हवें.

शेतीपेक्षां हिंदुस्थानांत औद्योगिक वाढीवर भर दिला पाहिजे असें योजनाकार ज्या वेळीं म्हणतात त्यावेळीं त्यांनीं आर्थिक दृष्ट्या हिंदुस्थानचे दोन तुकडे पाडलेले आहेत असें दिसेल. एक शेतीप्रधान हिंदुस्थान आणि दुसरा औद्योगिक हिंदुस्थान. आणि मग 'समतोलीचें अर्थशास्त्र' (balanced economy) आपणास असें सांगते कीं या दोहोंचें सध्यांचें प्रमाण एकांगी असल्याकारणानें आमच्यावर आर्थिक आपत्ति ओढवल्या आहेत, यासाठीं हें प्रमाण समतोल करण्याची गरज आहे व तसें समतोल करण्यासाठीं औद्योगिक वाढीवर भर दिला म्हणजे झालें. या युक्तिवादांत मुळांत चूक अशी कीं आमच्या आर्थिक जीवनाचे असे कृत्रिम रीतीनें दोन भाग

केले. या कृत्रिम फाळणीनें आमच्या आर्थिक जीवनाचें विपर्यस्त चित्र आमच्या समोर उभें केलें जातें. वस्तुस्थिति अशी आहे कीं हे दोनहि विभाग आमच्या अर्थव्यवस्थेचे सजीव घटक आहेत; त्यांचा एकमेकांशीं संबंध शरीर व त्याचे अवयव यांमधील संबंधासारखा आहे. जर आर्थिक जीवन सुधारावयाचें असेल तर दोनहि विभागांत सुधारणा घडवून आणणें इष्ट आहे.

औद्योगिक वाढीवर भर देतांना मुंबई योजनेंत दुसरी एक चुकीची कल्पना अशी गृहीत धरलेली दिसते कीं या देशांत उद्योगधंद्याच्या मानानें शेतीचीवाढ बरीच झालेली आहे. या कल्पनेशिवाय 'balanced economy' समतोल प्रमाण राखण्याची भाषाच या ठिकाणीं लागू पडत नाहीं. पण शेतीची वाढ उद्योगधंद्याच्या मानानें बरीच झाली आहे असें मानणें वस्तुस्थितीला धरून आहे काय ? शेतीच्या बाबत या देशांत वस्तुस्थिति अशी आहे कीं शेतीवर बहुसंख्य लोक आपला गुजारा करीत असतात. आतां हा फरक विशद करण्याची कांहीं गरज नाहीं कीं बहुसंख्य लोक शेतीवर जगतात ही गोष्ट वेगळी आणि शेतीची वाढ झाली आहे असें मानणें वेगळें. ७० टक्के लोक शेतीच्या धंद्यावर जगतात म्हणून शेतीची वाढ बरीच झाली आहे हा समज निर्माण होणें स्वाभाविक असेल; पण शास्त्रीय विचाराच्या दृष्टीनें तो गैरसमज आहे हेंहि त्याबरोबरच सांगितलें गेलें पाहिजे. वस्तुस्थिति अगदीं विपरीत आहे. बहुसंख्य लोक ज्या शेतीवर उपजीविका करतात ती शेती मागासलेल्या अवस्थेंत आहे हेंच खरें हिंदी जनतेच्या दारिद्र्याचें कारण आहे आणि तें आमच्या दारिद्र्याचें कारण आहे इतकेंच नव्हे तर हिंदुस्थान औद्योगिक दृष्ट्या मागासला राहण्याचेंहि खरें कारण तेंच आहे. यासाठीं आमचें आर्थिक जीवन शेतीच्या मानानें औद्योगिक दृष्ट्या मागासलेलें आहे असें मानणें चूक असून शेती व उद्योगधंदे या दोनहि दृष्टींनीं आमचें जीवन मागासलेलें आहे हेंच विधान सत्यस्थितीचें निदर्शक ठरेल. या अभागी देशाचें आर्थिक जीवन एकट्या औद्योगिक दृष्ट्याच काय, पण सर्व दृष्ट्या मागासलेलें आहे.

याहीपुढें एक पाऊल जाऊन मुंबई योजनेवर असा साधार आक्षेप घेतां येईल—आणि तो या ठिकाणीं घ्यावयाचा आहे—कीं मुंबई योजनेप्रमाणें जर

या देशांतील आर्थिक जीवनाची वाढ झाली तर तीच खरीखुरी एकांगी वाढ ठरेल. कारण या देशांत औद्योगिक विकास होऊं शकला नाहीं याचें प्रमुख कारण देखील या देशांत शेतकऱ्याचें आर्थिक जीवन सुधारलें नाहीं. अर्थात् विकासाविकासाच्या कल्पनेंत फरक असतो. जर आर्थिक विकास या शब्दानें खाणें, पिणें, वस्त्रप्रावरण, निवाऱ्याची जागा, औषधपाणी, लिहावयास वाचावयास येणें इत्यादि किमानपक्षीं प्राथमिक गरज भागणें असा असेल तर कोणत्याहि योजनेंत शेतीचा विकास हाच आमच्या औद्योगीकरणाचा भरभक्कम पाया ठरतो. या देशांत उद्योगधंद्याच्या वाढीस कोणती गोष्ट आड येत आहे याचा शास्त्रीय दृष्टीनें विचार होणें जरूर आहे. तसा विचार केला तर या देशांतील बहुसंख्य शेतकऱ्यांचें अठराविश्वे दारिद्र्य हीच खरीखुरी औद्योगीकरणाच्या मार्गांतील धोंड आहे. औद्योगिक वाढीचा आतांपर्यंतचा इतिहास देखील हेंच सत्य निरपवाद रीतीनें पटवूं शकेल. लोखंड व पोलाद यांच्या कारखान्यांची आतांपर्यंत सतत वाढ होत आली; पण तेंच कापड, साखर इ॰ भोग्य पदार्थांच्या कारखान्यांची स्थिति युद्धापूर्वी काय होती ह्याचा विचार केला तर प्रमाणाबाहेर या पदार्थांचें उत्पादन झालें म्हणून या कारखान्यांना टाळे लावण्याची पाळी आली होती आणि त्याच वेळीं शेंकडा ८० टक्के जनता ब्रोटभर चिंधीशिवाय किंवा औंसभर साखरेशिवाय आपलें दरिद्री जीवन कंठीत होती असेंच दिसत होतें. त्या वेळीं आमच्या कारखान्यांवर कारखाने बंद करण्याची पाळी आली. कारण हिंदी बाजारपेठेंत परदेशचा माल येत आहे; त्याचबरोबर बाल्यावस्थेंतील आमच्या हिंदी उद्योगांनीं टक्कर कशी द्यावी, तेव्हां 'संरक्षक जकात', संरक्षक जकात' असा एकच गिल्ला राष्ट्रभक्तांनीं व कारखानदारांनीं करण्यास सुरवात केली. पण राजकीय चळवळीच्या भावनेचा आवेग क्षणभर बाजूला ठेवला व शांतचित्तानें 'संरक्षणा'चा अर्थ काय होतो याचा विचार केला तर संरक्षण म्हणजे मालाच्या किंमतींत वाढ आणि मालाच्या किंमतींत वाढ म्हणजे आणखी बाजारपेठ आकसणें हें साधें समीकरण आपल्या मनःश्चक्षूसमोर उभें राहिलें असतें. औद्योगीकरणाच्या या गत इतिहासावरून तरी ७० टक्के शेतकरी चार पैसे खिशांत बाळगून राहिल्याशिवाय उद्योगधंद्यांची वाढ होणें शक्य नाहीं या सत्याची

प्रचीति कोणासहि येईल. यावरून शेतीची वाढ न करतां औद्योगिक वाढीचें ध्येय जी मुंबई योजना पुढें मांडीत आहे तीच खरी या देशांत एकांगी वाढ करीत आहे या आक्षेपांची सत्यता पटण्यास हरकत नाहीं; आणि ती औद्योगिक वाढ देखील मागील इतिहासाच्या दाखल्यावरून लोखंड, पोलाद, वीज इ. धंद्यांचीच होऊं शकेल; कापड, साखर इ. जीवनाला आवश्यक वस्तू तयार करणाऱ्या कारखान्यांची वाढ होणार नाहीं हें या ठिकाणीं ध्यानांत घेणें आवश्यक आहे.

तथापि शेतीची वाढ मुंबई योजनेंत इतकी कमी बळेंच केलेली नाहीं. योजनेचीं सर्व अंगें एकमेकांशीं निगडित आहेत. ज्या स्वरूपाची व ज्या तत्त्वावर औद्योगिक वाढ या योजनेंत होऊं शकेल त्या स्वरूपानेंच शेतीची वाढहि मर्यादित होणार. औद्योगिक वाढीच्याबाबत आपण असें पाहिलें कीं, चालू आर्थिक जीवनाची घडी न पालटतां उद्योगधंदे एका विशिष्ट दिशेनेंच वाढणार. ती दिशा कोणती याचेंहि नक्की ज्ञान आपणांस झालें. त्या दिशेनें जनतेच्या दारिद्र्याचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटत नाहीं हें निश्चित झालें. आणि त्यामुळेंच शेतीची वाढहि योजनाकारांना अधिक धरणें अशक्य झालेलें आहे. याच आक्षेपांची पर्यायानें कबुली 'शेताच्या मालाची मागणी पर्यायानें स्थिर असते' असा शेरा मारून योजनाकारांनीं दिलेली आहे. १३० टक्के वाढीपेक्षां या देशांतील बाजारपेठेंत शेतीच्या मालाला मागणी कां येऊं नये? ती स्थिर कां रहावी? हे प्रश्न आपण उपस्थित केले कीं योजनेचा एकांगीपणा ताबडतोब पटूं लागतो. आम्ही रहाणीचें मान वाढविणार आहोंत व त्यामुळें शेतीच्या मालाला मागणी वाढेल ही गोष्ट खरी असली तरी ती १३० टक्क्यांपेक्षां अधिक रहाणार नाहीं असें जेव्हां योजक म्हणतात तेव्हां त्यांतील रहस्य हेंच कीं रहाणीचें मानहि या प्रमाणापेक्षां अधिक वाढणार नाहीं आणि किमान रहाणीचें मान योजनाकारांच्या मतानें चालू परिस्थितीपेक्षां २५ टक्क्यांनीं वाढणार असल्याकारणानें १३० टक्के वाढ त्या प्रमाणानें बरोबर ठरेल. तसेंच औद्योगिक वाढीनें कच्चा माल अधिक लागणार हें जरी खरें असलें तरी ज्या प्रकारचे उद्योगधंदे वाढणार त्याच प्रकारचा कच्चा माल लागणार हेंही त्याबरोबर विसरून चालावयाचें नाहीं. मुंबईयोजनेंत लोखंड, पोलाद, वीज, रासायनिक द्रव्यें या धंद्यांची वाढ

चौपटीनें होणार असल्याकारणानें कापूस, ऊस, ताग इ० कच्च्या मालाची पैदास त्या योजनेंत बसूं शकत नाहीं हें तर उघडउघड दिसतें. सारांश, योजनाकार म्हणतात त्याप्रमाणें शेती व उद्योगधंदे यांचें प्रमाण समतोल राखण्यासाठीं म्हणून नव्हे; तर रहाणीचें मान विशिष्ट मर्यादेबाहेर वाढलें जाणार नाहीं म्हणून, भोग्य वस्तूपेक्षां उत्पादक वस्तूंचे कारखाने वाढणार म्हणून शेतीची वाढ १३० टक्के योजनाकारांना धरावी लागत आहे. अर्थात् औद्योगिक वाढीप्रमाणेंच ही वाढहि असमाधानकारक आहे इतकेंच नव्हे तर ' गरिबांना अधिक गरीब व श्रीमंतांना अधिक श्रीमंत ' बनविणारी आहे असा यावर रास्त आक्षेप येतो.

## मूलग्राही सुधारणा

ही जी शेतीच्या विभागाबद्दल योजनेवर सामान्य टीका केली ती तपशिलांत जर आपण शिरूं लागलों तर अधिकच दृढ होते. तपशिलाची अशा प्रकारें छाननी करण्यापूर्वी शेतीच्या सुधारणेबाबत एक दोन महत्त्वाच्या बाबींचा उल्लेख करणें आवश्यक आहे. शेतकऱ्यांच्या दारिद्र्याचें निदान आज कित्येक वर्षें होत आलेलें आहे. अनेकांनीं अनेक प्रकारें केलेल्या निदानामधून महत्त्वाच्या व मूलभूत दोन गोष्टी निघतात. एक शेतीवरील वाढतें दडपण आणि दुसरी शेतकऱ्याच्या उत्पन्नांतील मोठा हिस्सा त्याजपासून अनेक मार्गांनीं निघून जाणें. शेतीवर दडपण आलें ही अर्थशास्त्रीय परिभाषा आहे. त्याचा थोडक्यांत अर्थ असा सांगतां येईल कीं, सामान्यतः एका एकर जमिनींतील उत्पन्नावर जितके इसम सुखानें उदरनिर्वाह करूं शकतात त्यापेक्षां अधिक इसमांना त्याच उत्पन्नांत उपजीविका करण्याचा प्रसंग आला कीं त्या एक एकर शेतीवर दडपण आलें. म्हणजे शेतीवर दडपण आलें याचा अर्थ शेतीचें उत्पन्न फार मोठ्या प्रमाणावर वाटलें जाते असा होतो. त्यानंतर दुसरें निदान सहज समजण्यासारखें आहे. शेतकऱ्याच्या उत्पन्नाला खंड, सारा, व्याज व कारखानदारांचा नफा या चार वाटांनीं गळती लागली आहे व त्यामुळें त्याच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करणें त्याला मुष्कील झालें आहे. शेतकऱ्याच्या दारिद्र्याचीं व शेतीच्या मागासलेल्या अवस्थेचीं हीं दोन कारणें प्रमुख दिसतात, त्यावर उपाय-

योजनाहि तितकीच स्पष्ट आहे. शेतीवरील दडपण कमी करण्यासाठीं दोन मार्ग आहेत. एक औद्योगीकरणाचा. उद्योगधंदे वाढले तर शेतीवरील जगणारी लोकसंख्या कमी होऊं शकले. आणि दुसरा मार्ग शेतीवरील उत्पन्न वाढविण्याचा. शेतीचें उत्पन्न आज कमी आहे याचें कारण शेती मागासलेल्या साधनांनीं होते हें सर्वमान्य व सर्वश्रुत आहे. यासाठीं शेतीवर होणाऱ्या श्रमांची उत्पादक शक्ति वाढविणें ( to increase the productivity of labour on land ) हाच एक मार्ग यांतून निघतो. पण हा मार्ग स्वीकारण्यासाठीं शेती अद्यावत् साधनांच्या साहाय्यानें कसली जाणें आवश्यक आहे. अशा रीतीनें शेतीची मशागत नवीन यांत्रिक साधनांनीं होईल तर शेतीवर आज जितक्या लोकांना खपावें लागतें त्यापेक्षां कमी लोक त्या शेतीस लागतील व औद्योगीकरणासाठीं हवी असलेली श्रमशक्ति आपणांस मिळूं शकेल; आणि त्याचबरोबर शेतीचें उत्पन्न वाढून लोकांचें दारिद्र्य नष्ट करण्याला म्हणजेच त्यांचें रहाणीचें मान वाढण्याला अनुकूल भूमिका तयार होऊं शकेल. ७० टक्के शेतकऱ्यांचें रहाणीचें मान वाढणें याचाच दुसरा अर्थ देशांतील उद्योगधंद्यांच्या वाढीसाठीं जरूर असलेली बाजारपेठ अधिक विस्तार पावणें असा होतो. पण ही बाजारपेठ रुंदावण्यासाठीं शेतीचें नुसतें उत्पन्न वाढून काम भागणार नाहीं. त्यासाठीं वाढलेलें उत्पन्न शेतकऱ्यांच्या हातांत रहाण्याची व्यवस्था होण्याची गरज आहे. या ठिकाणीं दुसऱ्या कारणावर उपाययोजना होणें आवश्यक ठरतें. त्याच्या उत्पन्नाला लागलेली गळती थांबविण्याची उपाययोजना तावडतोब व्हावयास हवी. आज त्याच्या उत्पन्नाला गळती लागण्याचें प्रमुख कारण त्याच्या उत्पन्नाला खंड व व्याज या वाटांचीं मोठीं भगदाडें पडलीं आहेत; तीं तावडतोब बुजविलीं गेलीं पाहिजेत. तीं थांबविण्यासाठीं आजच्या जमीनधाऱ्याच्या पद्धतींत आमूलाग्र बदल व शेतकऱ्यांचें ऋणविमोचन या दोन मूलग्राही सुधारणा होणें अत्यंत निकडीचें काम होऊन बसलें आहे.

## केवळ शाब्दिक समाधान

आपल्या देशांतील ७० टक्के जनतेच्या आर्थिक विकासाचें यशापयश वरील मूलभूत सुधारणा घडून येण्यावर अवलंबून आहे. मुंबई योजनेमध्यें

या दृष्टीनें काय उपाय योजले आहेत याचा विचार केला तर यांपैकीं एकहि योजना त्यामध्यें सांपडत नाहीं असेंच उत्तर द्यावें लागेल. ‘ शेतीचें उत्पादन वाढविण्यासाठीं कांहीं मूलग्राही सुधारणा करावयास हव्यात ’ अशा उदात्त ध्येयाच्या घोषणेनें केवळ शाब्दिक समाधान करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. हें ध्येय ऐकल्यानंतर आशेनें त्या योजनेचा पुढें विचार करावा तों त्यामध्यें जमिनीची तुकडेवारी, जमीन लागवडीस निकामी होणें, शेतकऱ्याचा कर्ज-बाजारीपणा या कारणांचा नामनिर्देश करून ती नष्ट करण्याच्या सुधारणा सुचविल्या आहेत. जमिनीची तुकडेवारी थांबविण्यासाठीं ‘ सहकारी शेतीचा क्रांतिकारक (?) उपाय ’ सुचविण्यांत आलेला आहे. योजनाकारांनीं हा उपाय सुचवितांना आज शेतीवरील मालकी हक्कांत मूलभूत फरक झाल्याशिवाय सह-कारी शेतीचा उपाय व्यवहार्य ठरूं शकत नाहीं ही गोष्ट लक्षांत घ्यावयास हवी. उत्पन्न शेतकऱ्याच्या हातांतच रहात नाहीं म्हणून शेतीचें उत्पन्न वाढवावें ही प्रेर-णाहि त्याची नष्ट झालेली आहे. सहकारी शेतीच्या साहाय्यानें उत्पन्न वाढलें तरी सावकाराचें कर्ज, जमीनदारांचा खंड इ०वाटे त्यांतील मोठा हिस्सा बळका-वणार असें शेतकऱ्याला दिसेल तर तो आपखुषीनें सहकारी शेतीच्या प्रयोगांत सामील होईल असें दिसत नाहीं. योजनेच्या प्रवर्तकांना या गोष्टीची जाणीव आहे असें दिसतें. म्हणून ते म्हणतात, “ सहकारी शेतीचा प्रयोग शक्य तितक्या लवकर अमलांत येण्यासाठीं थोडीफार सक्ती करण्याची गरज दिसते ” (“ In order that co-operative farming should come into vogue as early as possible, some measure of compulsion appears desirable ”.) ही सक्ति राष्ट्रीय सरकार करणार हेंहि त्याबरोबरच उघड आहे. यावरून राष्ट्रीय सरकारचें काय स्वरूप राहील याची कल्पना येण्यास हरकत नाहीं. ही सक्ति करून तरी कार्यभाग साधेल काय ? योजनेच्या प्रवर्तकांच्या दृष्टीनें कदाचित् साधेल. शेतीचें उत्पन्न थोडेंबहुत वाढेल, पण शेतकऱ्याच्या दारिद्र्याच्या दृष्टीनें आजची समाजव्यवस्था व अर्थव्यवस्था कायम टिकवून त्यांत कांहींहि फरक होणार नाहीं. *

* वाडिया आणि मर्चंट या लेखकद्वयानें आपल्या ग्रंथांत याविषयीं पुढील उद्गार काढलेले आहेत :

( पुढील पानावर पहा )

सहकारी शेतीच्या प्रयोगाचें भावितव्य काय होईल हें पाहिल्यानंतर मुंबई योजनेमध्यें शेतीचें उत्पन्न वाढविण्यासाठीं इतर काय सुधारणा सुचविल्या आहेत याकडे दृष्टिफेक केली तरी दारुण निराशाच पदरीं पडेल. त्यांनीं सुचविलेल्या सर्व सुधारणांचें मोजमाप खालील कोष्टक दाखवितें. :—

(आंकडे कोटी रुपयांचे)

| | कायमचें गुंतविलें जाणारें भांडवल | दरसाल होणारा खर्च |
|---|---|---|
| जमीन टिकविण्यासाठीं | २०० | १० |
| हत्यारें, बींबियाणें यासाठीं लागणारें चालू भांडवल | — | २५० |
| कालवे व पाटबंधारे | ४०० | १० |
| विहिरी | ५० | — |
| नमुनेदार शेती | १९५ | १३० |
| एकूण | ८४५ | ४०० |

या कोष्टकावरून योजनेंत प्रथम कालवे पाटबंधारे, नंतर जमीन टिकविण्याचे उपाय व त्याच्या खालोखाल नमुनेदार शेती या उपायांवर भर दिलेला दिसतो. शेतीवरील श्रमाची उत्पादकता वाढविण्यासाठीं यांपैकीं एकहि किंवा सर्व उपाय मिळून पुरेसे नाहींत. ट्रॅक्टर्स, वेगवेगळीं खतें इ. अद्यावत् साधनांचा तर चुकून कोठें उल्लेखहि नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर शेतीचें यंत्रीकरण करण्याची योजना पद्धतशीर रीतीनें मुंबई योजनेंत सांपडत नाहीं. आहे हींच मागासलेलीं साधनें शेतकरी वापरीत रहाणार. त्याला कालव्याची थोडीबहुत मदत मिळून, जमीन शाबूत राखण्यासाठीं

---

(मागिल पानावरून चालू)

" It might be safely stated that even compulsory co-operative farming, within the limits of the present socio-economic structure, with all the aid that it can receive from the state in matters of seeds, implements and credit cannot cope successfully with the problem of our deficit agricultural economy, so long as our agriculture continues to be dependent on competent prices. "

—Our Economic Problem, Page 182.

थोडें साहाय्य देऊन आणि नमुनेदार शेतीचें प्रदर्शन दाखवून थोडें उत्पन्न वाढविण्याच्या कामीं मदत होईल इतकेंच. यापेक्षां मोठ्या प्रमाणावर शेतीचा विकास व्हावयाचा असेल तर सोव्हिएट योजनेप्रमाणें सामुदायिक शेतीचा प्रयोग फार मोठ्या प्रमाणावर होण्याची गरज आहे. पण यासाठीं जमीन-धाऱ्याच्या पद्धतींत व सावकारपद्धतींत व सावकारशाहींत आमूलाग्र बदल होण्याची आवश्यकता आहे त्याची काय वाट ? सोव्हिएट योजनेंत प्रथमच 'सावकार व जमीनदार' यांचे हितसम्बंध नाहींसे करण्यांत आले होते; मुंबई–योजना काय करणार ?

## कर्जमुक्ततेची अभिनव योजना !

या प्रश्नाला उत्तर म्हणून योजनाकार आपल्या कर्जविमोचनाच्या अभिनव योजनेकडे बोट दाखवितील हें आम्ही जाणून आहोंत. पण ही योजना बारकाईनें तपासूं लागलों तर शेतकरी या योजनेमुळें खरोखरी कर्ज-मुक्त होणार आहे का त्याच्या जीवनाभोंवतीं सावकारी पाश करकच्च आवळले जाणार आहेत याची जबरदस्त शंका वाटते, आणि शंका कशाला, सावकाराची पक्कडच अधिक मजबूत होणार याविषयीं शंकादेखील उरत नाहीं. या योजनेची सुरुवात प्रथम अशी केली आहे कीं गेल्या दोन तीन वर्षांत शेतीच्या मालाच्या किंमती वाढल्याकारणानें शेतकऱ्याचें कर्ज बऱ्याच प्रमाणांत कमी झालेलें आहे. (" The debt whieh was estimated at Rs. 1200 crores has since been probably reduced to a considerably smaller figure as a result of the favourable prices realised by agriculturists during the last two years. " Page-31. ) युद्धकालीन आर्थिक स्थितीचा विचार करतांना शेतकऱ्याला, प्रत्यक्ष जमीन कसणाऱ्याला, वाढलेल्या किंमतीचा फायदा मिळालेला आहे हें योजनाकारांचें म्हणणें सर्वस्वी वस्तुस्थितीला सोडून आहे. शेतीच्या मालाचे भाव वाढले कीं उत्पादक शेतकऱ्यालाच त्याचा फायदा मिळतो हें विधान कशाच्या आधारावर योजनाकार करतात ? या देशातील शेतकऱ्याला कर्ज, खंड, सारा इ. देणें रोख पैशांत मोजावें लागत असल्याकारणानें पिकलेला माल त्याला बाजारांत न्यावा लागत असतो आणि त्या बाजारांत मालाची गाडी नेल्यानंतर व्यापारी त्याला जी किंमत देईल ती

किंमत घेऊन परत जावें लागतें. व्यापार हा धर्मादाय नाहीं, त्याचें मूलतत्त्व नफा आहे एवढें साधें तत्त्व योजनाकारांना माहीत असेल तर शेतकऱ्याचा माल पाडून मागणें हाच व्यापाऱ्याचा त्या ठिकाणीं प्रमुख हेतु असतो हें सत्य त्यांना कळण्यास अडचण पडणार नाहीं. खरेदीची किंमत आणि विक्रीची किंमत यांत जितकें अंतर अधिक तितका व्यापाऱ्याचा नफा अधिक हा साधा तोंडचा हिशेब योजनेच्या भांडवलदार प्रवर्तकांना माहीत नसावा असें म्हणण्याचें धाष्टर्य आम्हांस करवत नाहीं. बरें, ठराविक किंमत येईपर्यंत मी धान्याची गाडी विकणार नाहीं असा हट्ट धरून शेतकरी बाजारांत बसेल, तर दुसऱ्या दिवशीं सावकाराची फिर्याद दाखल होण्याचा संभव असतो. कदाचित् माल विकत घेणारा व्यापारीच सावकार या नात्यानें कोर्टात दाखल होण्याचा संभव असतो; पुष्कळ वेळां बींबियाणें यासाठीं शेत पिकविण्याच्या अगोदर कर्ज देऊन सावकार पीकच गहाण या सदरांत आपल्याकडे घेत असतो. शेतकऱ्याच्या आर्थिक परिस्थितींतील हा गुंतागुंतीचा व्यवहार आपण ध्यानांत आणल्यास युद्धामुळें चढलेल्या किंमतीचा फायदा शेतकऱ्याला मिळाला आहे व त्यामुळें त्याचें बरेंच कर्ज कमी झालें आहे असें मानणें ही शुद्ध परवंचना नि आत्मवंचना आहे. उलटपक्षीं कच्चा माल व धान्य यांच्या वाढलेल्या किंमतीचा फायदा त्याला मिळालेला नाहींच आणि पक्क्या मालाच्या किंमतींतहि तिप्पट, चौपट वाढ झाल्याकारणानें उत्पन्नापेक्षां त्याचा खर्च अधिक वाढला व त्यामुळें कर्जबाजारीपणा कमी होण्यापेक्षां तो वाढलेलाहि असेल.

जर आजच्या युद्धपरिस्थितींतहि कर्जमुक्ततेच्या बाबींत कशाची गरज असेल तर युद्धापूर्वी घेतलेल्या कर्जांच्या रकमा आजच्या महागाईत कमी करावयास हव्यात हें वरील विवेचनावरून दिसून येईल. योजना हें सत्यच नाकारीत असल्याकारणानें हा प्राथमिक स्वरूपाचा न्याय शेतकऱ्याला त्यांनीं सुचविलेल्या योजनेंत मिळण्याची आशा नाहीं. कारण कर्ज अगोदरच कमी झालें आहे असें गृहीत धरून ते चालतात. तथापि तोंडाला पानें पुसण्यासाठीं योजनाकारांनीं हें कर्ज आजच्या किंमतीच्या सरासरींत आणखी कमी करण्याची शक्यता लवादमंडळामार्फत कदाचित् आहे असें वरवरचें समाधान सांगितलें आहे ( " it is perhaps possible to reduce this further by

means of conciliation." –page 31. ) लवादामार्फत कर्ज कसें कमी होतें याचा अनुभव आजपर्यंत कांहीं कमी नाहीं. या लवादांत ज्या सावकाराचें कर्ज कमी करावयाचें आहे तोहि येणार. कारण बोलून चालून हा तडजोडीचा मामला आणि ज्याचें कर्ज खालीं उतरावयाचें त्यालाच विचारावयाचें कीं तुम्ही दिलेल्या कर्जाची रक्कम किती कमी करावयाची ? या प्रश्नाचें काय उत्तर येईल याची कल्पना करण्यास फारसे श्रम पडणार नाहींत. त्या लवाद मंडळांत ऋणको कांहीं बोलल्यास गांवांतील प्रतिष्ठित मंडळीच्या त्या लवादांत त्याच्या म्हणण्याला किती किंमत दिली जाते हा देखील अनुभव सार्वत्रिक आहे. यासाठीं लवादमंडळाचा उपायहि दिशाभूल करणारा आहे.

यानंतर कर्जमुक्ततेच्या उपायाकडे पाहिलें तर तो उपाय म्हणजे सरकारी पतपेढ्यांची संघटना. ( " The liquidation of debt should be arranged principally through co-operative societies, which would require to be suitably organised for the purpose and provided with sufficient long-term finance " Page 31 ). प्रचलित सरकारनें सहकारी पतपेढयांचा जो प्रयोग करून पाहिला त्याचा अनुभव जमेस धरला तर हा प्रयोग आशादायक नाहीं इतकेंच नव्हें तर निराशाजनक आहे असाच निर्णय द्यावा लागेल. योजनेंत अभिप्रेत असलेलें राष्ट्रीय सरकार कांहीं त्यांत इष्ट सुधारणा घडवून आणील असें मानण्यास आधार नाहीं; उलटपक्षीं तो अधिक घातक ठरेल असें मानण्यास मात्र भरपूर जागा आहे असें या योजनेंतील उपायांवरून स्पष्ट दिसतें. या सहकारी पतपेढयांना भांडवलाचा पुरवठा कोठून होणार याविषयीं योजनेंतील तरतूद पाहिली असतां ही योजना कर्जमुक्ततेची आहे का सावकारी पाश अधिक बळकट करण्याची आहे याची जबरदस्त धास्ती वाटूं लागते. प्रथमच 'एकाचें कर्ज म्हणजे दुसऱ्याची ठेव' असा कर्ज या शब्दाचा खुलासा करून या पतपेढयांना लागणारें भांडवल कर्ज देणाऱ्या सावकार वर्गाकडून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें मिळूं शकेल असा आशावाद योजनेंत व्यक्त केला आहे; आणि तो बरोबरच आहे. पण या आशावादाचा मथितार्थ इतकाच कीं, सावकार वैयक्तिक स्वरूपांत शेतकऱ्यांकडून कर्जवसुली करणार नसून ते संघटित रीत्या कर्जवसुलीची उपाययोजना करणार. आणि कोणता सावकार या

योजनेला विरोध करील ? सहकारी पतपेढी शेतकऱ्याला कर्ज देणार आणि सावकार या पतपेढ्यांना कर्ज देणार. पतपेढ्यांचा संसार लक्षांत घेतला तर या पतपेढ्यांचें कार्य काय राहील याविषयीं शंका बाळगण्याचें कारण रहात नाहीं. सावकारांना आपलें कर्ज सुरक्षित असल्याची हमी मिळाली; विशिष्ट दरानें व्याज मिळणार याचीहि खात्री पटली आणि मदतीचे दावे, त्यांचे खर्च व दगदग व पुनः हप्तेबंदीनें वसुली हा सर्व खटाटोप वांचला यापेक्षां सावकारांना तरी अधिक काय हवें आहे ? शेतकऱ्यांची परिस्थिति ही पतपेढ्यांची योजना अंमलांत आल्यावर काय राहील याचा विचार करतांना देखील कल्पनाशक्तीला फारसा ताण द्यावयास नको. प्रत्यक्ष सावकाराकडून कर्ज घेतल्यास जें व्याज द्यावें लागेल त्यापेक्षां पतपेढ्यांना अधिक दरानें व्याज द्यावें लागेल. कारण सावकाराचें व्याज आणि पतपेढ्याच्या व्यवस्थेचा खर्च या दोनहि गोष्टी त्याच्या माथीं बसणार. आणि त्यांतहि पतपेढ्यांचा खर्च काय असूं शकेल याची कल्पना केली तर असें दिसेल कीं जागाभाडें, बँकेंतील नोकरांचा पगार, कर्जाऊ भांडवलाचें व्याज या खर्चाशिवाय जे शेतकरी वेळच्या वेळीं कर्ज परत करूं शकणार नाहींत त्यांवर करावी लागणारी फिर्यादअर्याद या सर्वांचा खर्चहि 'व्यवस्था खर्च' या सदरांत येऊं शकतो. अशा रीतीनें सावकारांना कर्जाची हमी देऊन शेतकऱ्यांकडूनच त्यांच्यावर कर्जवसुलीबाबत होणाऱ्या कायदेशीर खर्चवसुलीची तजवीज म्हणजे सहकारी पतपेढ्यांची कर्जमुक्ततेची योजना होय. हें पाहिल्यानंतर आपलें कर्ज कधींकाळीं नाहींसें होईल अशी शेतकऱ्याला न्याय्य आकांक्षा बाळगतां येईल काय ?

### जमीनदारीविषयीं मात्र मौन

कर्जमुक्ततेच्या नांवाखालीं सावकारांची मगरमिठी शेतकऱ्याभोवतीं अधिकच घट्ट होणार हें पाहिल्यानंतर त्याच्या आर्थिक जीवनांतील दुसरी बाब खंडाची दिसते; आणि त्याविषयीं योजनेंत संपूर्ण मौन पत्करलेलें आहे. शेतीवरील मालकीहक्क या देशांत विविध प्रकारचे आहेत. कांहीं ठिकाणीं ( संयुक्तप्रांत, बंगाल, बिहार इ० ) जमीनदारी पद्धति आहे; कांहीं प्रांतांत रयतवारी पद्धति आहे तर इतर ठिकाणीं अर्धवट जमीनदारी, अर्धवट

रयतवारी पद्धति दिसते. या सर्व ठिकाणीं केवळ कायदेशीर खंडच वसूल केला जातो असें नाहीं. इतर अन्य मार्गांनीं शेतकऱ्याकडून अधिक हिस्सा जमीनदार घेतच असतात. ज्याला 'rackrenting' असें म्हणतां येईल तो जुलूम या देशांत इतक्या मोठ्या प्रमाणावर होत आलेला आहे कीं प्रच-लित सरकारलाहि त्याची दखल घेणें भाग पडलें. या देशांतील अर्थशास्त्रज्ञां-च्याच मतानें नव्हे तर सरकारनें नेमलेल्या फ्लाऊड कमिशनच्या दृष्टीनें देखील ही जमीनधाऱ्याची पद्धति जीर्ण, टाकाऊ व समाजहिताला विघातक ठरलेली आहे. आणि इतक्या महत्त्वाच्या प्रश्नावर मुंबई योजना मात्र एक अवाक्षर बोलूं इच्छित नाहीं. या मौनाचा उघड व सहज दिसणारा अर्थ असाच होतो कीं जमिनीवरील या हितसंबंधाला योजनाकार धक्का लावूं इच्छित नाहींत. युरोपखंडांतील भांडवलदारांनीं तीनशें वर्षांपूर्वीं याच जमीन-दारांचा पुरा बींमोड केला आणि हिंदुस्थानांतील भांडवलदार त्या जमीन-दारीला विरोध करूं शकत नाहींत यावरून या देशांतहि भांडवलशाहीच्या चौकटींत सामान्य जनतेला भाग्याचे दिवस येऊं शकतील असें मानण्यास जागा नाहीं. सावकारी अथवा जमीनदारी यांच्या हितसंबंधांना मुंबई योज-नेंत बाध आलेला नाहीं हा कांहीं केवळ योगायोग नाहीं. आजची सामा-जिक घडी टिकवून धरणारी कोणतीहि योजना या हितसंबंधांना धक्का लावूं शकत नाहीं हेंच तत्त्व त्यापासून निष्पन्न होतें.

## दोन महत्त्वाचे अनुल्लेख

शेतीच्या धंद्याबाबत मुंबई योजनेंतील भूमिकेचा विचार या ठिकाणीं संपला. आता फक्त शेतीबाबत ज्या दोन महत्त्वाच्या गोष्टी दिसतात त्यांचा उल्लेखहि या योजनेंत नाहीं याची नोंद या टीकेंत करणें भाग आहे. यांपैकीं पहिली बाब 'पडित जमिनीची' होय. या देशांत अशी पुष्कळ जमीन आहे कीं जी लागवडीस येण्यासारखी असून लागवडीस येत नाहीं. याचा उल्लेख मुंबई योजनेंत केला आहे पण ती बाब फार महत्त्वाची नाहीं असा शेरा मारून ते मोकळे झाले आहेत. त्यांच्या मतानें सरकारी रिपोर्टांत जी ९ कोटि ४० लक्ष एकर लागवडीस योग्य पण पडित जमीन अशा सदरांत जमीन दाखविली आहे त्यापैकीं पुष्कळशी जमीन लागवडींत येण्यासारखी

नाहीं. साहजिकच आहे कीं लागवडींत आलेल्या जमिनीची वाढ देखील या योजनेला १३० टक्क्यांपेक्षां अधिक करणें शक्य नाहीं तर आणखी जमीन लागवडीस आणण्यासारखी असूं शकेल याची कल्पना कशी येऊं शकणार ?

पडित जमिनीप्रमाणेंच शेतीविषयक दुसरा महत्त्वाचा प्रश्न 'शेतीवर मजुरीनें काम करणाऱ्या लोकांचा' ( agricultural proletariat ). या प्रश्नाविषयीं योजनेंत कोठेंच उल्लेख देखील नाहीं, मग उपाययोजना तर दूरच. आणि दिवसेंदिवस शेतीवरील मजुरांचा प्रश्न अधिक तीव्र स्वरूपाचा होऊं लागला आहे हें मद्रास व बंगाल प्रांतांतील या लोकांच्या वाढत्या संख्येवरून सहज दिसण्यासारखें आहे. मद्रास प्रांतांतील शेतीवर जगणारांची वर्गवारी पुढील कोष्टकावरून दिसून येईल :—

( शेती कसण्याच्या कामांत असलेल्या लोकांपैकीं दर हजारीं प्रमाण )

| | १९०१ | १९११ | १९२१ | १९३१ |
|---|---|---|---|---|
| शेती न करणारे शेतमालक ... | १९ | २३ | ४९ | ३४ |
| शेती न करणारे शेतकरी ... | १ | ४ | २८ | १६ |
| शेती करणारे शेतमालक ... | ४८४ | ४२६ | ३८१ | ३९० |
| शेती करणारीं कुळें ... | १५१ | २०७ | २२५ | १२० |
| शेतमजूर ... ... | ३४५ | ३४० | ३१७ | ४२९ |

बंगाल प्रांताच्या खानेसुमारीच्या रिपोर्टावरून त्या प्रांतांतील परिस्थितीचें चित्र खालील कोष्टक दाखवील :—

| | १९२१ | १९३१ | शेंकडा घट अथवा वाढ |
|---|---|---|---|
| | (आंकडे हजारांचे) | | |
| जमीन न कसणारे जमीनदार | ३९० | ६३४ | + ६२ |
| जमीन कसणारे मालक अथवा कुळें | ९२७५ | ६०४१ | − ३५ |
| शेतमजूर | १८०५ | २७१९ | + ५० |

या दोन कोष्टकांवरून छोटी जमीन व तीहि स्वतःच्या मालकीची यांची लागवड करून आपलें कौटुंबिक जीवन सुखांत घालविणाऱ्या शेतकऱ्यांना दिवसेंदिवस आपल्या मालकीहक्काला मुकावें लागतें आहे आणि मुंबई, कलकत्ता इ० मोठ्या शहरांतील कारखान्यांत काम करणाऱ्या मजुरांप्रमाणें आज या हंगामांत या शेतावर तर उद्यां त्या हंगामांत त्या शेतावर असा

घनवास त्यांच्या वाट्याचा वाढत आहे. ज्यांना शेतीमध्यें स्थान नाहीं, स्वतःच्या श्रमशक्तीशिवाय जगण्याचें दुसरें साधन नाहीं, आणि आजच्या आर्थिक जीवनांत आशा नाहीं अशा वाढत्या लोकसंख्येची तजवीज तर दूरच, पण त्यांच्या अस्तित्वाची दखलसुद्धां योजनेला नाहीं यावरून समतोलीचें अर्थशास्त्र कोणत्या स्वरूपाचें कार्य करील याची कल्पना येऊं शकेल.

औद्योगिक विकासांतून मुंबई योजना आपणास फॅसिझमचा मार्ग दाखवीत आहे. शेतीच्या विकासांत मुंबई योजनेला १३० टक्क्यांपेक्षां अधिक वाढ करणें शक्य वाटत नाहीं. ज्या प्रकारचा औद्योगिक विकास त्या योजनेला इष्ट आहे त्या विकासाला यापेक्षां जास्त शेतीची वाढ खपणार नाहीं. यासाठीं शेती स्वयंपूर्ण करण्याची भाषा त्या योजनेंत वापरली आहे. या स्वयंपूर्णतेचें तत्त्वहि **काय परिणाम घडवून आणतें तें जगांत नाझी योजनेनें** दाखाविलें आहे. अशा रीतीनें शेतीची इतकी मर्यादित वाढ धरण्याचें खरें कारण कारखाने व शेती यांचें समतोल प्रमाण हें नसून शेतीच्या मालाला यापेक्षां अधिक मागणी रहाणार नाहीं हेंच दिसतें आणि शेतीच्या मालाला मागणी अधिक रहाणार नाहीं याचेंहि कारण जनतेचें रहाणीचें मान २५ टक्क्यांपेक्षां अधिक वाढणार नाहीं हेंच होय. ज्या प्रकारचे कारखाने या देशांत मुंबई योजना वाढवूं इच्छितें त्यांना जो कच्चा माल लागणार आहे, तो प्रामुख्यानें खनिज संपत्तीच्या रूपानेंच लागणार असल्याकारणानें कच्चा मालहि त्यांना अधिक लागणार नाहीं आणि शेतकऱ्याचें रहाणीचें मान कमी ठेवल्याशिवाय हा कच्चा माल स्वस्त किंमतींत त्यांना मिळणार नाहीं. याच दारिद्र्याला ते ' मूळचे फायदे ' ( basic assets ) या नांवानें संबोधीत असावेत. सारांश ७० टक्के जनतेच्या दारिद्र्यावर या देशाची औद्योगिक वाढ मुंबई योजनेला करावयाची आहे हा एकच निष्कर्ष त्यांतून निघूं शकतो. १३० टक्के शेतीच्या वाढींतहि जमीनदार व सावकार यांच्या हिताला धक्का न लावल्याकारणानें त्यांनाच या वाढीचा फायदा मिळणार ही उघड गोष्ट आहे आणि आपलें वाढतें दारिद्र्य पाहून शेतकरी उठाव करतील तर त्याकरितां राष्ट्रीय सरकारचा बडगा जय्यत तयार ठेवलेला दिसतो. एकीकडे जनतेचें पाठबळ या योजनेला मिळालें तरच ही योजना यशस्वी होऊं शकेल असें ही योजना म्हणते आणि त्याचबरोबर सहकारी

शेतीबाबत सरकारला सक्ति करावी लागेल अशी सरकारच्या वाढत्या नियंत्रणाची भाषाहि बोलली जात आहे. या दोन विधानांतून सुसंगत अर्थ काढण्याचा प्रयत्न केला तर, जमलें तर आपखुषीनें, नाहीं तर सक्तीनें ७० टक्के जनतेला मूठभर लोकांच्या हितासाठीं आम्ही राबवणार हाच एक अर्थ त्यांतून निघूं शकेल. जनता आपल्या दारिद्र्याला राजीखुषीनें कधींच सम्मति देत नसते हा अनुभव लक्षांत घेऊन आपल्याच मायभूमीचें सरकार म्हणून उजळ माथ्यानें त्यांचा असंतोष दडपण्याचें कार्य हें राष्ट्रीय सरकारच करूं शकेल असाहि त्यांना विश्वास वाटत असावा.

× × ×

शेती व उद्योगधंदे यानंतर मुंबई योजनेंतील वाहतुकीचीं साधनें, घरें, शिक्षण व आरोग्य या चार महत्त्वाच्या गोष्टीसंबंधीं केलेली योजना विचारासाठीं पुढें येते. या चारहि गोष्टी जनतेच्या रहाणीचें मान वाढविण्याच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. योजनेच्या प्रवर्तकांनीं प्रत्येक बाबीसंबंधानें जी खर्चाची आंखणी केली आहे ती इतक्या सामान्य स्वरूपाची आहे कीं त्यासंबंधानें कांहीं कल्पना करणें अशक्य आहे. कोणत्याहि योजनेचा आरंभ हा अपुऱ्या माहितिवरच होत असल्याकारणानें अंदाजानेंच त्यांत विभागणी होणार हें उघड आहे. तथापि प्रारंभापासून आपल्या विवेचनाची दृष्टि तपशिलाकडे अथवा आंकडेवारीकडे नाहीं. त्याबाबत योजनेच्या प्रवर्तकांचें समर्थन मान्य करून त्या योजनेंतील एकंदर विकासाची दिशा कोणत्या ध्येयाकडे जात आहे याच एका दृष्टीनें प्रस्तुत टीकेचा सगळा रोख आहे; आणि तीच दृष्टि ठेवून याही चार गोष्टींविषयीं विवेचन करणें अगत्याचें आहे. प्रथम या चार गोष्टींवर कसा खर्च केला जाणार आहे याचा विचार करूं. एकंदर ४०८० कोटि रुपये यापायीं खर्चीं पडणार असून ९४० कोटि वहातुकीचीं साधनें, शिक्षण ४९० कोटि रुपये, आरोग्य ४५० कोटि रुपये व घरें २१०० कोटि रुपये अशी त्यांची विभागणी होणार आहे. १५ वर्षांच्या योजनेचे पंचवार्षिक तीन हप्ते पडलेले आहेत त्या दृष्टीनें यांची विभागणी कशी होत जाईल याची कल्पना खालील कोष्टकावरून येईल :—

(आंकडे कोटि रुपयांचे)

| | पहिली योजना | दुसरी योजना | तिसरी योजना |
|---|---|---|---|
| वहातुकीचीं साधनें | ११० | ३२० | ५१० |
| शिक्षण | ४० | ८० | ३७० |
| आरोग्य | ४० | ८० | ३३० |
| घरें | १९० | ४२० | १५९० |
| एकूण | ३८० | ९०० | २७०० |
| | | | वट्ट बेरीज ४०८० |

शिक्षण व आरोग्य

या कोष्टकाचा बारकाईनें विचार केल्यास पहिल्या योजनेंत शिक्षण व आरोग्य या दोन महत्त्वाच्या गोष्टींवर प्रत्येकीं ४० कोटि रुपये खर्ची पडणार आहेत. दुसऱ्या योजनेंत हा खर्च याच्या दुप्पट म्हणजे प्रत्येकीं ८० रु. होणार आहे. त्यावरून सहज अनुमान निघूं शकतें कीं योजनेच्या पहिल्या दहा वर्षांत जनतेला आरोग्य व शिक्षण यांबाबत फारशी वाढ दिसूं शकणार नाहीं. योजनेपैकीं दोन तृतीयांश काळ त्यांना सध्यांच्या परिस्थितींत म्हणजेच दुःस्थितींत, बरे दिवस येतील, या आशेवर कंठावा लागणार. जो कांहीं भला मोठा खर्च व्हावयाचा तो तिसऱ्या योजनेंत अनुक्रमें ३७० कोटी व ३३० कोटी रुपये इतका होणार. या तीनहि योजनेंत शिक्षण व आरोग्य या दोन गोष्टींवर होणाऱ्या खर्चापैकीं जवळ जवळ ३५ ते ४० टक्के खर्च बांधकामावर होणार आहे ही गोष्टहि या ठिकाणीं लक्षांत घेतली पाहिजे. त्याचबरोबर सडका, रेल्वे इ. वहातुकीचीं साधनें व घरें या दोहोंवर अनुक्रमें १५९० कोटी रुपये व ५१० कोटी तिसऱ्या योजनेंत खर्च व्हावयाचे आहेत. या सर्व खर्चाचें भांडवल तिसऱ्या योजनेंत एकदम कोठून येणार या प्रश्नाबरोबरच देशांतलि लोखंड व पोलाद आणि सीमेंट या कारखान्यांवर या खर्चापायीं प्रमाणापेक्षां अधिक ताण बसणार आहे व तो ताण हे कारखाने सहन करूं शकतील का हाहि प्रश्न उपस्थित होतो.

## ग्रामीण दवाखान्याचें चित्र

या प्रश्नांचीं उत्तरें शोधण्यापूर्वी उदाहरणादाखल योजनेंत आरोग्याची जी योजना आंखली आहे तिचा विचार करूं. या योजनेप्रमाणें खेडेगांवच्या दवाखान्यांची जी तरतूद केली आहे ती विचार करण्यासारखी आहे. प्रत्येक खेडेगांवांत १२०० चौरस फुटांची दवाखान्याची इमारत बांधण्यास १००० रु. खर्च येईल. तितकाच खर्च दवाखान्यांतील इतर सोयींसाठीं करावा लागेल. आणि शेवटीं डॉक्टर, कांपौंडर, नर्स इत्यादींचा पगार व औषध-पाणी यांसाठीं २००० रु. लागतील. या अंदाजपत्रकांतील आंकडे जरी महत्त्वाचे नसले तरी त्यांतील तत्त्व महत्त्वाचें आहे. १००० रुपयांत दवाखान्याची कसली इमारत होणार हा प्रश्न जरी बाजूला सोडला तरी सालीना जो दोन हजार रुपयांचा खर्च धरला आहे त्यामध्यें डॉक्टर, नर्स व कांपौंडर यांना योग्य वेतन द्यावयाचें असेल तर त्यांपायींच हे दोन हजार खर्च होतील. मग औषधपाण्यासाठीं ? साहजिक योजनाकार धंदा करणाऱ्या डॉक्टराकडून या भूतदयेच्या कामांत थोडीबहुत विनावेतन मदत होईल अशी अपेक्षा करीत आहेत. ("assuming that a certain amount of voluntary and part time help of practising doctors would be available ". Page 14 ). ग्रामीण जनतेला ज्या गोष्टींची अत्यंत गरज आहे आणि समाजालाहि वाढती मृत्युसंख्या थांबविण्यासाठीं ज्याची गरज आहे त्या गोष्टीचें मुंबई योजनेंतील चित्र हें असें आहे. प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें आंकडे महत्त्वाचे नाहींत, पण त्या आंकड्यांवरून समजली जाणारी आर्थिक दिशा अधिक महत्त्वाची आहे या दृष्टीनें हें आरोग्याचें आशादायक वाटणारें चित्र किती निराशाजनक आहे याचा खुलासा होईल.

## प्रतवारी कशी लागेल ?

आरोग्यविषयक योजनेचें हें उदाहरण दाखविण्यामध्यें मुंबई योजनेंत वहातूक, घरें, शिक्षण व आरोग्य या चार महत्त्वाच्या गोष्टींपैकीं कशावर किती प्रमाणांत भर दिला जाईल हें दाखविण्याचा उद्देश आहे. मुंबई–योजनेमध्यें किती भांडवल कोणत्या गोष्टीवर खर्च करावयाचें याचा निर्णय नफ्याच्या हेतूनेंच होईल हें योजनेच्या ध्येयाची

मीमांसा करतांना मागें सांगितलेंच आहे आणि ही किफायतशिरपणाची मर्यादा या चारहि गोष्टींना लागू होणें स्वाभाविक होय. एकंदर योजनेच्या चौकटींतच ' सामाजिक संरक्षणाच्या ' ( social security ) या चार गोष्टींचा अनुक्रम नंबर ठरणार; ही गोष्ट लक्षांत घेतली तर वहातुकीच्या साधनांना पहिलें स्थान दिलें जाईल असें ओघानें अनुमान निघतें. ज्या प्रकारचा औद्योगिक विकास व्हावा अशी योजनाकारांची इच्छा आहे त्यामध्यें दळणवळणाच्या साधनांना अधिक महत्त्व प्राप्त होणार. त्यानंतर घरबांधणीच्या प्रश्नाकडे लक्ष दिलें जाईल. पण त्यांतहि भाड्याच्या रूपानें योग्य मोबदला देणारीं घरें बांधण्याच्या प्रश्नालाच प्राधान्य येईल. अर्थात् सामान्य जनतेच्या दृष्टीनें या घरांकडे नुसतें रस्त्यांत उभें राहून पहाण्या-शिवाय त्यांचा त्यांना कांहीं उपयोग रहाणार नाहीं. घरबांधणीच्या कामा-नंतर अनेक कारणांस्तव शिक्षणाकडे योजकाना लक्ष पुरविणें जरुरीचें वाटेल. योजनेंत शिक्षणाचा हेतु उद्योगधंद्याच्या वाढीसाठीं शिल्पशास्त्रज्ञ व शास्त्रज्ञ लागतील त्यांचा पुरवठा करणें हा दिला आहे. पण त्याचबरोबर या योजनेला जनतेचें आपखुषीचें सहकार्य मिळविण्यासाठींहि शिक्षणाची जरूरी आहे असें योजक म्हणतात. (" In the execution of a comprehensive plan of ecomonic development, it is essential that we should be able to count on the willing co-operation of the people "). जनतेच्या ज्या प्रकारच्या सहकार्याची अपेक्षा योजना करते त्या सहकार्याचें स्वरूप योजनेच्या स्वरूपावरच अवलंबून रहाणार हें निश्चित. योजना जर जनतेचें दारिद्य उत्तरोत्तर नष्ट करूं लागली अथवा शकली तर जनतेच्या सहकार्याची गरज भासण्याचें कांहींच कारण नाहीं; तें आपोआपच तयार होत जाईल. पण लोकांच्या वाढत्या दारिद्र्यावर आर्थिक भरभराटीची कच्ची इमारत जी योजना उभी करते तिला जनतेचें खुषीचें सहकार्य मिळेल अशी अपेक्षा करतां येणार नाहीं. या कारणानें मुंबई योजनेंत शिक्षणाचा प्रश्न अगदीं भिन्न स्वरूपाचा आहे असें म्हणावें लागतें. त्या शिक्षणाला ' राष्ट्र ,' ' राष्ट्राचें वैभव ' ' गत इतिहासांतील उज्वल काल ' या दंतकथांचा आधार घेऊन सामान्य जनतेचीं मनें एका विशिष्ट दिशेनें तयार करण्याचें कार्य करावें लागणार आणि यासाठीं मुंबई योजनेंतील शिक्षणाच्या आस्थेविषयीं

साहजिकच मनांत साशंकता बळावते. वहातूक, घरें, शिक्षण यांच्या विशिष्ट हेतूच्या सिद्धीसाठीं गरजा भागल्यानंतर विचारें आरोग्य शेवटच्या सदरांत येऊन पडतें आणि त्याचाहि विचार करावा लागतो. याचें कारण, औद्योगिक वाढीसाठीं श्रमशक्तीची गरज हेंच होय. त्या गरजेमुळें 'सोन्याचें अंडें घालणाऱ्या हंसीला एकदम ठार मारणें मूर्खपणाचें ठरतें' या न्यायानें आरोग्याची देखभाल होत राहील असें अनुमान काढल्यास वावगें होणार नाहीं.

× × ×

मुंबई योजनेंतील आतां शेवटचा आणि तितकाच महत्त्वाचा भाग परीक्षावयाचा आहे. तो भाग म्हणजे भांडवलाच्या निर्मितीचा. योजनेच्या सिद्धीसाठीं भांडवल मागें सांगितल्याप्रमाणें एकंदर दहा हजार कोटींचें लागणार आहे. पंधरा वीस वर्षांच्या अवधींत योजनेचे प्रवर्तक हें भांडवल कसें काय जमा करूं इच्छितात याचाहि विचार तितकाच जरुरीचा व योजनेच्या स्वरूपावर प्रकाश पाडणारा आहे. कोणत्याहि आर्थिक योजनेला भांडवलाची योजना प्रथम आंखावी लागते. त्या दृष्टीनें विचार केल्यास योजनेंत दोन ठिकाणीं "पैसा हें साधन आहे साध्य नाहीं, आपल्या अर्थव्यवस्थेचे चाकर म्हणून त्यानें काम केलें पाहिजे." अशा अलंकारिक घोषणा ऐकावयास मिळतात. पण, अर्थव्यवस्थेमध्यें पैशाच्या रूपानें गोळा केलें जाणारें भांडवल हें साधन आहे हें वाक्य उच्चारावयास सुलभ आणि ऐकावयास गोड असलें तरी ज्या पद्धतीनें तें गोळा केलें जाणार असेल त्या पद्धतीवरून भांडवलाची जमवाजमव जनतेच्या कष्टावर आधारली जाणार आहे कीं नाहीं याचा उलगडा होऊं शकतो. याकरितां मुंबई योजनेंत राष्ट्रीय सरकारची जी मध्यवर्ति कल्पना आहे त्या राष्ट्रीय सरकारमार्फत हें भांडवल कसें गोळा केलें जाईल याचें दिग्दर्शन होणें जरूर होतें. तो विषय योजनेच्या प्रवर्तकांनीं संपत्तीच्या विभजनाप्रमाणेंच दुसऱ्या विभागांत हाताळूं असें आश्वासन दिलें आहे. तथापि या योजनेंतच याबाबत एक सूचक विधान आलेलें दिसतें. योजनाकार म्हणतात : 'कर किंवा सरकारी कर्जरोखे या मार्गांनीं भावी सरकार हें भांडवल जमा करणार किंवा खाजगी ठेवीच्या रूपानें जमा होणार याचें निश्चित स्वरूप या प्रश्नाचा विचार योजना प्रत्यक्ष अमलांत येण्याच्या प्रसंगीं, त्या वेळच्या

आर्थिक परिस्थितीच्या प्रकाशांतच करणें शक्य आहे.' (पान ४१). या विधानावरून राष्ट्रीय सरकारचें कार्य भावी भांडवलदार–नियोजित योजनेमध्यें काय राहील याची अटकळ बांधणें कठीण जाणार नाहीं. औद्योगिक वाढ, शेतीचा विकास, सामाजिक सुरक्षिततेच्या बाबी या सर्व योजनेच्या महत्त्वाच्या अंगांवरून आर्थिक योजनेला लागणारें राजकीय राष्ट्रीय सरकार कोणत्या स्वरूपाचें राहील याचा अंदाज मागील परीक्षणावरून यावयास हरकत नाहीं. मुंबई योजनेंतील आर्थिक विकासाचा पाया अरुंद, भुसभुशीत व जनतेच्या दारिद्र्यावर उभा आहे हें सप्रमाण सिद्ध करतां येणें शक्य आहे आणि त्याप्रमाणें आतांपर्यंतच्या विवेचनावरून दिसून येईल. या कृत्रिम, एकांगी भरभराटीमध्यें जनता आपखुशीनें भांडवल देईल ही कल्पना संभवत नाहीं आणि जनता राजीखुषीनें पैसा पुरवीत नसेल तर या राष्ट्रीय सरकारला तो बळेंच काढावा लागेल असें त्यापुढचें अनुमान ओघानेंच येतें. या अनुक्रमावरून दारिद्री जनतेच्या खिशांतून भांडवल काढण्यासाठीं 'पैसा ही किती क्षुल्लक बाब! त्याचें काय येवढें मानतां' या घोषणा किंवा वल्गना काय अर्थ दाखवितात याचा विचार करणें, वारंवार विचार करणें अगत्याचें आहे. नाझींच्या योजनेंत डॉ. शॅट यांनीं याच भांडवल जमा करण्यासंबंधीं जी कल्पना मांडली होती ती या दृष्टीनें मननीय आहे. "नाझी राज्यकर्त्यांनीं असा दंडकच घालून दिला होता कीं कोणत्याहि परिस्थितींत मालाचें उत्पादन भांडवलाच्या तुटीच्या सबबीवर कमी पडतां कामा नये. कच्चा माल, मानवी श्रम आणि उत्पादनाचे इतर घटक यांच्या प्रमाणांत मालाचें उत्पादन झालेंच पाहिजे आणि या कामीं लागणारें भांडवल आपोआप मिळेल." * यासाठीं पैसा आमची बटीक आहे; त्याच्या आहारीं आपण जातां कामा नये, या उदात्त वाक्यांनीं भुलून जाण्यांत धोका आहे असें या ठिकाणीं स्पष्ट बजावणें इष्ट नि आवश्यक वाटतें. ज्या मार्गांनीं हें भांडवल भावी राष्ट्रीय सरकार गोळा करणार ते मार्गहि तितकेच महत्त्वाचे आहेत.

---

* Paul Einzig, 'Hitler's new order in Europe : 1941

ठेव खरी; पण खुषीची का सक्तीची ?

मागें दिलेल्या योजनेच्या आराखड्यावरून देशांत अंतर्गत मार्गांनीं ७४०० कोटींचें व बाहेरून २६०० कोटींचें भांडवल जमा करण्याची महत्त्वाकांक्षा योजनेचे प्रवर्तक बाळगतात. यांपैकीं ७४०० कोटि रुपये जनतेच्या ठेवी व चलन या दोन मार्गांनीं अनुक्रमें ४००० कोटि व ३४०० कोटि इतकें गोळा होईल अशी त्यांची अपेक्षा आहे. यांपैकीं जे ४००० कोटि लोकांच्या शिलकेंतून जमविणार ते एकंदर राष्ट्रीय उत्पन्नाच्या ६ टक्के आहे असें योजनाकार स्वतःच सांगतात. तेव्हां त्यांनींच दिलेल्या प्रमाणावरून वट्ट राष्ट्रीय उत्पन्न ६७००० कोटींचें येतें. या ६७ हजारांपैकीं अवघे ४००० कोटि रुपयेच या योजनेला मिळूं शकतात याचा अर्थ काय ? हें प्रमाण कमी पडत नाहीं काय ? रहाणीचें मान वाढविण्यासाठीं बाकीची शिल्लक लागत असेल असें म्हणावें तर तें मान अवघ्या पंचवीस टक्क्यांनींच वाढणार आहे. एकंदर अंदाजपत्रकावरून योजनेच्या पंधरा वर्षांत जवळजवळ वीस पंचवीस हजारांची शिल्लक रहात असतांना ६ टक्केच शिल्लक योजकांना जमा करणें शक्य आहे यावरून बाकीचा भाग कोठें गडप होणार याची कल्पना करणें कठीण होणार नाहीं. उघड उघड ती शिल्लक खाजगी मालमत्ता हिरावून घेणार. अल्पसंख्य भांडवलदार अथवा जमीनदार यांच्या खिशांत शिलकीचा मोठा वाटा गेल्यानंतर तो जमा करणें राष्ट्रीय सरकारला अशक्य कां वाटावें ? त्यांना ती गोष्ट अशक्य वाटते याचें कारण राष्ट्रीय सरकार व खाजगी मालमत्ता हे दोनही एकरूपच आहेत हें मानणें अवास्तव ठरूं शकेल काय ? असे अनेक प्रश्न या ठिकाणीं उपस्थित होतात आणि त्या सर्वांचीं उत्तरें होकारात्मकच दिलीं पाहिजेत. आपल्या हातांत आलेल्या शिलकीचा विनियोग या सर्वाधिकाऱ्यांना ज्या ठिकाणीं किफायतशीर धंदा चालेल अशाच ठिकाणीं करावासा वाटेल आणि कोठेंच फायदा राहिला नाहीं तर शिल्लक पडून राहिली तरी बिघडलें कोठें ?

सहा टक्केच बचत या योजनेला गोळा करतां येते याचा दुसरा अर्थ ही बचत सामान्य जनतेच्या छोट्या शिलकेंतून गोळा केली जाईल असा करणें भाग आहे. मोठ्यांची मोठी शिल्लक गोळा करण्याचें ठरविलें

तर यापेक्षा अधिक भांडवल या मार्गांनीं मिळण्याची शक्यता आहे. पण या वरिष्ठ वर्गावर हल्ला करण्याबाबत योजनेंत पांढरें निशाण दाखविलें आहे याचें कारण योजनाच वरिष्ठ वर्गाच्या हिताची आहे. आपण बसलेल्या खांदीला मुळासकट तोडून टाकण्याचा मूर्खपणा कोणी करणार नाहीं. यासाठीं ६ टक्केच ठेवी जमा करण्याची भाषा; आणि तेंहि भांडवल लहान उत्पन्नाच्या वर्गांतील लोकांकडून. या ठेवी राजीखुषीनें जमा करतां येणार नाहींत हेंहि त्याबरोबरच स्पष्ट आहे. त्या सक्तीनें वसूल कराव्या लागतीलच. रहाणीचें मान पंचवीस टक्क्यांनीं वाढावयाचें; ती वाढहि युद्धोत्तर कालीन पदार्थांचे भाव काय रहातील याचा विचार करतां अत्यंत अपुरी. अशा स्थितींत ज्याला जीवन-वेतन म्हणतात त्या वेतनांतून ६ टक्के शिल्लक भांडवला-पायीं द्यावी लागली तर रहाणीचें मान अधिकच खालावलें जाईल हें उघड आहे. पण त्यामुळें कच्चा माल व मजुरी स्वस्त दरानें मिळूं शकते हा फायदा मिळतो. तेव्हां राष्ट्रीय सरकारामार्फत जमा केली जाणारी ही ठेव आपखुषीची नसून सक्तीची आहे असा या मार्गाचा सरळ अर्थ होतो आणि त्याचा परिणामहि जनतेचें दारिद्र्य वाढण्यांत व भांडवलदारांचा नफा वाढण्यांत होतो.

## चलनवाढ कीं दारिद्र्य-वाढ ?

जनतेच्या खिशांतील सहा टक्के, शिल्लकहि योजनेला प्रारंभीं जमा करणें शक्य होणार नाहीं. ज्यावेळीं नवीन संपत्ति योजनेच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या हप्त्यांत तयार होऊं लागेल त्यावेळीं माल व मजुरी या स्वरूपांत या नवीन संपत्तीचा थोडा वाटा जनतेच्या हातांत येण्याचा संभव आहे आणि त्याच वेळीं ही सहा टक्के शिल्लक योजनेला मिळणें शक्य होईल. मग योजनेच्या प्रारंभाला भांडवल कोठून आणणार ? याहि प्रश्नाला योजनेंत उत्तर आहे. मुंबई योजनेच्या दृष्टीनें ३४०० कोटि रुपये भांडवल चलनाच्या रूपानें नवीन निर्माण करावयाचें (created money) आणि त्याचा भांडवल म्हणून कारखानदारांनीं उपयोग करावयाचा. हें सारें ठीक. पण हा पैसा निर्माण केल्यानंतर त्याचा वापर कशापायीं केला जाणार ? औद्योगिक वाढीसाठीं; हें त्याचें स्वाभाविक उत्तर येतें. आतां मुंबईयोजना जे उद्योगधंदे वाढवूं इच्छिते ते वीज, लोखंड, पोलाद इ. वस्तूंचे; कापड, साखर इ. आवश्यक

वस्तूंचे नाहींत. नवीन तयार केलेल्या नोटा या प्रकारच्या कारखान्यांत काम करणाऱ्या कामगारांना पगाराच्या रूपानें मिळत जातील. हातीं आलेल्या नोटा घेऊन हे कामगार बाजारांत कापड, साखर इ. वस्तू खरीदावयास जातील तर त्यांना त्या वस्तू बाजारांत नाहींत किंवा असल्या तरी त्यांचे भाव कडाडले आहेत असें दिसून येईल. नोटा अधिक मिळाल्या खऱ्या, पण मालाच्या परिभाषेंत त्यांची किंमत कमी झालेली आहे हाहि अनुभव येण्यास उशीर लागणार नाहीं. मग अर्थशून्य झालेला हा अर्थ (money) आमच्या हातीं देऊन आम्हांला फुकट राबवण्याचाच हा प्रकार झाला नाहीं ना अशी शंका बळावेल; आणि झालेल्या औद्योगिक विकासाचें सत्य स्वरूप त्यांना दिसून येईल. मग त्या वेळीं त्यांना काय उत्तर द्यावयाचें? तें उत्तरहि योजनाकारांनीं देऊन टाकलेलें आहे. ते म्हणतात कीं, असा पुष्कळ पैसा निर्माण करण्यात वावगें असें कांहींच नाहीं; कारण याच्या योगानें राष्ट्राची संपत्ति निर्माण करण्याची ताकद वाढणार आहे. पण संपत्ति वाढणार म्हणजे लोखंड, पोलाद, कोळसा, रासायनिक द्रव्यें अधिक प्रमाणांत बाजारांत येणार. त्याचा काय उपयोग? लोखंड व कोळसा चावतां येत नाहीं किंवा पितां येत नाहीं. प्रत्यक्ष भोग्य वस्तू व हातांतील नोटा यांमध्यें महदंतर पडेल याची काय वाट? त्याची वाट मुंबई योजनेनें फार सोप्या रीतीनें लावलेली आहे. हें प्रश्नचिन्ह राष्ट्रीय सरकारनें नेमलेल्या योजना–समितीला सतत भेडसावीत रहाणार हें मान्य करून लोकांनीं उगाच खवळा-ढवळ करूं नये म्हणून राष्ट्रीय सरकारनें तात्पुरतें व्यक्तिस्वातंत्र्याला ग्रहण लावावें. व्यक्तिस्वातंत्र्याला लागणारें ग्रहण तात्पुरतें का कायमचें हा प्रश्न क्षणभर बाजूस ठेवला तरी राष्ट्रीय सरकार म्हणजे हुकुमशाही सरकार असें साधें समीकरण या योजनेंतून बाहेर पडतें. राष्ट्रीयत्वाच्या पतीवर राष्ट्रीय सरकार चलन निर्माण करणार; राष्ट्रीयत्वाच्या भावनेवर जनतेचा संपूर्ण विश्वास संपादून लोकांच्या हातीं या नोटा तें सरकार देणार आणि शेवटीं लोक चळवळ करूं लागले कीं राष्ट्रीयत्वाच्या नांवावर तेंच राष्ट्रीय सरकार व्यक्तिस्वातंत्र दडपून टाकणार. असा हा भांडवल गोळा करण्याचा दुसरा मार्ग योजनेनें आंखलेला दिसतो. चलनवाढीबरोबरच दारिद्र्यवाढीचाहि हा सुटसुटीत कार्यक्रम आहे.

गंगाजळी कोणाची ?

७४०० कोटींचें भांडवल सामान्य जनतेला अधिक दरिद्री बनवून गोळा करण्यांत येणार आहे हें पाहिल्यानंतर परदेशच्या मार्गानें येणाऱ्या २६०० कोटींचे मार्ग काय आहेत याचा विचार करावयास हरकत नाहीं. सांठ्याच्या रूपानें ३०० कोटि (सोन्याच्या रूपांत), गंगाजळी १००० कोटि, परदेशीं कर्ज ७०० कोटि आणि निर्यात व्यापार ६०० कोटि असा त्याचा हिशोब मागें दिलाच आहे. यापैकीं साठ्याच्या रूपानें विनाकारण अडकून राहिलेल्या भांडवलापैकीं ३०० कोटि रुपयांचें भांडवल मिळेल असा योजनेंत अंदाज दिला आहे. या अंदाजाविषयीं यावेळीं कांहींच म्हणतां येणार नाहीं. पण बाकीचे सारे मार्ग महत्त्वाचे आहेत व त्यांवरून या देशाची परिस्थिति काय होऊं शकेल यावरतीं प्रकाश पडूं शकतो. पैकीं प्रथम इंग्लंडमध्यें पौंडाच्या रूपानें असलेल्या गंगाजळीचा प्रश्न विचारांत घेऊं. पौंडाच्या रूपांत असलेल्या गंगाजळीचें स्वरूप या विचारांत प्रथम लक्षांत घेतलें पाहिजे. ही गंगाजळी इंग्लंडमध्यें हिंदी भांडवलदारांच्या नांवानें नाहीं ही पहिली गोष्ट. हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश सरकार या दोहोंमध्यें धनको व ऋणको याचें नातें आहे. म्हणजेच हिंदुस्थान सरकारच्या नांवानें इंग्लंडमध्यें ती सांठत आहे. या देशांतील सरकारची ती मालमत्ता असल्या-कारणानें ती जनतेच्या मालकीची भावी कालांत होणें न्याय्य आहे. पण हा केवळ नैतिक मूल्याचा प्रश्न म्हणून त्याचा विचार करावयाचा नाहीं. जरी ही गंगाजळी हिंदुस्थान सरकारच्या नांवानें जमा होत असली तरी अर्थशास्त्रज्ञांच्या मतें या देशांतील सामान्य जनतेच्या खिशांतून ती तेथें जमा झालेली आहे. युद्धकालीन महर्गता, टंचाई इ० अनेक कष्ट सोसून जनतेनें तिचा भरपूर मोबदला दिला आहे. ही गंगाजळी म्हणजे अर्थशास्त्रीय परिभाषेंत बोलावयाचें तर जनतेला करावयास लावलेली सक्तीची बचत (forced savings) होय. यासाठीं नैतिक व अर्थशास्त्रीय या दोनहि दृष्टीनें या गंगाजळीवर जनतेचा हक्क पोहोंचतो आणि जनतेच्या आर्थिक विकासा-साठींच तिचा विनियोग होणें इष्ट आहे.

अशा स्वरूपाच्या गंगाजळीवर जी योजना जनतेचा आर्थिक विकास

करूं शकेल त्याच योजनेला हक्क सांगतां येईल. मुंबई योजनेचें आपण जें स्वरूप पाहिलें त्यावरून त्या योजनेला या गंगाजळीचा उपयोग करूं देणें म्हणजे सार्वजनिक मालमत्तेचा विनियोग खाजगी मालकीच्या हितासाठीं करूं देण्यासारखें होणार आहे. हा केवळ नैतिक प्रश्न नाहीं; हा अर्थ-शास्त्रीयहि आहे. एक हजार कोटी रुपये हिंदी भांडवलदार या योजनेंत घालून त्याचें करणार काय हा प्रश्न उपस्थित केला तर त्याचें उत्तर हेंच येईल कीं ज्या धंद्यांत फायदा दिसेल त्याच धंद्यांची वाढ करणार. अशा प्रकारचे धंदे कोणत्या स्वरूपाचे आहेत हेंदेखील जर्मन फासिझमच्या अनुभवावरून ठरलेलें आहे. त्या प्रकारच्या धंद्यांची वाढ झाली तर देशाची आर्थिक भरभराट होणार नाहीं हा नीतिशास्त्राचा सिद्धान्त नसून अर्थशास्त्राचा आहे. मुंबई योजनेला या बाबींत नाझींच्या पावलावर पाऊल टाकून जाण्या-शिवाय गत्यंतर नाहीं. अर्थात् त्याचबरोबर ही गोष्टहि या गंगाजळीच्या रूपानें सिद्ध झाली कीं, अर्थशास्त्रीय सत्यासत्यतेचा निर्णयहि राजकीय सत्ते-वरच अवलंबून असतो. ज्या वेळीं योजनेचे प्रवर्तक, या देशांतील प्रसिद्ध आठ भांडवलदार, ही गंगाजळी योजनेला मिळणें शक्य आहे व मिळाली पाहिजे असें म्हणतात त्या वेळीं या देशांतील भावी राजकीय सत्तेचे वारसदार हिंदी भांडवलदार आहेत, जनता नाहीं असाच त्यांच्या म्हणण्याचा आशय आहे. भांडवलशाहीच्या या पडत्या काळांत भांडवलदार व जनता यांचे हितसम्बन्ध विरोधी नाहींत, ते एकरूपच आहेत हें भांडवलदारांच्या बाजूनें पुढें येणारें समर्थनहि लंगडें आहे; गेल्या पंचवीस वर्षांच्या अनुभवावरून तें खोटें ठरलें आहे. एक काळ असा होता कीं ज्या वेळीं भांडवलदारवर्ग स्वतःच्या विकासाबरोबर जनतेचा विकासहि थोड्याबहुत प्रमाणांत करूं शकत होता. प्रगमनशील भांडवलशाहीचें हें युग गेल्या महायुद्धानंतर संपलें असून आज भांडवलदारांसमोर आपलें अस्तित्व टिकविण्याचा प्रश्न तीव्र स्वरूपांत उभा राहिला आहे आणि या ऱ्हासकाळांत भांडवलशाहीला जगावयाचें असेल तर जनतेच्या वाढत्या दारिद्र्यावरच जगलें पाहिजे. हिंदी भांडवलदार वर्ग या नियमाला अपवाद आहे असें मानण्यास कोणताच आधार नाहीं. या-साठीं एक हजार कोटि गंगाजळीचा विनियोग मुंबई योजनेच्या पायीं होणें

याचा सरळ सरळ अर्थ जनतेचें दारिद्र्य अधिक वाढविण्याच्या कामीं त्याचा विनियोग होणें असाच करणें भाग आहे.

## निर्यात व्यापार व आयात होणारें दारिद्र्य

गंगाजळीचा विचार केल्यानंतर निर्यात व्यापाराच्या जोरावर मुंबई योजना ६०० कोटि भांडवल मिळवूं इच्छिते त्याकडे वळलें पाहिजे. हे ६०० कोटि योजनेला कसे मिळणार हा प्रश्न दत्त म्हणून उभा राहतो. याचा विचार हातधंदे व ग्रामोद्योग यांविषयीं परीक्षण करतांना सविस्तर रीतीनें केलेला आहे. त्याची पुनरुक्ति करण्याचें या ठिकाणीं कारण नाहीं. शेती स्वावलंबनी करावयाची, कच्चा मालहि परदेशीं पाठविण्याची शक्यता धरलेली नाहीं; पक्क्या मालपैकीं उत्पादक वस्तू परदेशच्या बाजारपेठेंत पाठविणें शक्य होणार नाहीं; तेव्हां उरला मार्ग कापड, साखर इ० वस्तूंच्या निर्यातीचा. आयात मालापेक्षां या मालाची निर्यात ४० कोटींनीं अधिक होणार असा योजनेंतील अंदाज आहे. परदेशच्या बाजारपेठेंत स्पर्धेत टिकावयाचें असेल तर या मालाची किंमत बाकीच्या देशांतील या मालाच्या किंमतीपेक्षां कमी ठेवली पाहिजे तरच स्पर्धेत निर्यात मालाचा निभाव लागणार. अशा रीतीनें मालाच्या किंमती स्वस्त ठेवण्यासाठीं कच्चा माल व मजुरी कमी करणें भाग आहे हें जपानच्या दाखल्यावरून सप्रमाण सिद्ध झालेलें आहे; आणि कच्चा माल व मजुरी यांच्या दरांत कपात करावयाची म्हणजेच शेतकरी व कामगार यां दोन बहुसंख्य वर्गाचें दारिद्र्य वाढवावयाचें. तेव्हां निर्यात व्यापाराच्या जोरावर येणाऱ्या ६०० कोटि भांडवलाबरोबरच जनतेच्या दारिद्र्याचीहि आयात होणार हें अनुमान त्यांतून निघाल्यास तें सर्वथैव योग्यच ठरेल.

## कर्जाची आयात व साम्राज्याचीहि आयात

आतां शेवटचा मार्ग परदेशांतून येणाऱ्या कर्जाचा. या मार्गानें ७०० कोटि रुपये भांडवल या देशांत योजनाकार ओतूं इच्छितात. कर्जाऊ भांडवलाविषयीं योजना दुर्दम्य आशावादानें प्रेरित झालेली दिसते. " हिंदुस्थानची पत परदेशच्या बाजारपेठेंत फारच वाढलेली आहे आणि त्यानें मनांत आणलें तर बाकीच्या देशांतून, **आणि विशेषतः अमेरिकेंतून,**

मोठ्या प्रमाणावर कर्ज घेणें त्याला शक्य आहे." अशा प्रकारें अमेरिकन कर्जाची प्रस्तावना करून योजनाकार पुढें म्हणतात "या भांडवलाबरोबर राजकीय वर्चस्व जर येत नसेल तर अशा प्रकारें कर्ज घेण्यास कांहींच प्रत्यवाय नसावा" ( Page 46 ). योजनेंतील या आशावादाशीं सहमत होणें फार कठीण आहे. आतांपर्यंतचा कर्जाचा इतिहास पाहिला तर याच्या विरुद्ध साक्ष देतो आणि अमेरिकन भांडवलदार अनासक्त बुद्धीनें कर्ज देण्याचा निष्काम कर्मयोग आचरतील असें मानण्यास आतांपर्यंत तरी पुरावा उपलब्ध झालेला नाहीं. अमेरिकन भांडवलाच्या आयातीबरोबर अमेरिकन साम्राज्याची आयात होणार कीं नाहीं हें कशावर अवलंबून आहे याचा विचार केला असतां योजनेचा आशावाद किती विफल आहे याची साक्ष सहज पटेल. कर्ज घेतल्यानंतर मुद्दलाची फेड व व्याज या दोन गोष्टी देण्याची ताकद त्या देशांतील अर्थव्यवस्थेंत असली पाहिजे. मुंबई योजनेंत ही ताकद आहे काय असा प्रश्न योजनेच्या प्रवर्तकांनीं आपल्या मनाशीं विचारावा. आलेलें कर्ज ज्या प्रकारचे धंदे वाढविण्यांत खर्चीं पडणार आहे त्या उद्योगधंद्यांतून देशाचा आर्थिक विकास होण्याचीं कोणतींहि चिन्हें दिसत नाहींत. यंत्रसामुग्रीची पैदास मोठ्या प्रमाणावर सुरू झाली तरी त्या मालाला गिऱ्हाईक कोठून मिळणार हें मुंबई योजनेपुढें एक सततचें प्रश्नचिन्ह आहे. फिरून कारखान्यांना कुलुपें ठोकण्याची पाळी येईल त्यावेळीं फिरून अमेरिकन भांडवलदार कर्ज देण्यास तयार आहेतच. नाझी जर्मनीची आर्थिक वाढ अशा प्रकारें अमेरिकन भांडवलाच्या जोरावरच झाली ही गोष्ट लक्षांत घेतल्यास अमेरिकेच्या कर्जाबरोबर अमेरिकन साम्राज्याची आयात होणें अगदीं स्वाभाविक आहे असेंच म्हणणें भाग पडतें.

मात्र ज्या ब्रिटिश साम्राज्याच्या वातावरणांत दीडशें वर्षें आपण वावरलों त्यापेक्षां अमेरिकन साम्राज्याचा नमुना अगदीं न्यारा आहे. ईस्ट इंडिया कंपनीनें ज्या पद्धतीनें या देशांत आपलें बस्तान बसविलें, प्रांतोप्रांतीं लढाया करून प्रांतांमागून प्रांत काबीज केले, मदतीला फौज ठेवून राजकीय वर्चस्व वाढविलें आणि अखेर आसेतुहिमाचल साम्राज्याची घोषणा केली ती पद्धति विसाव्या शतकांत अमेरिकन साम्राज्यानें टाकाऊ ठरविली आहे. त्यांच्या साम्राज्याची आयात कदाचित् लोकांना कळणार नाहीं. या देशांत

आपलें भांडवल पेरलें गेल्यानंतर तें सुरक्षित राखण्याची हमी मुंबई—योजनेकडून अमेरिकन साम्राज्य अपेक्षील. जनतेच्या वाढत्या दारिद्र्यावर मुंबई-योजनेचा डोलारा उभा असल्याकारणानें त्यांतील राष्ट्रीय सरकारला दिवसेंदिवस 'कायदा व सुरक्षितता' यांची काळजी वाहणें क्रमप्राप्तच ठरेल. प्रारंभीं राष्ट्रवादाच्या नैसर्गीक भांडवलावर लोकाची दिशाभूल करण्यांत या देशांतील भांडवलदारांना यश आलें तरी भौतिक दारिद्र्य ही अशी चीज आहे कीं ती फार काळ दडवतां येत नाहीं. त्या भौतिक दारिद्र्यानें जनतेच्या पोटांतील कालवाकालवीबरोबरच मनांतील कालवाकालव वाढीस लागणें स्वाभाविक आहे. आणि या वाढत्या असंतोषाला कह्यांत आणण्याचें कार्य राष्ट्रीय सरकारकडून होईल अशी अपेक्षा हिंदी भांडवलदारांचीच रहाणार नसून धनको अमेरिकनांची देखील तीच अपेक्षा रहाणार आहे. कारण त्यांच्याहि हितसंबंधाला त्यांत धोका आहे. त्या असंतोषाच्या वावटळीपुढें राष्ट्रीय सरकारचे पाय लटपटूं लागले तर ते अधिक बळकट करण्यासाठीं हिंदी भांडवलदारांइतकीच अमेरिकन भांडवलदारांनाहि काळजी वाटूं लागणें सहजप्राप्त ठरतें. त्या सरकारचे पाय या देशांत अधिक बळकट करण्यासाठीं या देशांत शस्त्रास्त्रांच्या वाढीला लागणाऱ्या कारखान्यांसाठीं अमेरिकन लोक उदारबुद्धीनें कर्ज तर देतीलच, पण राष्ट्रीय स्वातंत्र्याचा नाममात्र टिळा लावलेल्या या राष्ट्रीय सरकारच्या अंतर्गत व बाह्य राजकीय धोरणाचीं सूत्रें दिल्ली अथवा सिमला येथून न हालतां, न्यूयार्कमधून हाललीं जातील. अशा रीतीनें हिंदुस्थानवर पारतंत्र्य लादण्याचा राजकीय देखावा न करतां, कर्जाच्या सामर्थ्यावर अदृश्य व वेदना न करणारें साम्राज्य स्थापण्यांत अमेरिकनांचा हातखंडा आहे असें गेल्या पंचवीस वर्षांचा इतिहास सांगतो. त्या इतिहासावरून मुंबई योजनेचा आशावाद एक तरी वेडा आशावाद असला पाहिजे किंवा त्यांतून निराळाच बोध निघत असला पाहिजे. आमच्या मतें हिंदी भांडवलदार वेड्या आशावादाच्या आहारीं जाणारा वर्ग नाहीं. प्राप्त परिस्थितींत हिंदी भांडवलदाराचे आर्थिक हितसम्बन्ध अमेरिकन साम्राज्याशींच एकरूप झालेले दिसतात. अर्थात् हा प्रश्न राजकीय स्वरूपाचा असल्याकारणानें त्या स्वरूपाचें विषयान्तर येथे न करता कर्जाऊ भांडवलाबाबत इतकेंच म्हणतां येईल कीं मुंबई योजनेच्या एकंदर स्वरूपा-

वरून हें कर्ज राजकीय वर्चस्व न आणतां त्या योजनेला घेणें सर्वस्वीं अशक्य आहे.

× × ×

मुंबई योजनेच्या चारहि महत्त्वाच्या अंगांचा शास्त्रीय दृष्टीनें विचार करतांना आपणास काय आढळलें ? त्या सर्व परीक्षणांतून ही योजना फॅसिझमच्या दिशेनें जात आहे या एकाच सत्याचा आपणास वारंवार प्रत्यय येत गेला. ज्या औद्योगिक विकासाची कल्पना मुंबई योजनेंतून निघते तो विकास पाया लहान व इमारत मोठी असा उलट्या दिशेनें होणार आहे ( Topheavy structure ). फॅसिझमच्या अर्थव्यवस्थेचें तें एक प्रमुख लक्षण आहे. शेतीच्या वाढीला स्वाभाविक या अर्थव्यवस्थेमध्यें मर्यादा पडत असल्याकारणानें लोकांचें दारिद्रय या योजनेला दूर करतां येणार नाहीं. त्या दारिद्रयाची मर्यादा योजनेच्या औद्योगिक वाढीला सतत बसत जाईल आणि त्यांतहि जे कांहीं उद्योगधंदे वाढत जातील त्यायोगें जनतेला मजुरी व कच्चा माल या रूपानें मिळणारी मिळकत भांडवल जमा करण्यासाठीं ठेवीच्या रूपानें हिरावून घेतली जाणार. अशा दरिद्री जनतेच्या देशांत बाजारपेठ आकुंचित रहाणें स्वाभाविक असल्याकारणानें औद्योगिक विकासालाहि आपोआप मर्यादा पडत जाईल. या मर्यादेच्या चौकटींत औद्योगिक वाढ करून आपला धंदा किफायतशिर राखावयाचा असेल तर संपत्ति बाजारांत नेहमीं कमी प्रमाणांत येणें कारखानदारांच्या दृष्टीनें हितावह ठरेल. थोडक्यांत सांगावयाचें तर विपुलतेचें ध्येय या योजनाबद्ध अर्थव्यवस्थेला स्वीकारतां येणार नाहीं, संपत्तीचा कृत्रिम तुटवडा निर्माण करण्याचेंच ( economy of scarcity ) ध्येय तिला पत्करिलें पाहिजे. फासिस्टांच्या अर्थव्यवस्थेचें हें दुसरें प्रमुख लक्षण आहे. जीर्ण जमीनधाऱ्याची पद्धति, सावकारी पाश, भांडवलदारांचा नफा, उत्पादनाच्या साधनांवरील खाजगी मालमत्ता, या चौकटीच्या मर्यादेंत ही मुंबई योजना आंखली गेल्याकारणानें जनतेचें दारिद्य नष्ट करण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं तर नाहींच; उलट दिवसेंदिवस हें दारिद्य वाढत जाण्याचा मात्र संभव आहे. या दारिद्याच्या भयानक वातावरणांत मर्यादित व विशिष्ट प्रकारचा औद्योगिक विकासच या योजनेला साध्य करणें शक्य असल्याकारणानें ७० टक्के जनता ज्या शेतीवर जगत आहे त्या धंद्याची

वाढ करणें तिच्या आटोक्याबाहेरचें आहे. स्वाभाविक देशाच्या औद्योगिक विकासाला आधारभूत शेतीची वाढ शक्य नाहीं म्हणून शेतीबाबत हा देश स्वावलंबनी झाला पाहिजे असें आद्यतत्त्व तिला मान्य करणें भाग पडत आहे. विसाव्या शतकांत परस्पर सहकार्याच्या तत्त्वावरच जगातील कोणत्याहि देशाचा आर्थिक विकास आज शक्य आहे, त्याच्या नेमकी विरुद्ध अशी स्वावलंबनाची भाषा ही योजना वापरीत आहे यावरूनहि फॅसिझममध्येंच या योजनेचें पर्यवसान होणार असें म्हणणें भाग आहे. ‘आर्थिक स्वावलंबन’ (autarchy) हें फासिझमचें तिसरें प्रमुख लक्षण आहे. विद्यमान समाजस्थितींत क्रांतिकारक बदल न करतां मुंबई योजनेला आपला संसार थाटावयाचा आहे, अर्थात् ‘योजना’ या गोंडस नांवाखालीं ती वावरत असली तरी खरा योजनाबद्ध अर्थव्यवहार ज्याला म्हणतां येईल तें ध्येय आकाशांतील चंद्राप्रमाणें तिच्यापासून नेहमीं दूरच रहाणार. अशाहि परिस्थितींत बहुसंख्य जनतेला दारिद्र्यांत खितपत ठेवून परदेशच्या बाजारपेठेवर स्वारी करण्याची गरज आणि पर्यायानें इतर दुबळ्या देशांवर लष्करी स्वारी करण्याची गरज या योजनेला भासावी हाहि त्या योजनेचा एक अपरिहार्य परिणामच आहे. यासाठीं आधींच असलेलें मध्ययुगीन वातावरण कायम ठेवून ग्रामोद्योगाच्या जोरावर अटकेपार आर्थिक स्वाऱ्या करण्याची व लोखंड, पोलाद, वीज, रासायनिक द्रव्यें, कोळसा इ० कारखान्यांत तयार होणाऱ्या यंत्रांतून लोणी, पाव, कापड, साखर, इ० जीवनावश्यक वस्तूंच्या ठिकाणीं युद्धोपयोगी साहित्य निर्माण करण्याची गरज या योजनेला भासते यावरूनहि ही योजना फॅसिझमच्या पावलावर पाऊल टाकून जाणार हेंच म्हणणें सयुक्तिक ठरेल. वाढतें दारिद्र्य व वाढतें लष्कर हें फॅसिझमचें चवथें लक्षण आहे.

लोकांच्या दारिद्र्यावर आर्थिक भरभराटीची इमारत बांधूं इच्छिणाऱ्या या योजनेला लोकांचें सहकार्य मिळूं शकेल काय या प्रश्नाचें उत्तरहि नकारात्मकच द्यावें लागेल. लोकांच्या हातांत कागदी नोटा देऊन त्यांना फुकटांत राबवून घेण्याची, त्यांनीं आपल्या कष्टांनीं जी गंगाजळी निर्माण केली आहे तिच्या जोरावर आपला नफा वाढविण्याची, त्यांच्या हातांत जें कांहीं किडूकमिडूक राहील तेंहि आर्थिक विकासाच्या नांवावर हिरावून घेण्याची, ग्रामो-

द्योगाच्या प्रशंसेखालीं त्यांच्यावर आर्थिक गुलामगिरी लादण्याची क्रिया मुंबईयोजनेंत सतत चालू राहिल्याकारणानें तिला जनतेचा विश्वास आपल्या अंगच्या गुणांवर मिळविणें अशक्य आहे. आणि जनतेचा विश्वास व खुषीचें सहकार्य तिला अवश्य वाटत असल्याकारणानें राष्ट्रीयत्वाच्या खोट्या भावनेला खेळवूनच तिला तो विश्वास संपादन करता येईल. ज्या पद्धतीनें राष्ट्राचें वैभव परत मिळविण्याची, व्हर्सायच्या तहाच्या अपमानाची सव्याज परत फेड करण्याची, राष्ट्रीय समाजवादानें प्रथम घोषणा केली त्याच पद्धतीनें या योजनेचें प्राणभूत असलेलें राष्ट्रीय सरकार जनतेपुढें ' रामराज्य स्थापण्याची ' विक्रमादित्याचें ' गतवैभव परत मिळविण्याची ' गर्जना करून जनतेचा विश्वास संपादन करण्याची आटोकाट खटपट करील याविषयींहि तिळमात्र शंका बाळगण्याचें कारण दिसत नाहीं. पण राष्ट्रीयत्वाच्या भावनेवर जनतेचा विश्वास संपादन करणें हेंहि फॅसिझमचें एक लक्षण आहे. अशा रीतीनें प्रारंभीं जनतेचा विश्वास संपादन करण्यात यश आलें तरी प्रत्यक्ष परिणाम दिसूं लागल्यानंतर राष्ट्राच्या वैभवाचें सत्य स्वरूप काय आहे याची प्रचीति येण्यास वेळ लागणार नाहीं आणि तशी प्रचीति येतांक्षणींच जनतेच्या मनांत असंतोष निर्माण होण्यास वेळहि लागणार नाहीं. मग त्यावेळीं ' राष्ट्रीय ऐक्य ' ' व्यक्तीपेक्षां राष्ट्र मोठें ' या उदात्त घोषणेच्या नांवाखालीं आपलें आसन बळकट करण्यासाठीं राष्ट्रीय सरकारला नंग्या सोटेशाहीचें स्वरूप धारण करावें लागणार असून त्या सरकारामार्फत, मानवसमाजानें व्यक्ति-स्वातंत्र्य, लोकशाही, समता हीं जीं ध्येयें निर्माण केलीं त्यांचा राष्ट्रीय ऐक्याच्या वेदीवर बळी देण्यांत येईल. अशा रीतीनें राजकीय दृष्ट्या देखील मुंबई योजना फॅसिझमच्याच दिशेनें जात आहे असा अखेर निर्णय देणें भाग पडतें.

# जनता-योजना



मुंबई-योजना किंवा भांडवलदार-योजनेचें ध्येय, स्वरूप व तीमधील मूलभूत तत्त्वें यांचा विचार गेल्या प्रकरणांत झाला. त्या योजनेच्या विचारांतून त्या योजनेनें दाखविलेला मार्ग फॅसिझमच्या दिशेनें जात आहे असें स्पष्ट व निर्भीड मत मांडलें. आतां या प्रकरणांत देशापुढें जी दुसरी योजना जनता-योजना या नांवानें पुढें आली आहे तिचें विवेचन करावयाचें आहे. पण जनतायोजनेचें विवेचन करण्यापूर्वी प्रस्तुत लेखकाची याविषयींची भूमिका स्पष्टपणें पुढें मांडणें अगत्याचें आहे. ज्या मूलतत्त्वांच्या अनुरोधानें जनता-योजनेची मांडणी केली आहे त्या तत्त्वांशीं प्रस्तुत लेखक संपूर्ण सहमत असल्याचें पहिल्या प्रकरणांत योजनेविषयीं जें सामान्य विवेचन केलें आहे त्यावरून दिसून येईल. मूलभूत तत्त्वांशीं सहमत झाल्याकारणानें त्या तात्त्विक बैठकीवरून देशाच्या विविध आर्थिक अंगांचा विकास करण्याची जी योजना जनता-योजनेनें सादर केली आहे त्याहि योजनेशीं लेखकाचें संपूर्ण सहमत स्वाभाविकच होतें. मागील प्रकरणीं देखील मुंबई योजनेचें परीक्षण करतांना आंकडे, तपशील यांवर भर न देतां त्यांतून निघणारा मार्ग, त्या तत्त्वाचें स्वरूप यांवरच सर्व परीक्षणाचा भर आहे हें त्या टीकेवरून कोणासहि दिसून येईल आणि तोच न्याय जनतायोजनेस लावून तीमधील विकासाची ढोबळ दिशाच महत्त्वाची आहे व त्याचाच विचार महत्त्वाचा आहे असें लेखकाला सांगावयाचें आहे. तेव्हां प्रस्तुत योजनेतील मूलभूत तत्त्वें, तीमधील विकासाची दिशा या सर्वांशीं संपूर्ण एकमत असल्याकारणानें साहजिकच पुढील विवेचन टीकात्मक न रहातां विवरणात्मक किंवा त्या योजनेवरील भाष्य या स्वरूपाचें राहिल्यास त्याला लेखकाचा नाइलाज आहे. दोनहि बाजूंचा समतोल बुद्धीनें विचार करून दोघांतहि कांहीं चांगलें असेल तें घ्यावें, वाईट तें फेकावें ही निःपक्षपाताची समजली जाणारी भूमिका या विवेचनांत घेणें अशक्य आहे आणि शास्त्रीय विचारांतहि निःपक्षपाती भूमिका संभवते असें लेखकाला वाटत नाहीं. जेथें मूल तत्त्वांचा मतभेद

आहे, तीं तत्त्वें परस्परांशीं विरोधी आहेत, तेथें समन्वय किंवा समेटाची भाषा शास्त्रज्ञ करूं शकेल हें असंभाव्य वाटतें. शास्त्राची तात्त्विक विरोधाबाबत भूमिका स्वच्छ व कणखर असते. त्या विरोधाबाबत अमुक तत्त्वें बरोबर व अमुक तत्त्वें चूक असा गोंधळांत न पाडणारा स्पष्ट निकाल द्यावा लागतो; आणि यासाठीं समेटाचा गोलमाल शास्त्रांत चालत नाहीं. म्हणून या अर्थशास्त्रीय विचारांतहि तत्त्वांचा विरोध आल्याकारणानें, त्या तत्त्वावरून फुटलेल्या वाटा विरोधी दिशेनें जात असल्याकारणानें त्या ठिकाणीं 'होय हीं तत्त्वें बरोबर, हीं तत्त्वें चूक' असाच खणखणीत जबाब द्यावयास हवा व या कारणास्तव निःपक्षपाताचें ढोंग न करतां जनता-योजनेच्या भूमिकेचा खुलासा किंवा तिचें अधिक स्पष्टीकरण या ठिकाणीं करतां येईल आणि तेंच करण्याचा येथें लेखकाचा उद्देश आहे.

## एक प्राथमिक खुलासा

जनता-योजनेची एकंदर मांडणी विचारांत घेतल्यास ही योजना मुंबई-योजनेला प्रतिस्पर्धि योजना आहे असा ग्रह होण्याचा संभव आहे; आणि तो स्वाभाविकच आहे. मुंबई-योजना उघड उघड या देशांतील भांडवलदार वर्गाच्या दृष्टिकोणांतून मांडली गेली आहे. याच्या उलट जनता-योजना श्रमजीवि जनतेच्या दृष्टिकोणांतून जन्म पावली आहे; व भांडवलदारांचा व श्रमजीवि जनतेचा आर्थिक दृष्टिकोण एकमेकांशीं विरोधी असल्याकारणानें त्यांचें स्वरूप एकमेकांविरुद्ध रहाणें अपरिहार्य ठरतें. वस्तुतः हिंदी कामगार फेडरेशननें ही योजना आंखतांना मुंबई योजनेला उत्तर देण्याच्या हेतूनें आंखलेली नव्हती, कारण त्यावेळीं मुंबई-योजनेचा जन्महि झालेला नव्हता. तथापि दोन भूमिकाच आजच्या समाजपद्धतींत वेगळ्या व विरोधी असल्याकारणानें दोनहि योजना टीका-प्रतिटीका या स्वरूपांत मांडल्या नसल्या तरी त्यांमध्यें विरोध दिसणें अपरिहार्य आहे. या ठिकाणीं भांडवलदार व श्रमजीवि जनता या दोन शब्दांतील गृहीत अर्थ अधिक स्पष्ट कळावयास हवेत. वास्तविक भांडवलदार हा शब्द एका विशिष्ट वर्गाला लावला जातो. त्याचप्रमाणें भांडवलदारवर्गाला विरोधी असा 'कामगार' शब्दहि राजकीय वातावरणांत वावरणाऱ्या लोकांच्या चांगलाच

परिचयाचा आहे. भांडवलदार व कामगार यांमध्यें वर्गविरोध असतो ही गोष्टहि आतां आपल्या चांगलीच सरावाची झालेली आहे. पण जनता–योजना या शब्दप्रयोगामध्यें जनता या शब्दानें केवळ कामगार म्हणजे कारखान्यांत काम करणारा इतका संकुचित अर्थ घेतलेला नाहीं; आणि त्याचें कारण हेंच कीं हिंदी समाजांत या अर्थानें श्रमजीवि जनता अल्पसंख्य ठरेल. १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें या देशांत कारखान्यांत काम करणारा वर्ग अवघा पन्नास लक्ष होता. जनता योजना कामगार–संघटनेनें तयार केलेली असली तरी या पन्नास लक्षांचेच हितसम्बन्ध लक्षांत घेऊन 'जनता-योजना' हें सार्थ नांव तिला घेतां आलें नसतें. व जनता या शब्दानें श्रमशक्तीवर जगणारी बहुसंख्य जनता–शेतकरी, कामगार, गरीब मध्यम वर्गांतील, कारकून, टायपिस्ट, तेली, तांबोळी, डॉक्टर, वकील इ०–या योजनेंत अभिप्रेत आहे. ही श्रमजीवि जनता देशांत ९० टक्यांच्या वर आहे; आणि हिंदी समाजाच्या विशिष्ट रचनेमध्यें या सर्व वर्गांचे हितसम्बन्ध एकरूप झालेले आहेत. याच्या उलट मुंबई–योजना जरी आठ भांडवलदारांनीं तयार केलेली असली तरी एकस्या भांडवलदारवर्गांचेच हितसम्बन्ध लक्षांत घेऊन तिची आंखणी झालेली नाहीं हें गेल्या प्रकरणांतील विवेचनावरून दिसून येईल. तशी ती खास भांडवलदार वर्गापुरतीच मर्यादित असती तर फ्रेंच राज्यक्रांतीप्रमाणें या देशांतील भांडवलदारांना जमीनदारीचे व सरंजामशाहीचे जुने अवशेष नामशेष करणें भाग पडलें असतें. मुंबई–योजनेच्या पाठीमागें सूत्रें हालविणाऱ्या भांडवलदारांना ही गोष्ट करणें शक्य झालेलें नाहीं, तेव्हां त्या योजनेंतहि भांडवलदारवर्ग या शब्दामध्यें आपल्या समाजांतील सर्व वरिष्ठ वर्गांचा समावेश करावयास हवा.

'भांडवलदार' व 'जनता' या दोन शब्दांच्या वाच्यार्थांमध्यें इतक्या व्यापक अर्थाचा फरक सुचविण्याचें कारण हिंदुस्थानांतील समाजव्यवस्थेंत वर्गावर्गांतील भेद स्पष्ट झालेले नाहींत. आपल्या समाजाची जी क्रमानें वाढ व्हावयास हवी होती आणि तीनशें चारशें वर्षांपूर्वी कांहीं बाहेरचीं कारणें आल्याकारणानें जी वाढ होण्यास अडथळा आला, ती वाढ थांबल्याचें हें एक लक्षण आहे. या समाजांत भांडवलदार, जमीनदार, शेतकरी, कामगार इ. वर्ग ज्या अर्थानें औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या देशांत ओळखले जातात

त्या अर्थानें त्यांच्यावर पाड्या चिकटविणें फार धाडसाचें काम ठरेल. वर्गा-वर्गामधील सीमारेषा फार पुसट आहेत; क्वचित् प्रसंगीं त्या एकमेकांना छेदूनहि जातात. म्हैसूरचा राजा ज्यावेळीं कोट्यवधि भांडवल कारखान्यांत गुंतवितो किंवा बिर्लाशेटजींसारखा बडा भांडवलदार ज्यावेळीं आपल्या कारखान्याकरितां एखाद्या संस्थानांतील हजारों एकर जमीन खरीदूं इच्छितो त्यावेळीं त्यांना भाडवलदार म्हणावें कीं जमीनदार या सदरांत ढकलावें याची शंका मनापुढें उभी राहणें अटळ आहे, आणि भांडवलदार आणि जमीन-दार या वर्गांतील सीमारेषा ज्याप्रमाणें पुसट आहेत असा अनुभव आपणास या उदाहरणांत येतो त्याचप्रमाणें शेतीवर जगणाऱ्या चारपांच भावांपैकीं एखादा भाऊ आपल्या शेतीच्या उत्पन्नांतील कमतरता भरून काढण्यासाठीं मुंबईसारख्या ठिकाणीं चार पांच महिने कामास जातो त्यावेळीं त्याला शेत-करी म्हणावें कीं कामगारांत जमा करावें या शंकेचा अनुभव पदोपदीं येणें स्वाभाविक आहे. सरंजामशाही, भांडवलशाही इ. सामाजिक विकासाच्या वेगवेगळ्या अवस्था हिंदी समाजानें अनुभविल्या नसून त्याची शतकानुशतकें कुचंबणा झाल्याचें हें स्पष्ट चिन्ह आहे आणि या समाजाची सुधारलेल्या समाजाप्रमाणें स्वच्छ वर्ग-विभागणी करणें शक्य नसून तशी कोणी हट-वादानें केल्यास वास्तव परिस्थितीचा त्यामुळें विपर्यासच होईल. सद्य:स्थितींत आपल्या समजाचे स्थूल मानानें दोन भाग पाडतां येतील. एक वरिष्ठ वर्ग आणि दुसरा श्रमजीवि जनता; आणि त्याच अनुरोधानें या योजनेला कामगार—योजना असें नांव न देतां जनता-योजना असें अर्थवाहक नांव दिलें आहे.*

## मार्गदर्शन, अनुकरण नव्हे

अशा रीतीनें एकटा कामगार वर्गच नव्हे; तर सबंध श्रमजीवि जनतेचा आर्थिक विकास साधण्याच्या हेतूनें तयार केलेल्या जनता-योजनेनें सोव्हिएट योजनेचें मार्गदर्शकत्व स्वीकारलें आहे असें त्या योजनेच्या प्रस्तावनेंतच योजना-

* It waa pointed out in the paper that labour was not treated as industrial workers only, but as the entire mass of people engaged in productive occupations." ( Forword to Peoples' Plan ).

कार मान्य करतात. पहिल्या प्रकरणांत दाखविल्याप्रमाणें गेल्या महायुद्धानंतर जगापुढें दोन स्वरूपाच्या आर्थिक योजना आलेल्या आहेत, एक सोव्हिएट योजना व दुसरी नाझी योजना. एक भांडवलशाहीची चौकट फोडून नवीन पायावर अर्थव्यवस्था उभारूं इच्छिते. दुसरी ती चौकट कायम ठेवून भांडवलशाहीपुढील पेंचप्रसंग सोडवण्याचा प्रयत्न करते. या दोन योजनेमधील तत्त्वें, स्वरूप व त्यांची दिशा एकमेकांपासून वेगळ्या आहेत इतकेंच नव्हे तर त्या परस्परविरोधी आहेत. दोघांनाहि 'आर्थिक योजना' हें एकच नांव आहे म्हणून त्या एकाच स्वरूपाच्या असल्या पाहिजेत असें मानणें घातक व आत्मवंचना करणारें आहे. त्याचबरोबर या दोन प्रकारच्या योजनांखेरीज तिसरा कोणताहि मार्ग जगापुढें आलेला नाहीं ही गोष्ट लक्षांत घेतां हिंदुस्थानलाहि या दोन दिशांचाच विचार करावयास हवा. मुंबई–योजना भांडवलदार अर्थव्यवस्थेचीं मूलतत्त्वें कायम राखून नियोजित अर्थव्यवहाराची भाषा बोलत असल्याकारणानें तिचें साम्य नाझी योजनेशीं अधिक आहे हें गेल्या प्रकरणांतील परीक्षणावरून स्पष्ट होऊं शकेल. उलटपक्षीं जनतेचा खराखुरा आर्थिक विकास साधण्यासाठीं आर्थिक योजना हवी असेल तर सोव्हिएट योजनेनें दाखविलेल्या मार्गाशिवाय दुसरा कोणताहि मार्ग रहात नाहीं.

तथापि योजनेंतच स्पष्ट केल्याप्रमाणें जनता-योजनेनें सोव्हिएट योजनेचें मार्गदर्शकत्व मान्य केलें आहे; तिचें सर्वस्वीं अनुकरण ती करूं इच्छित नाहीं या फरकावर या ठिकाणीं भर द्यावासा वाटतो. सोव्हिएट योजनेनें गेल्या महायुद्धानंतर जे मूलभूत प्रश्न उपस्थित केले आणि धाडसानें ते प्रश्न हाताळण्याचा व सोडवण्याचा जो प्रयत्न केला त्यालाच योजनाविषयक विचारांत केव्हांहि अधिक महत्त्व आहे. पण मूलभूत तत्त्वें जरी एकच असलीं तरी प्रत्येक देशांतील विशिष्ट परिस्थितीला तीं लागू करतांना त्या परिस्थितींतील विशेषानुसार थोडा फार फरक करावा लागतोच; आणि मूलभूत तत्त्वें कोणतीं हें निश्चित करणें जितकें महत्त्वाचें आहे तितकेंच त्या तत्त्वाचा विद्यमान परिस्थितीशीं मेळ घालणें हें कार्यहि महत्त्वाचें आहे. हें महत्त्वाचें कार्य यशस्वी रीतीनें बजावण्यासाठीं सोव्हिएट योजनेचें मार्गदर्शन पत्करूनहि आपणांस आपल्या देशांतील आर्थिक परिस्थितीचा तपशीलवार

अभ्यास करण्याची आवश्यकता रहाते. तशा प्रकारें देशांतील विद्यमान स्थिति तपासून आपल्या आर्थिक जीवनांतील मूलभूत प्रश्न कोणते यांची मांडणी प्रथम करावी लागते. आणि ज्या तत्त्वांचें मार्गदर्शन आपण स्वीकारलें आहे त्या तत्त्वांचा अंमल या मूलभूत प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठीं कशा रीतीनें केला पाहिजे याची आंखणी करावी लागते. तत्त्वाचा विशिष्ट परिस्थितीशीं अशा पद्धतीनें मेळ घालण्याचें स्वातंत्र्य राखून ज्या वेळीं विशिष्ट तत्त्वें आपण स्विकारीत असतों त्यावेळीं त्या तत्त्वांचें मार्गदर्शन आपण मान्य केलें असाच त्याचा अर्थ आहे. परिस्थितीच्या वैशिष्ट्यास न जुमानतां तत्त्वें जशींच्या तशीं लागू करणें हें मार्गदर्शन नसून अनुकरण आहे; नव्हे अंधानुकरण आहे आणि अंधानुकरण केव्हांहि घातकच असतें. यासाठीं जनता–योजनेनें सोव्हिएट रशियाचें मार्गदर्शकत्व मुंबई योजनेप्रमाणें अप्रत्यक्ष रीत्याच नव्हे तर जाणूनबुजून, उघडउघडपणें स्वीकारलें आहे.*

## संक्रमण-कालाची योजना हवी

गेल्या महायुद्धानंतर आणि विशेषतः चालू युद्धकालांत जगांतील प्रत्येक देशापुढें फॅसिझम कीं समाजवाद हे दोनच मार्ग निर्माण झाले आहेत. तीनचार शतकें चालू असलेल्या भांडवलदार समाजाचें शेवटचें स्वरूप जर्मनीमध्यें उग्र स्वरूपांत प्रकट झालें असलें तरी प्रत्येक देशांतील भांडवलदार समाजाला आपला तरणोपाय फॅसिझममध्येंच आहे हें स्पष्ट कळून चुकलें होतें. याच्या उलट भांडवलशाही समाजव्यवस्था नको असेल तर समाजवादाशिवाय अन्य मार्ग नाहीं याचीहि निदान सुधारलेल्या देशांतील पुरोगामी व स्वतंत्र विचार करणाऱ्या बुद्धिमंतांना उत्कटत्वानें जाणीव झाली होती. भांडवलदार अर्थपद्धति इतक्या निर्विवाद रीतीनें दिवाळखोर

*The experience of the Soviet Union will not be repeated elsewhere in the same manner. Its value consists in its being a guide in understanding the real nature and purpose of a planned economy if such an economy were to lead to the result of bridging the ever-widening gap between production and consumption." (Peoples' Plan p. 2-3)

बनल्याचा अनुभव येत होता कीं, अद्यापि भांडवलशाही बेकारी, मंदी, महायुद्धें हे दोष टाळून समाजाची भरभराट करूं शकेल असें समर्थन करणें मुष्कील होतें आणि जे असें समर्थन करण्याचा प्रयत्न करीत होते त्यांची ती बौद्धिक कसरत मनाची खात्री पटविण्यास असमर्थ होती आणि यासाठीं नाणावलेल्या विचारवंतांचा कल अधिकाधिक प्रमाणांत समाजवादाकडे झुकूं लागलेला होता.

तथापि हिंदी समाजांतील वैचारिक क्षेत्रांत हिंदुस्थानची आर्थिक उन्नति करण्यासाठीं भांडवलदार अर्थपद्धति आवश्यक आहे असा समज फार काळापासून दृढ झालेला दिसतो. हा समज आमच्या विचारांत ठाण मांडून बसण्याचें प्रमुख कारण असें दिसतें कीं, हिंदुस्थानची इंग्लंड, फ्रान्स इ० सुधारलेल्या देशांप्रमाणें औद्योगिक वाढ झालेली नव्हती आणि अद्यापहि नाहीं, याचा अनुभव पदोपदीं येत होता. ज्याअर्थीं आपण औद्योगिक दृष्ट्या मागासलेले आहोंत व ज्याअर्थीं औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या एका देशाची गुलामगिरी आपल्यावर याच कारणानें लादली गेली त्याअर्थीं आपलें जर पहिलें कार्य कोणतें असेल तर तें हें कीं, आपण त्याबाबत इतर राष्ट्रांच्या बरोबरीला आलें पाहिजे असा युक्तिवाद साहजिकच सर्वमान्य होणें अगदीं स्वाभाविक गोष्ट होती. त्या युक्तिवादाला धरून हिंदुस्थानची आर्थिक उन्नति करावयाची असेल तर ज्या अर्थपद्धतीचा अवलंब सुधारलेल्या देशांनीं केला तीच अर्थपद्धति हिंदुस्थाननें स्वीकारली कीं काम झालें या विचाराकडे लोकमताचा काटा झुकणेंहि तितकेंच स्वाभाविक होतें.

पण नेमकें याच ठिकाणीं सूक्ष्म विचाराची गरज भासते. हिंदुस्थान अद्यापि सरंजामशाहीचें युग ज्याला म्हणतां येईल त्याच युगांत वावरत आहे ही गोष्ट खरी. तीनचार शतकांपूर्वीं इंग्लंड, फ्रान्स इ० देशांतील समाज अशाच प्रकारें मागासलेल्या अवस्थेंत होते हीहि गोष्ट खरी. पण त्यावरून ज्याअर्थीं त्या देशांनीं आपली प्रगति भांडवलशाहीच्या द्वारें केली त्याअर्थीं आपणासहि तीच युक्ति अवलंबली पाहिजे असें अनुमान काढण्यांत धोका आहे. कारण भांडवलशाही या नांवानें ओळखली जाणारी समाजव्यवस्था स्थिर स्वरूपाची राहिलेली नाहीं. तिच्यांत अनेक स्थित्यंतरें घडत

गेलेलीं आहेत. ज्यावेळीं सरंजामशाहीचा पाडाव करून ती आपला जम बसवीत होती त्यावेळचें तिचें स्वरूप, साम्राज्याच्या 'वाढींत तिचें रूपांतर होत होतें त्यावेळचें तिचें स्वरूप आणि गेल्या महायुद्धानंतर फॅसिझमच्या रूपानें प्रकट झालेलें तिचें स्वरूप या सर्वांना ' भांडवलशाही ' हें एकच नांव असलें तरी त्या वेगवेगळ्या अवस्था होत, त्यांमध्यें फरक आहे या गोष्टीची दखल आपण आपल्या विचारांत घेतली पाहिजे. ज्या वेळेस औद्योगिक क्रांतीच्या द्वारा ती इंग्लंडमध्यें जन्म पावत होती त्यावेळीं ती विस्तार पावत होती आणि तिच्या विकासास सबंध जग मोकळें होतें. नेपोलियन नेहमीं म्हणत असे त्याप्रमाणें खरोखरीच इंग्लंड जगाचें त्यावेळीं वर्कशॉप बनलेलें होतें. माल खूप तयार करावा, नौकानयन, रेल्वे इ० साधनांनीं जगाच्या कोणत्याहि बाजारपेठेंत तो खपवावा आणि मिळालेल्या फायद्यांत जनतेला थोड्या प्रमाणांत सहभागी करावें या स्वरूपाचें कार्य औद्योगिक भांडवलशाही त्यावेळीं करण्यास समर्थ होती. विसाव्या शतकाच्या प्रारंभाला आणि गेल्या महायुद्धानंतर भांडवलशाहीची ही विस्तार पावण्याची अवस्था संपून उतरती कळा लागल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. आज जगांत इंग्लंडसारखीं किंवा त्यापेक्षाहि पुढारलेलीं वर्कशॉप्स तयार झालीं असून त्यांच्यांत प्राणांतिक स्पर्धा सुरू झालेली आहे. जगांतील सर्व बाजारपेठा तिनें काबीज केल्या असून विस्तार पावण्यास त्या अर्थव्यवस्थेला आतां जागाच उरलेली नाहीं. अशा परिस्थितींत भांडवलशाहीला जगावयाचेंच असेल तर फॅसिझमनें दाखविलेला एकच मार्ग तिच्यापुढें शिल्लक रहातो.

तेव्हां हिंदुस्थाननें भांडवलशाहीच्या या उतरत्या काळांत भांडवलदार अर्थव्यवस्थेचें अनुकरण करावयाचें याचा सरळ अर्थ आपल्या हातानें फॅसिझमला वाट मोकळी करून द्यावयाची असा होतो. कारण हिंदुस्थानचें आर्थिक जीवनहि जगांतील आर्थिक व्यवहाराशीं निगडित झालेलें आहे. उदारमतवाद, व्यक्तिस्वातंत्र्य, खुली स्पर्धा, उत्पादनाची सतत वाढ या स्वरूपाची भांडवलदार अर्थव्यवस्था आज कोणत्याहि देशांत जन्म पावणें शक्य नाहीं. यासाठीं हिंदुस्थानच्या आर्थिक विकासाचा प्रश्न अगदीं वेगळ्या स्वरूपांत आपणांपुढें उभा राहतो. तीनचारशें वर्षांपूर्वीं ज्या प्रकारचीं उत्पा-

दनाचीं साधनें व पद्धति भांडवलदार वर्गांनीं युरोपखंडांत आणली त्याच प्रकारचीं साधनें व ती उत्पादनपद्धति या देशांत येण्याची गरज आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर या देशाच्या आर्थिक विकासाला एका औद्योगिक क्रांतीची गरज आहे, यांत शंका नाहीं; पण त्याच बरोबर तीनशें वर्षांपूर्वीं या क्रांतीचें नेतृत्व ज्या भांडवलदार वर्गाकडे होतें तो वर्ग या देशांत तें कार्य करण्यास असमर्थ आहे. भांडवलदार अर्थव्यवस्थेला वळसा घालून भांडवलशाहीनें इतिहासांत एके काळीं जें सामाजिक विकासाचें कार्य बजावलें तेंच कार्य आपणास अद्यापि या देशांत केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

भांडवलशाहीचा विकास व ऱ्हास यांचा गेल्या तीन शतकांचा इतिहास लक्षांत घेतां भांडवलशाहीचें अंधानुकरण करण्यांत फॅसिझमचा धोका आहे ह्याचा इषारा या ठिकाणीं देणें इष्ट वाटतें. भांडवलदारांनीं निर्माण केलेलीं उत्पादनाचीं साधनें, दळणवळणाची नवीन सामग्री, या सर्व गोष्टींची आपणास आज गरज आहे खरी; पण ती गरज भागवतांना आपणास पूर्वीचें उदारमतवादी अर्थशास्त्र आज स्वीकारता येणार नाहीं हीही गोष्ट त्याचबरोबर ध्यानांत घेतली पाहिजे. पण ज्याप्रमाणें भांडवलशाहीचें अंधानुकरण करण्यांत धोका आहे त्याचप्रमाणें समाजवादाचें अंधानुकरणहि तितकेंच हास्यास्पद ठरणार आहे. दुर्दैवानें या देशात भांडवलशाही, समाजवाद या दोनहि समाजपद्धतींकडे पाहण्याचा दृष्टिकोण शास्त्रीय नसून भावनेचाच त्यांत बराच भाग दिसून येतो. भांडवलशाही नको असें म्हटल्याबरोबर 'मग समाजवादच कां हवा' या दुसऱ्या टोकाकडे आमच्या विचाराचा लंबक हेलकावे खातांना आढळेल. या भावनावश समाजवाद्यांनीं एक गोष्ट लक्षांत घेणें इष्ट आहे कीं समाजवाद कांहीं व्यक्तींच्या मनांत आलें कीं स्थापन होत असतो इतकी ती सोपी गोष्ट नाहीं. समाजवादाच्या प्रस्थापनेस एक प्रकारें अनुकूल भूमिका त्या समाजांत तयार व्हावी लागते. ती अनुकूल भूमिका म्हणजे औद्योगिक वाढ. ही औद्योगिक वाढ सुधारलेल्या देशांत भांडवलदार वर्गानें केल्याकारणानें आज त्यांना समाजवाद स्वीकारणें इष्ट नि शक्य आहे. पण ज्या देशांत अद्यापि हें प्राथमिक औद्योगिक विकासाचें कार्य व्हावयाचें आहे त्या ठिकाणीं समाजवादी अर्थव्यवस्थेचें स्वप्न रंगविण्यापासून आत्मवंचनेखेरीज दुसरें कांहींहि निष्पन्न होऊं शकत नाहीं. तेव्हां इतिहासाच्या परीक्षणावरून आपणास असें दिसतें कीं हिंदी समाज आज भांडवल-

शाही व समाजवाद या दोन अवस्थांच्या संधिकालांत उभा आहे. त्या समाजापुढें असलेला आर्थिक प्रश्न थोडक्यांत असा मांडतां येईल कीं भांडवलशाहीनें गत इतिहासांत केलेलें औद्योगिक विकासाचें कार्य भांडवलदार वर्गाचें प्रभुत्व बाजूस सारून शक्य तितक्या लवकर पार पाडण्याची व समाजवादाला अनुकूल भूमि निर्माण करण्याची गरज आज आमच्या समाजाला आहे. भांडवलशाही व समाजवाद यांच्या संक्रमणकालांत हिंदुस्थान असल्याकारणानें त्या संक्रमणकालातील आर्थिक जीवनाला साजेशी अशी योजना आज हिंदुस्थान मागीत आहे आणि जनतायोजना ही त्या मागणीच्या अनुरोधानेंच तयार झालेली आहे असें आपणांस तिच्या स्वरूपावरून दिसून आल्याखेरीज रहाणार नाहीं.*

योजनेचें ध्येय

कांहीं प्राथमिक गोष्टींचा याप्रमाणें खुलासा केल्यानंतर जनता—योजनेच्या आर्थिक ध्येयाकडे आपणास वळलें पाहिजे. योजनेच्या प्रस्तावनेंत योजनाकार म्हणतात; "योजनाबद्ध अर्थव्यवहार झाला कीं समाजाचा आर्थिक अभ्युदय व हित होतेंच अशी खात्री नाहीं. तें हित साधण्यासाठीं योजनेचें ध्येय व स्वरूप यांचा विचार होणें अवश्य आहे" वरील विधानाच्या पुष्ट्यर्थ नाझी व सोव्हिएट योजनेचा दाखला देऊन व त्यांच्या वेगवेगळ्या परिणामांकडे बोट दाखवून योजनाकार पुढें असा इषारा देऊं इच्छितात कीं, "केवळ जनतेचें रहाणीचें मान वाढविण्याची योजनेनें घोषणा केली कीं त्यामुळें त्या ध्येयाच्या दिशेनें फार पुढें जातों असें नाहीं......जनतेचें रहाणीचें मान वाढविणें व आर्थिक योजना यांमध्यें तसा अपरिहार्य सम्बन्ध नाहीं, किंवा राष्ट्रीय संपत्तीची वाढ व रहाणीचें मान यांमध्येंहि तसा निय-

* "In other words, the necessay transition of economy from Capitalism to Socialism can be planned. India requires that kind of planning. The Schacht plan favoured by big business will have to be rejected because it will do more harm than good. On the other hand, SOviet planning now will be not only premature but utopian." —Alphabet of Fascist Economics, Page 92.

मित संबंध नाहीं. " राष्ट्रीय संपत्तीची वाढ एकीकडे होत असतां रहाणीचें मान खालावत गेल्याचीं उदाहरणें लक्षांत घेऊन योजनाकारांनीं आपलें ध्येय केवळ राष्ट्रीय संपत्तीची वाढ करणें इतकें मर्यादित न ठेवतां जनतेच्या रहाणीचें मान वाढविणें असें निश्चित स्वरूपाचें आंखलेलें आहे. दहा वर्षांच्या अवधीनंतर ग्रामीण जनतेच्या जीवनाचें मान २९ रु. पासून १२१ रु. पर्यंत म्हणजे तिपटीनें आणि शहरांतील जनतेचें ५७ रुपयांपासून १७२ रु. पर्यंत म्हणजे दुपटीनें वाढेल अशी जनता–योजनेची अपेक्षा आहे (पा. ५५) दर माणशीं उत्पन्नाच्या प्रमाणांत हें प्रमाण पाहिलें तर योजनाकार असें दाखवितात कीं योजनेच्या पहिल्या वर्षीं शहर व खेडेगांव या दोहोंतील जनतेचें उत्पन्न दर माणशीं रु. ३३ असें पडतें; आणि दहा वर्षांनंतर तें १२८ रुपयांपर्यंत जाईल. जनतायोजनेची अपेक्षा अशी आहे कीं ही योजना सुरू झाल्यापासून सामान्य नागरिकाला आपल्या जीवनांतील भौतिक आनंद चौपटीनें वाढला असें दिसून येईल. मुंबई–योजना राष्ट्रीय उत्पन्न व दर माणशीं उत्पन्न पंधरा वर्षांच्या अवधींत अनुक्रमें दुप्पट व तिप्पट आणि रहाणीचें मान अवघें पंचवीस टक्के वाढविणार आहे; तर जनता-योजनेनें ग्रामीण व शहर असे दोन भाग पाडून त्या विभागांतील सामान्य जनतेच्या जीवनांत दर वर्षाला किती वाढ होईल याची कल्पना पुढें मांडलेली (पा. ४६–४७) आहे.

पण योजनाकार स्वतःच इषारा देतात त्याप्रमाणें "कोणत्याहि योजनेला जनतेचें रहाणीचें मान वाढलें जाईल अशी ध्येयाची घोषणा ही गोष्ट महत्त्वाची नाहीं; तें ध्येय प्रत्यक्षांत कसें उतरेल हें सिद्ध करणें अधिक महत्त्वाचें आहे." (पा. ३). तेव्हां जनता-योजना हें ध्येय साध्य करूं शकेल काय असा प्रश्न या ठिकाणीं उपस्थित होतो; आणि या प्रश्नाचें होकारार्थी वा नकारार्थी उत्तर देण्यापूर्वी जे मूलभूत प्रश्न योजनेंत उपस्थित केले आहेत आणि त्या प्रश्नांचीं जीं उत्तरें त्यांत दिलेलीं आहेत त्यांची प्रथम छाननी व्हावयास पाहिजे. त्या मूलभूत प्रश्नांच्या विचारावरच जनता-योजनेची सर्व इमारत उभी आहे. त्या प्रश्नांचीं जीं उत्तरें आपणांस या योजनेकडून मिळतील त्यावर जनता योजनेच्या ठिकाणीं वर सांगितलेलें ध्येय साध्य करण्याचा वकूब आहे कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर अवलंबून आहे आणि

त्या दृष्टीनें योजनेंतील दुसरें प्रकरण ( Fundamental considerations of Planned Economy for India) हें सर्वांत महत्त्वाचें प्रकरण ठरतें. प्रत्यक्ष योजनेची आंखणी या तत्त्वांच्या अनुरोधानेंच झाली असल्याकारणानें ह्या प्रकरणांतील विचार सर्व योजनेचा एकंदर पाया होय असें म्हटल्यास त्यांत अवास्तव असें कांहींच होणार नाहीं.

## आर्थिक जीवनांतील मध्यवर्ति प्रश्न

हिंदुस्थानांतील शेंकडा नव्वद टक्के जनतेच्या आर्थिक विकासाच्या दृष्टीनें मध्यवर्ति प्रश्न 'दारिद्र्याचा' आहे. 'दारिद्र्य' हा शब्द उच्चारला कीं त्या शब्दानें वेगवेगळ्या कल्पना मनांत निर्माण होऊं शकतात. सगळा देश जिंकल्यानंतर आतां कोणताहि देश जिंकण्यास उरला नाहीं म्हणून रडणारा अलेक्झांडर बादशहा आपली महत्त्वाकांक्षा अपुरी राहिली या दृष्टीनें स्वतःला दरिद्री म्हणवूं इच्छील तर तसल्या दारिद्र्याचा अर्थशास्त्रीय विचारांत कांहीं उपयोग नाहीं. अर्थशास्त्र बिचारें मनुष्याच्या भौतिक जीवनाचा विचार करीत असतें, यासाठीं कल्पनादारिद्र्य, विचारदारिद्र्य, आध्यात्मिक दारिद्र्य या विविध स्वरूपाच्या दारिद्र्यांचा येथें विचार अप्रस्तुत ठरतो. त्याचप्रमाणें या भौतिक दारिद्र्याबाबतहि साहित्य, काव्य किंवा अध्यात्म यांचा शास्त्रीय विचारांत कोणताच उपयोग नाहीं. ज्या दारिद्र्याची हाकाटी या देशांत राजकीय चळवळीला प्रारंभ झाल्यापासून करण्यांत आली आहे त्या दारिद्र्याची कल्पना आपण श्रमजीवि जनतेच्या जीवनाचें वास्तव परीक्षण केल्यास सहज येऊं शकेल. मानवी जीवनाच्या अन्न, वस्त्र, घर, आरोग्य व शिक्षण या पांच किमान पक्षी भौतिक गरजा आहेत ही गोष्ट वादातीत असल्याकारणानें या किमानपक्षी गरजा भागविण्याचें सामर्थ्यहि हिंदी जनतेजवळ नाहीं आणि या अर्थानें ती दरिद्री आहे. हा दारिद्र्याचा नव्वद टक्के जनतेच्या दृष्टीनें अर्थ आहे. तोच अर्थ घेऊन दारिद्र्याचा विचार कोणत्याहि योजनेनें केला पाहिजे. या देशांतील सामान्य जनतेचें अठराविश्वे दारिद्र्य हिंदी अर्थशास्त्रांत अशा रीतीनें विचाराचें केंद्र बनण्याचें कारण त्या विचाराशिवाय या देशाच्या आर्थिक भरभराटीची, औद्योगिक वाढीची व वैभवाची कल्पना करण्याचा खटाटोप अनाठायीं व निष्फळ होणार आहे. बहुसंख्य

जनतेला दरिद्री ठेवून कांहीं काळ भरभराटीची अवस्था दिसली तरी ती चिरकाल टिकूं शकत नाहीं; त्या औद्योगिक वैभवालाहि ओहोटी लागते, उत्पादनाचें यंत्र बंद पडतें, हा अनुभव सुधारलेल्या देशांना आला. हिंदुस्थानांत तर या आर्थिक विकासाला प्रारंभ करतांनाच प्रथम अथातो दारिद्र्य-मीमांसा या प्रश्नापासून सुरुवात करणें भाग पडतें. आणि या अर्थानें श्रम-जीवि जनतेचें दारिद्र्य हा आमच्या अर्थकारणांतील एक मूलभूत व मध्यवर्ति प्रश्न होऊन बसला आहे.

## रोगाचें निदान प्रथम

ज्या आर्थिक दारिद्र्याच्या रोगानें आपला समाज आंतून पोखरला गेला आहे, सडलेला आहे, कुजलेला आहे, त्यावर उपाययोजना होण्यापूर्वी प्रथम त्याचें निदान झालें पाहिजे; आणि या रोगनिदानाच्या बाबतींतच आपणांस मतामतांतरांचा गलबला माजलेला दिसतो. साहजिकच त्यामुळें नाना-प्रकारचे खरेखोटे, भलेबुरे आर्थिक उपायहि आपणांपुढें आज आलेले दिसतात. या सर्वांमधील सत्यासत्याचा निर्णय लावण्यापूर्वी या रोगाच्या निदानापासूनच सुरुवात केली असतां सत्य व परिणामकारक उपाययोजना कोणती याचाहि स्वाभाविक रीत्या निकाल लागणार आहे. दारिद्र्याची वर जी किमानपक्षी व्याख्या केली ती नीट लक्षांत घेतल्यास या दारिद्र्याचें स्पष्ट दिसणारें कारण म्हणजे या गरजा भागविण्यास आवश्यक अशा वस्तू या देशांत भरपूर प्रमाणांत निर्माण होऊं शकत नाहींत हेंच होय. अशा प्रकारें भोग्य वस्तूंची निपज कमी प्रमाणावर होण्याचें कारणहि या देशांतील मानवी श्रमशक्तीची संपत्ति निर्माण करण्याची ताकद कमी, फार कमी आहे हेंच दिलें पाहिजे ( low productivity of labour ). आणि ही गोष्ट आपल्या अनुभवावरून सहज सिद्ध करण्यासारखी आहे. ७० टक्के जनता शेतीवर जगते; त्या शेतीची स्थिति पाहिल्यास अत्यंत मागासलेल्या साधनांनीं जमी-नीची मशागत; कालवे, पाटबंधारे इ० साधनांचा अभाव असल्याकारणानें निसर्गावर हवाला; खतें, बीबियाणें इ० बाबत ज्ञानाचा व कौशल्याचा तुटवडा आणि या सर्व कारणांमुळें जमिनीचें उत्पन्न कमी अशी हलाखीची व करुणाजनक परिस्थिति आपणांस सर्वत्र आढळते. आजच्या काळांत

मनुष्याला हवी असणारी संपत्ति निसर्ग आपण होऊन देत नाहीं; ती त्याजपासून उत्पादनाच्या साधनांनीं जबरदस्तीनें हिसकावून घ्यावी लागते. याकरितां निसर्गातून संपत्ति निर्माण करण्याची खरी ताकद मानवी श्रमशक्तिमध्येंच आहे आणि त्या श्रमशक्तीचें उत्पादनसामर्थ्य ज्या साधनांच्या सहाय्यानें तयार होतें त्या साधनांवरच सर्वस्वी अवलंबून आहे. हीं उत्पादनसाधनें जितकीं प्रभावी व थोड्या श्रमांत अधिक काम देणारीं असतील तितकें श्रमाचें उत्पादक सामर्थ्य अधिक हें एक साधें समीकरण आहे. जगांतील पुढारलेल्या देशांत हीं उत्पादनाचीं साधनें आज फार प्रभावी स्वरूपाचीं आहेत व त्यामुळें त्या देशांतील मानवी श्रम थोड्या काळांत विपुल संपत्ति तयार करूं शकतात. या अभागी देशांत मात्र अद्यापि त्याच मागासलेल्या साधनांच्या–लाकडी नांगर, लाकडी औत, हातमाग, पटाशी इ०–साहाय्यानें संपत्ति निर्माण करण्याचें कार्य चालू आहे आणि स्वाभाविकच त्याचा परिणामहि असा झालेला दिसतो कीं जी संपत्ति निर्माण करण्यास सुधारलेल्या यंत्रांच्या साहाय्यानें तास दोनतास लागतील तीच संपत्ति निर्माण करण्यास या देशांतील कास्तकारास, कारागिरास किंवा अन्य कष्टाळू इसमास दिवसाचे दहाबारा तास खर्चीं घालावे लागतात. हा शुद्ध श्रमशक्तीचा अपव्यय आहे किंवा सरकारच्या खानेसुमारींत न दिसणारी ही बेकारी आहे. सुधारलेल्या भांडवलशाहींत यंत्रांच्या सहाय्यानें विपुल संपत्ति निर्माण करतां येते, पण ती उपभोगण्यास माणसें नाहींत या कारणासाठीं संपत्ति निर्माण करणारीं माणसें कमी करावीं लागतात आणि बेकारी आपणास आंकडेवारीनें मोजावयास मिळते. पण या देशांत जी संपत्ति निर्माण करण्यास दोनतीन तास पुरे पडतील ती निर्माण करण्यासाठीं सबंध दिवस राबावें लागतें म्हणून या देशांत बेकारी दिसत नाहीं. काव्य, साहित्य, भूतदया, नीति इ० अवांतर विषय बाजूला ठेवले तर शास्त्रीय दृष्टिकोणांतून या प्रश्नाकडे पाहिलें असतां मागासलेल्या साधनांनीं कसली जाणारी शेती व चालू असलेली कारागिरी म्हणजे या देशांतील श्रमशक्तीचा शुद्ध अपव्यय होय असें म्हणणें भाग पडतें.

## प्रश्न गुंतागुंतीचा

बहुसंख्य जनतेच्या या दारिद्र्याचें मुख्य कारण म्हणजे या देशांतील होत

असलेला श्रमशक्तीचा अपव्यय या जाणिवेंतूनच 'औद्योगीकरणाच्या' माग- णीला आपल्या आर्थिक विचारांत महत्त्व प्राप्त झालेलें दिसतें. आज पन्नास वर्षें आपल्या कानीं कपाळीं अशी एकच हाकाटी केली जात आहे कीं इंग्लंड, अमेरिका इ. देशांप्रमाणें याहि देशांत मोठमोठ्या उद्योगांची वाढ झाली, या देशांत त्यांच्याप्रमाणेंच कोळसे, लोखंड, पोलाद, हायड्रोइलेक्ट्रिक साठे, रासायनिक द्रव्यें यांचे प्रचंड प्रमाणावर कारखाने निर्माण झाले कीं या देशाचें दारिद्र्य फिटेल. पण गेल्या महायुद्धानंतर या देशांतील कारखान- दारीचा इतिहास आपण सूक्ष्मपणानें चाळला तर हा प्रश्न वाटतो तितका सोपा नाहीं याचा सहज पडताळा येईल. गेल्या महायुद्धानंतर या देशांतील कारखानदारांनाच काय, पण ब्रिटिश सरकारलाहि या देशाचें औद्योगीकरण करण्याची गरज भासूं लागली होती आणि त्याचें कारण भूतदया, संस्कृति- दान इत्यादि पूर्वीं खिस्ती मिशनऱ्यांनीं सांगितल्यापैकीं कोणतेंही नसून ज्या आर्थिक हेतूनें ब्रिटिश साम्राज्य आलें तो आर्थिक हेतूच होता हेंहि थोड्या विचाराअंतीं पटण्यास हरकत नाहीं. गेल्या महायुद्धापूर्वीं आपल्या देशांतील पक्क्या मालाला बाजारपेठ मिळावी म्हणून ब्रिटिश भांडवलदार व व्यापारी येथें आले व त्या व्यापारांतून नफा मिळविणें हा त्यांचा हेतु होता. महायुद्धा- नंतर त्यांना ही बाजारपेठ दरिद्री आहे या कटुसत्याची जाणीव झाल्याकारणानें आपली बाजारपेठ कायम राखण्यासाठीं व नफ्याचा दर कायम टिकविण्यासाठीं या देशांतच औद्योगिक वाढ करण्याची त्यांना गरज भासूं लागली. लॉर्ड हार्डिंज साहेबांनीं साम्राज्य टिकविण्यासाठीं औद्योगीकरणाची केलेली घोषणा, त्यानंतर एका औद्योगिक कमिशनची नेमणूक, त्याच्या पाठोपाठ फिस्कल कमिशनचा अवतार, शेतीबाबत रॉयल कमिशनची पाठवणी, लोखंड व पोलाद या कारखान्याला मिळालेलें संरक्षण इ. महत्त्वाच्या गोष्टींवर आपण धांवती नजर फेंकली तरी ब्रिटिश साम्राज्यशाहीला वाटत असलेल्या या गरजेची उत्कटत्वानें साक्ष पटते आणि प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें केवळ हिंदुस्थानवर उपकार करावा या उदारबुद्धीनें त्यांना ही गरज वाटत नसून आपलें आर्थिक अस्तित्व टिकविण्याच्या गरजेंतूनच या गरजेचा जन्म झाला होता. हिंदुस्थानच्या बाजार पेठेंत जपानी मालानें दिलेला शह त्यांना जाणवत होता. पण गरज भासणें ही गोष्ट वेगळी आणि ती भागवितां येणें ही गोष्ट वेगळी.

गेल्या पंचवीस वर्षांचा इतिहास असें सांगतो कीं केवळ स्वार्थानें का होईना, औद्योगीकरणाची गरज भासूनहि ब्रिटिश राज्यकर्त्यांना या देशांत औद्योगिक वाढ करतां आली नाहीं. असें कां व्हावें ? आणि ब्रिटिश भांडवलदारांच्या जागीं उद्यां हिंदी भांडवलदारांनीं हाच प्रश्न हातीं घेतला तर केवळ या देशांत ते जन्माला आले या एकाच कारणासाठीं ब्रिटिश राज्यकर्त्यांना जो अनुभव आला त्यापेक्षां वेगळा अनुभव त्यांना येईल असें मानण्यास काय जागा आहे ?

## दुष्टचक्रानें निर्माण केलेला प्रश्न

मागच्या इतिहासाची या ठिकाणीं उजळणी करण्याचें कारण आपल्या विचारांत औद्योगीकरणाचें जें वेड शिरलें आहे त्यावर साधकबाधक विचार करण्याची आवश्यकता पटावी हेंच आहे. वास्तविक औद्योगीकरणाचा उपाय हें एक अर्धसत्य आहे. दारिद्र्यनाशाच्या हेतूसाठीं जर आपणांस औद्योगीकरण करावयाचें असेल तर सध्यांच्या अर्थव्यवस्थेंत जें संपूर्ण दुष्टचक्र तयार झालें त्याचा अवश्य विचार करावयास हवा; आणि जगांतील भांडवलदार देशांना ज्या दुष्टचक्रानें भंडावलें होतें त्याचीच ही हिंदी आवृत्ति आहे असेंहि त्यांत दिसून येईल. कोणतें तें दुष्टचक्र ? तें दुष्टचक्र असें कीं दारिद्र्य नष्ट करण्यासाठीं श्रमशक्तीचें उत्पादन वाढवावयाचें, श्रमाची उत्पादकता वाढविण्यासाठीं औद्योगीकरण करावयाचें आणि औद्योगीकरण करण्यासाठीं दारिद्र्याचा नाश करावयाचा. यावरून दारिद्र्यनाशाच्या हेतूनें करूं घातलेल्या औद्योगीकरणाच्या मार्गांत कोणती गोष्ट आड येत असेल तर फिरून दारिद्र्यच आडवें येतें असें दिसून येईल. दारिद्र्य घालविण्यासाठीं जो उपाय अमलांत आला पाहिजे असें वाटतें तो उपाय अमलांत येण्यासहि अगोदर दारिद्र्य घालविलें पाहिजे अशा एका दुष्टचक्रांत आमचें आर्थिक जीवन सारखें गिरक्या खात असल्याकारणानें, औद्योगीकरण हें एक गेल्या पन्नास वर्षांतील अर्थशास्त्रीय विचारांत स्वप्नरंजन होऊन बसलें आहे. तथापि या दुष्टचक्रानें आपल्या आर्थिक जीवनांत जो प्रश्न निर्माण केला आहे तो मात्र विचारांत घेण्यासारखा आहे. तो प्रश्न असा कीं या देशांतील बहुसंख्य जनतेच्या हिताच्या दृष्टीनें ज्या प्रकारचा आर्थिक विकास

इष्ट नि आवश्यक आहे त्या प्रकारचा विकास भांडवलदार अर्थव्यवस्थेच्या चौकटींत होऊं शकेल काय ? या प्रश्नाचें स्पष्ट व सरळ उत्तर दिल्याशिवाय कोणत्याहि योजनेला दारिद्र्यनाशाची, जनतेची रहाणी सुधारण्याची व आर्थिक विकास करण्याची भाषाच बोलतां येणार नाहीं.

## औद्योगीकरणाचा आणखी विचार

वरील प्रश्नाचें समाधानकारक उत्तर शोधण्यासाठीं औद्योगीकरणाचा आणखी थोडा विचार करूं. कोणत्याहि देशाचें औद्योगीकरण होण्यास प्रामुख्यानें तीन घटकांची आवश्यकता आहे. एक नैसर्गिक संपत्ति, दुसरी मानवी श्रमशक्ति आणि तिसरी बाजारपेठ. यांपैकीं नैसर्गिक संपत्तीची अडचण या देशाला भासूं नये. कदाचित् ज्या खनिज संपत्तीचा तुटवडा भासेल ती संपत्ति आज जगांतील देवघेवीचें स्वरूप लक्षांत घेतां बाहेरून येण्यास कोणतीच अडचण दिसत नाहीं. आपलें ध्येय दारिद्र्य नष्ट करण्याचें असेल व देश कृत्रिम रीतीनें स्वयंपूर्ण करून लष्करी सामर्थ्य वाढविण्याचें उद्दिष्ट नसेल तर आंतरराष्ट्रीय सहकार्याच्या तत्त्वावर आपणास कमी पडणाऱ्या पदार्थांची आयात होण्याच्या मार्गांत कोणताहि अडथळा उद्यांच्या जगांत निर्माण होईल असें वाटत नाहीं. दुसरा घटक म्हणजे मानवी श्रमशक्ति. आणि त्यासंबंधानें अधिक स्पष्टीकरण करण्याची गरज नाहीं इतक्या भरपूर प्रमाणांत आपल्याजवळ तो घटक आहे. पण औद्योगीकरणाच्या बाबत खरी अडचण कोणती असेल तर ती तिसऱ्या घटकाची. मोठमोठे उद्योगधंदे वाढवावयाचे म्हणजे त्या ठिकाणीं दोन प्रकारचे उद्योग या देशांत आरंभावयास हवेत. एक, ज्या उत्पादक साधनांच्या साहाय्यानें आपण श्रमाची उत्पादकता वाढवूं इच्छितों ते उत्पादक वस्तूंचे कारखाने आणि या कारखान्यांच्या वाढींतून ज्या भोग्य वस्तूंची जनतेला गरज आहे त्या भोग्य वस्तूंच्या कारखान्यांची वाढ. पण आपणापुढें लगेच प्रश्न असा येतो कीं, घटकाभर सर्व अडचणी बाजूस सारून कल्पना केली कीं उद्यांच्या हिंदुस्थानांत या दोनहि प्रकारच्या उद्योगांना प्रारंभ होऊन माल मोठ्या प्रमाणावर तयार होण्यास सुरुवात झाली तरी तो विकत घेणार कोण ? लोक, नव्वद टक्के जनता, असें त्याचें उत्तर ओठावर येतें न येतें तोंच त्यांचे खिसे रिकामे

असल्याची जाणीव होऊन हें उत्तर परत घेण्याचा प्रसंग येतो. मग मालाला गिऱ्हाईक नसलें तर पुढील वर्षीं उत्पादनाचें यंत्र थांबवावयाचें ? त्याला नकारात्मक उत्तर द्यावयाचें असेल तर त्या मालाला या देशांत बाजारपेठ तयार करावयाचा प्रश्न दत्त म्हणून आपणांसमोर उभा राहतो. तेव्हां या देशाच्या आर्थिक व औद्योगिक विकासाला योग्य भूमि तयार करावयाची असेल तर ९० टक्के श्रमजीवि जनतेची क्रयशक्ति वाढविणें हाच एक मार्ग शिल्लक राहतो आणि भांडवलदार अर्थपद्धति या मार्गाचा अवलंब करण्यास समर्थ आहे काय हा या दृष्टीनें आपल्यापुढें महत्त्वाचा प्रश्न आहे.

## जो उत्पादक तोच भोक्ता व तोच गिऱ्हाईक

भांडवलदार अर्थव्यवस्था हा मार्ग स्वीकारण्यास असमर्थ आहे हें उत्तरहि आपणांस त्याचबरोबर दिलें पाहिजे; आणि भांडवलदार अर्थपद्धति असमर्थ आहे याचें कारण त्या अर्थव्यवस्थेंत श्रमशक्तीचें उत्पादन–सामर्थ्य वाढविण्याची ज्या प्रमाणांत खटपट केली जाते त्याच प्रमाणांत त्या श्रमशक्तीचा मालक हा त्याच उत्पन्न झालेल्या संपत्तीचा भोक्ता असल्याकारणानें त्याचें भोक्तृत्व वाढविण्याची खटपट केली जात नाहीं. संपत्तीचें उत्पादन एकसारखें वाढत जाणें हें उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं उत्पन्न झालेली संपत्ति घेणार कोण याचाहि त्याबरोबरच विचार अवश्य करावा लागतो; आणि तसा विचार केला तर जो उत्पादक तोच अखेर या संपत्तीचा भोक्ता म्हणजेच तोच या संपत्तीचें गिऱ्हाईक आहे हें साधें समीकरण आपणांस मान्य करणें भाग आहे. पण भांडवलशाहींत ज्या हेतूनें उत्पादन केलें जातें तो हेतूच या समीकरणाच्या आड येत असतो हें पहिल्या प्रकरणांतील विवेचनांत स्पष्ट झालेलें आहे. यासाठीं हिंदुस्थानच्या आर्थिक विकासाला लोकांची क्रयशक्ति वाढविणें अवश्य असल्याकारणानें संपत्तीच्या उत्पादनाचा हेतु आपणांस बदलल्याशिवाय ती क्रयशक्ति वाढवितां येणार नाहीं याच विचाराला जनता योजना येऊन ठेपली असें आपणांस दिसेल. तो बदललेला हेतु म्हणजे नफ्याच्या ठिकाणीं सामाजिक गरजा भागविणें. संपत्तीचें उत्पादन नफा वाढविण्यासाठीं करणें घातक असून तें सामाजिक गरजा भागविण्याच्याच हेतूनें झालें तरच जनतेचें रहाणीचें मान वाढविणें,

बाजारपेठेचा विस्तार करणें आणि देशाची औद्योगिक वाढ करणें शक्य होणार आहे असा जनता–योजनेचा आग्रह आहे आणि तो योग्य नाहीं असें कोण म्हणूं शकेल ?

## मालकी हक्कांत मूलग्राही बदल

संपत्ति उत्पादन करण्याचा रूढ हेतु नफा. तो बदलून समाजाच्या गरजा भागविण्याच्या हेतूनें उत्पादन करण्यासाठीं चालू समाजांत कांहीं मूलग्राही क्रांतिकारक बदल करणें प्राप्त आहे; आणि त्यांपैकीं सर्वांत मोठा फरक मालकी हक्काच्या हितसम्बन्धांत करावा लागेल, असें आपल्या समाज-घटनेच्या स्वरूपावरून कोणासहि दिसून येईल. संपत्तीचें उत्पादन नफ्याच्या हेतूनें होतें याचें कारण उत्पादनाच्या साधनावर मालकी खाजगी स्वरूपाची आहे. ज्यांची मालकी त्या साधनावर आहे त्यांना त्या साधनांचा वापर होत असतांना नफा मिळाला नाहीं तर तीं साधनें त्यांच्या दृष्टीनें कुच-कामाचीं ठरतात; आणि त्यांच्या हेतूच्या पूर्तीसाठीं त्या साधनांचा वापर होऊं द्यावयाचा म्हटलें तर उत्पन्न होणाऱ्या धनापैकीं मोठा वाटा या अल्प-संख्यांना द्यावा लागतो; आणि अल्पांना जास्त व पुष्कळांना कमी अशी संपत्तीची विषम वांटणी झाल्याकारणानें समाजांत दारिद्र्याचा रोग फैलावत जातो, असा सार्वत्रिक अनुभव आपण हिशोबांत घेतला पाहिजे. यावरून संपत्तीच्या उत्पादन–योजनेबरोबरच विभजनाची कल्पना किती निगडित झालेली आहे याची कल्पना येण्यास हरकत नाहीं. यासाठीं संपत्तीच्या उत्पादनाबरोबरच विभजनाची कल्पना येतेच येते असा प्रथम खुलासा करून जनता–योजनेनें, दारिद्र्याचा नाश होण्यासाठीं संपत्तीची वांटणी सामाजिक गरजेनुसार व्हावी असें असेल तर, संपत्तीच्या हेतूमध्यें ज्याप्रमाणें फरक करण्याची आवश्यकता आहे त्याचप्रमाणें उत्पादन साधनावरील मालकी हक्कांतहि बदल करणें तितकेंच आवश्क आहे असें आपलें मत स्पष्ट नमूद केलें आहे. ज्या दोन तत्त्वांची आर्थिक योजनेस आवश्यकता आहे असें पहिल्या प्रकरणांत स्पष्ट केलें तीं दोन तत्त्वें जनता–योजनेनें आपली योजना आंखतांना मार्गदर्शक म्हणून स्वीकारलीं आहेत असें यावरून स्पष्ट दिसून येईल.

## नियंत्रित भांडवलशाही

या दोन मार्गदर्शक तत्त्वांचा केवळ पुरस्कार केल्यानेंच काम भागत नाहीं. त्यांचा हिंदुस्थानांतील विशिष्ट आर्थिक परिस्थितीशीं मेळ घालण्याचें कार्य त्याहून अधिक महत्त्वाचें आहे. मागेंच सांगितल्याप्रमाणें हिंदुस्थान एका संधिकालांत उभा असल्याकारणानें आमच्या जीवनांतहि मालकी हक्क वेगवेगळ्या प्रकारचे आहेत. या देशांत मध्ययुगीन सरंजामशाही अद्यापि तग धरून आहे आणि त्याच्याच आश्रयानें भांडवलशाहीची प्रस्तावना थोड्याफार प्रमाणांत झाली आहे. हें एक ढोबळ वैशिष्ट्य जरी लक्षांत घेतलें तरी जमिनीवरील मालकीहक्क व कारखान्यावरील मालकीहक्क यांच्या स्वरूपांत फार फरक आहे ही गोष्ट लक्षांत येऊं शकेल. त्याचप्रमाणें जमिनीवरील मालकीहक्कांचा जरी आपण सूक्ष्मपणानें विचार केला तरी त्यांतहि विविध प्रकारचे मालकीहक्क दिसून येतात. संयुक्तप्रांत, बंगाल, बिहार या ठिकाणीं असलेल्या जमीनदार पद्धतीपासून, मुंबई प्रातांतील रयतवारी पद्धतीपर्यंत मालकीहक्काचे अनेक नमुने आपणास पहावयास सांपडतात. त्याचप्रमाणें आपण औद्योगिक क्षेत्रांत आपलें लक्ष वळविलें तर आपणास असें दिसेल कीं टाटासारख्या बड्या कारखानदारांबरोबरच अद्यापि चारचार, पांचपांच किंबहुना एखादा हातमाग घेऊन काम चालविणारे कारागीरहि या देशांत तग धरून आहेत. जर सुधारलेल्या देशाप्रमाणें मालकीहक्काचें स्वरूप प्रचंड औद्योगीकरण होऊन स्पष्ट झालें तर मालकीहक्काचें अजिबात उच्चाटन करण्याचा मार्ग या देशांत सोपा झाला असता. तशा प्रकारचा स्वाभाविक विकास दुर्दैवानें या देशाचा झाला नाहीं.

त्यामुळें खाजगी मालकी संपूर्णांशानें या देशांत नष्ट करणें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं. मानवी समाजांत खाजगी मालकीचें तत्त्व ज्या वेळीं जन्म पावलें त्या वेळीं त्याची समाजाला गरज होती म्हणूनच तें जन्मास आलें. भांडवलशाहीनें त्या तत्त्वाचा भौतिक पाया पार उखडून टाकला. कारण तिनें जन्मास घातलेल्या सामुदायिक उत्पादनपद्धतीमध्यें मालकी एकीकडे व उत्पादक श्रम दुसरीकडे अशी विभागणी केली. वैयक्तिक उत्पादनपद्धतीमध्यें उत्पादनाच्या साधनावर मालकीहक्क होता त्याचबरोबर उत्पादनाच्या

क्रियेमध्यें मालकाचे श्रमहि खर्ची पडत होते. मालक व मजूर अशा रीतीनें एकच असल्याकारणानें मालकीहक्क व श्रमशक्ति यांचा त्या ठिकाणीं मिलाफ झालेला दिसून येतो आणि त्यामुळें संपत्तीच्या वाटणींतहि मालकी हक्काबरोबरच श्रमशक्तीचाहि हिशोब धरला जात होता. मालकीहक्काचें कायदेशीर व नैतिक समर्थन या भौतिक किंवा आर्थिक पायावर केलें जात असे. पण सामुदायिक उत्पादनपद्धतीनें मालकीहक्क व श्रमशक्ति यांची पूर्ण फारकत केल्याकारणानें मालकीहक्काचा त्या पद्धतीनें भौतिक पायाच उखडून टाकला असें म्हणावयास हरकत नाहीं आणि याच कारणासाठीं खाजगी मालकी संपूर्ण नष्ट करणें, भांडवलशाहींत शक्य नि इष्ट ठरतें; कारण ते मालकीहक्क भांडवलदारांनीं अगोदरच नष्ट केलेले असतात. जें कांहीं नष्ट करावयाचें राहिलेलें असतें तें फक्त त्या हक्कांचें कायदेशीर व नैतिक आवरण.

मालकी हक्कासंबंधीं हा विचार लक्षांत घेऊन आपण हिंदुस्थानांतील मालकी हक्काच्या स्वरूपाविषयीं विचार करूं लागलों तर एक गोष्ट प्रामुख्यानें दिसून येते ती अशी कीं या देशाच्या अर्थकारणांत भांडवलदार उत्पादन-पद्धतीचा प्रसार मोठ्या प्रमाणावर न झाल्याकारणानें आपणांस खाजगी मालकी संपूर्ण नष्ट करतां येणार नाहीं. मग काय करतां येईल ? या प्रश्नाचें उत्तर त्या त्या प्रकारच्या मालकी हक्काचें स्वरूप ठरवूनच दिलें पाहिजे. जनता-योजनेनें या दृष्टीनें विचार करून ठोकळ मानानें पुढील गोष्टींचा विचार केलेला आहे.

(१) शेतीवरील मालकी हक्क; या ठिकाणीं जमीनदारी व सावकारी या दोहोंचाहि विचार संभवतो.
(२) रेल्वे, खाणी व इतर मोठाले कारखाने यांवरील मालकी हक्क.
(३) बँका व इतर पैशाच्या देवघेवी करणाऱ्या संस्था.
(४) जमिनीच्या पोटांतील खनिज व इतर नैसर्गिक संपत्ति.
(५) छोटे छोटे कारखाने, हातधंदे, लहान व्यापारी इ० वरील मालकी हक्क.

या पांचहि प्रकारच्या मालकी हक्कांमध्यें प्रथम औद्योगिक क्षेत्रांतील मालकी हक्कांचा विचार केला तर त्यामध्यें सामुदायिक पद्धतीनें संपत्तीचें उत्पादन करणारे कारखाने, छोट्या प्रमाणावर यंत्रांचा उपयोग करणारे

कारखाने, वेगवेगळे हस्तव्यवसाय, ग्रामोद्योग इत्यादि विविध थर आपणास आढळतात आणि सब घोडे बारा टक्के या न्यायानें सरसहा मालकी हक्कांचें उच्चाटन आपणास त्या ठिकाणीं करतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें या औद्योगिक क्षेत्राला जोडून बँका व इतर पैशाच्या देवघेवी करणाऱ्या संस्था, घाऊक व किरकोळ व्यापारी यांचाहि विचार आपणास त्याच पद्धतीनें करणें भाग आहे. जनता–योजनेनें हा सर्व विचार लक्षांत घेऊन ज्याला महत्त्वाचे व मोठ्या प्रमाणावर चालणारे उद्योगधंदे असें म्हणतां येईल त्यांतून खाजगी मालकी अजिबात नष्ट होणेंच योग्य असें सुचविलें आहे. रेल्वे, खाणी, रासायनिक द्रव्यांचे कारखाने, लोखंड व पोलाद या औद्योगिक क्षेत्रांत सार्वजनिक मालकी स्थापन होणेंच इष्ट आहे असें थोड्या विचाराअंतीं कोणासहि पटेल. पण या प्रचंड व महत्त्वाच्या औद्योगिक क्षेत्राशिवाय व्यापार, बँका व उत्पादनाचें क्षेत्र मोठें असून त्यामध्यें एका फटकाऱ्यासरशीं वैयक्तिक मालकीचें उच्चाटन कोणाहि सरकारास करणें शक्य होणार नाहीं. आणि या क्षेत्रांत मालक व श्रमजीवि यांमधील अंतर फारच थोडें असल्याकारणानें तसें करणें इष्टहि होणार नाहीं. तथापि आपल्या विशिष्ट परिस्थितीमुळें खाजगी मालकी हक्काला जरी या क्षेत्रांत हात लावला नसला तरी या मालकी हक्कावरती कडक नियंत्रण ठेवण्याची आवश्यकता आहे असा जनता–योजना इषारा देऊं इच्छिते. खाजगी मालकी हक्काला अनिर्बंध संचार करण्याची मुभा दिली तर त्याचें नफेबाजींत रूपांतर होण्याचा धोका कायम रहातो हा अनुभव जमेस धरून श्रमजीवि जनतेच्या हिताच्या दृष्टीनें या नफ्यावर नियंत्रण ठेवणें अगत्याचें ठरतें आणि जरी भांडवलशाहीचें समूळ उच्चाटन करणें आपणांस अशक्य असलें तरी 'नियंत्रित भांडवलशाही' चें तत्त्व (controlled capitalism) अमलांत आणणें शक्य आहे आणि प्राप्त परिस्थितींत आपला आर्थिक विकास लवकर साधण्यासाठीं आपणापुढें तोच एक मार्ग आहे असें जनता योजनेचें ठाम मत आहे.

(If the tempo of industrial development in the country is to be quickened, we see no possible alternative to the one of 'rationed' capitalism. : Peoples' Plan, P. 6.)

### मालकी हक्काचें दुहेरी स्वरूप

औद्योगिक क्षेत्रांतून आपली दृष्टि या देशांतलि मुख्य उपजीविकेच्या साधनाकडे म्हणजे शेतीकडे वळली कीं या ठिकाणीं खाजगी मालकीचें स्वरूप फार वेगळ्या प्रकारचें आहे आणि त्यामुळें या ठिकाणीं जी योजना करणें भाग पडेल ती तो फरक लक्षांत घेऊनच केली पाहिजे या गोष्टींची दखल ध्यावी लागते. शेंकडा ७० टक्के लोक या धंद्यावर जगतात यासाठीं यामध्यें बदल होणें अत्यंत निकडीचें कार्य होऊन बसलें आहे. पण शेतीवरील खाजगी मालकीचें स्वरूप दोन प्रकारचें आहे. एक कायदेशीर (legal) व दुसरें आर्थिक. यापैकीं जमिनीची कायदेशीर मालकी आजहि सरकारकडेच आहे आणि जमिनीच्या पोटांतलि खनिज व इतर नैसर्गिक संपत्ति सबंध समाजाची असल्याकारणानें त्या दृष्टीनें भावी योजनेंतहि जमिन व तदंतर्गत नैसर्गिक संपत्ति कायद्यानें सरकारच्या मालकीचीच होण्यांत समाजाचा फायदाच होणार आहे. पण वाद आहे तो आर्थिक मालकीचा. खाजगी मालकी कशासाठीं असते असा प्रश्न मनाशीं विचारला तर त्याचें उत्तर हेंच द्यावें लागेल कीं जमिनींतून निघणाऱ्या संपत्तीपैकीं वाटा–आणि तोहि मोटा वाटा–बळकावण्यासाठीं. या दृष्टीनें विचार करतां उत्पन्नावर हक्क सांगणारा आर्थिक स्वरूपाचा मालकी हक्कच आज जाचक ठरत आहे असें दिसेल. आणि जो कांहीं बदल करावयास हवा तो या हक्काबाबत करावयास हवा.

संपत्तीच्या वाटयाच्या दृष्टीनें या मालकी हक्काची बोंच कोठें आहे या प्रश्नाचा विचार करूं लागलों असतां अनुत्पादक वर्गाच्या हातांत संपत्तीचा मोठा वाटा या हक्कामुळें जातो याच ठिकाणीं हा काटा खुपतो असें आपणास दिसेल; आणि तें शल्य काढून टाकण्यासाठीं या मालकी हक्काचें रूपांतर केलें असतां काम भागेल असें जनता–योजनेनें दाखविलें आहे. शेतीच्या बाबतींत आजचा उत्पादक वर्ग 'जमीनदार व सावकार' या कात्रींत सांपडला आहे ही गोष्ट आतां वादातीत मानली जाते. जमीनदाराचा खंड तर कायद्यानेंच संरक्षिला जातो आणि सावकाराचें व्याज वसूल न झालें तर कायदा त्याच्या मदतीस धांवून जातो. प्रश्न असा आहे कीं,

या दोन वाट्यांचे धनी संपत्तीच्या उत्पादनाच्या कामांत भाग घेतात काय? ' नाहीं ' असेंच त्याचें उत्तर द्यावें लागेल. तेव्हां त्यांचा मालकी हक्क अनुत्पादक स्वरूपाचा असल्याकारणानें तो आमच्या जीवनावर परावलंबी स्वरूपाचा व म्हणूनच भारभूत झाला आहे आणि यासाठीं ही अनुत्पादकाची मालकी उत्पादकवर्गाला द्या अशी सूचना—जनता योजनेनें केलेली आहे. यावरून शेतीवरील मालकीहक्काचें अजिबात उच्चाटन न करतां मालकी हक्काच्या स्वरूपांत मूलग्राही फरक करण्याचीच सूचना ही योजना करीत आहे असें दिसेल.

आणखी एका दृष्टीनें चालू मालकी हक्क व त्यांचें संरक्षण करणारी जमीनधाऱ्याची पद्धति बदलली पाहिजे असें सिद्ध करतां येईल. आज परिस्थिति काय होते तें पहा. प्रत्यक्ष कसणारा जो शेतकरी त्याच्या उत्पन्नावर दोन हक्कदार. एक सरकार आणि दुसरा जमीनदार. सरकारचा शेतकऱ्याशीं साक्षात् संबंध नाहीं; तो जमीनदारामार्फत येतो. सरकारला ठराविक भाग मिळवून देण्याची जबाबदारी जमीनदारावर आहे आणि त्याच्या मोबदला शेतकऱ्याच्या उत्पन्नांतून त्याच्या मनाला वाटेल तो हिस्सा उचलण्याचा हक्क जमीनदाराला आहे. जमीनदाराला अशा रीतीनें अडत्याचें स्वरूप आल्याकारणानें सरकारचा वाटा दिल्यानंतर आपल्याला आधिक उत्पन्न मिळविण्याची खटपट त्यानें करणें स्वाभाविकच आहे. पण त्याचा परिणाम मात्र शेतकऱ्याची परिस्थिति दिवसेंदिवस खालावण्यांत होत आहे. ही भयानक परिस्थिति खुद्द या देशांतील वंगप्रांताबाबत परकी सरकारनें नेमलेल्या फ्राऊड कमिशनलाहि दिसून आली आणि त्या कमिशननें बहुमतानें असा निर्णय दिला कीं आजची जमीनधाऱ्याची पद्धति टाकाऊ असून ती बदलली पाहिजे आणि त्या ठिकाणीं सरकार व शेतकरी यांचा साक्षात् संबंध स्थापन केला पाहिजे.

(" There is a clear majority on the commission who are convinced that in order to improve the economic conditions of the cultivators the permanent system and the zamindari system should be replaced by a rayatwari system under which the Government would be brought into direct relations with the actual cultivators by the acquisition of all the superior interests in

agricultural land " Report of Land Revenue Commission, Bengal, 1938. Vol. I, para 94.)

कमिशनच्या बहुमताला बंगाल्यांत जी परिस्थिति आढळली तीच, जमीनदारी पद्धति ज्या ज्या प्रांतांत आहे त्या त्या प्रांतांत आहे आणि यासाठीं कमिशनची सूचना त्या सर्व प्रांतांस लागू करणें इष्ट आहे असें जनता–योजनेचें म्हणणें आहे.

ज्या प्रांतांत रयतवारी पद्धति आहे त्या ठिकाणीं जमीनदाराचा खंड नसला तरी सावकारी व्याज थैमान घालीत आहे असा अनुभव पदोपदीं येतो; आणि कर्जाच्या पाशामुळें रयतांची परिस्थिति जमीनदारी पद्धतीपेक्षां अधिक वाईट नसली तरी तितकी तरी वाईट खास आहे. शेतकऱ्याला व्याज देतां येत नसल्याकारणानें कायद्यानें तो नाममात्र हक्कदार रहातो; पण उत्पन्नाची मालकी वस्तुतः सावकाराकडेच जाते. जमिनी कित्येक वर्षें गहाण म्हणून सावकाराकडे पडतात; कायद्याची मालकी त्याच्याकडेच असल्याकारणानें जमीन पिकविण्याबाबत मात्र शेतकरी मालक असतो, पण पीक आल्यावर गहाणखतानें दिलेली ताबेदारी तें पीक सावकाराच्या ओटीवर आणून सोडते. कित्येक प्रसंगीं बीं बियाणें, औत, कुळव यासाठीं थोडें फार कर्ज घेतल्याकारणानें येणारें पीक गहाण लावून देण्याचा प्रसंग त्याच्यावर येत असतो. या सर्व गोष्टींचा विचार केला तर असें दिसेल कीं, जमिनीच्या मशागतीची काळजी न वहातां पिकाचें लोणी आपल्या घशांत ओतणारी सावकारी प्रत्यक्ष जमीनदारी पद्धतीपेक्षां अधिक घातक स्वरूपाची अशी प्रच्छन्न जमीनदारीच आहे आणि यासाठींच या अदृश्य स्वरूपाच्या मालकी हक्कांतहि फरक केला पाहिजे अशी योजनेची कैफियत आहे.

## क्रांतिकारक मवाळ सूचना

ही मालकी हक्कांत एक प्रकारें क्रांतिच होत आहे असें पाहून कांहींजण बिथरतील. पण चालू महायुद्धांत त्या शब्दाचा बागुलबोवा नष्ट झालेला आहे इतकेंच समाधान या भित्र्या मनोवृत्तीला देतां येण्यासारखें आहे. जनता-योजना याहिपुढें एक पाऊल गेलेली आपणास दिसेल. तिनें केलेल्या सूचनेनुसार मालकीहक्क हिसकावून न घेतां त्याचा रीतसर मोबदला देऊन ते विकत घ्यावेत ही मवाळ उपाययोजनाहि जर हटवादानें जमीनदार नाकार-

तील तर त्यांना समाजहितापेक्षां आपल्या वर्गाचा नागडा स्वार्थ अधिक जवळचा आहे असाच त्याचा अर्थ करावा लागेल. पण जमिनीवरील मालकीहक्क नुकसानभरपाईच्या तत्त्वावर विकत घेण्याची भाषा काढतांच, ज्वलज्जहाल क्रातिकारक लगेच बिथरण्याचा संभव आहे. त्या क्रांतिकार-कांना जनता-योजनेचें असें सांगणें आहे कीं क्रांति हा भावनेचा खेळ नसून ती एक सामाजिक विकासाची पायरी आहे. सामाजिक विकासाचा विचार करीत असतांना खऱ्या क्रातिकारकाला वस्तुस्थितीचा विचार करावा लागतो आणि त्यावरून उपाय ठरवावे लागतात. या उतावीळया क्रांतिकारकांनीं असा विचार केला तर शेतकऱ्याच्या हलाखीप्रमाणेंच जमीनदारी पद्धतिहि आंतून पोखरलेली आहे असें त्यांना दिसून येईल. वास्तविक आमचा समाज हा इतका आंतून सडलेला आहे कीं, श्रमजीवि जनतेंत ज्याप्रमाणें त्राण उरलेलें नाहीं त्याचप्रमाणें जमीनदार व सावकार या दोन वर्गांतहि आर्थिक दृष्ट्या त्राण उरलेलें नाहीं. जमीनदारी पद्धतीचा व त्याबरोबरच त्या वर्गाचा अंतर्गत जोम, कार्यक्षमता संपूर्ण नष्ट झाल्याचें आपणास पदोपदीं आढळतें. डॉक्टर, वकील यांची पाटी लावून जमिनीच्या उत्पन्नावर कसाबसा गुजराणा करणारे छोटे जमीनदार, उत्पन्न लाखांचें व कर्ज दोन लाखाचें असे 'पोकळ वासा' असलेले जमिनदार या देशांतहि कांहीं थोडेथोडके नाहींत. तेव्हां अगदीं अल्पसंख्य जमीनदार व सावकार वगळले तर बाकीचे कल्ले-दार मिशा बाळगणारे लोक 'बडा घर पोकळ वासा' या न्यायानेंच स्वतःला जमनिदार म्हणविण्यांत भूषण मानतात. या जीर्ण व टाकाऊ भागाला जर त्यांच्या जमिनीची योग्य किंमत करून विशिष्ट दराचे व्याजानें सरकारी कर्जरोखे दिले तर शेतीच्या उत्पन्नातील अनिश्चिततेपासून सुटका झाल्यानें आणि बुडत्या शेतीपेक्षां वाढत्या उद्योगधंद्यांत मालकी मिळाल्याकारणानें त्यांना हायसें वाटेल व सरकारलाहि या कर्जरोख्याच्या रूपानें आलेलें भांड-वल औद्योगिक वाढीसाठीं वापरतां येईल. या दुहेरी फायद्याच्या दृष्टीनें जमीनदारांचे मालकी हक्क रीतसर किंमत देऊन विकत घेण्याची मवाळ दिसणारी सूचना जनतायोजना करीत आहे.*

---

*As a matter of fact, land-ownership has become a bad business.

( पुढील पानावर पहा )

## योजनेंतील विधायक सूचना

उत्पादनाबरोबरच संपत्तीच्या विभजनाचा प्रश्नहि सोडवावा लागतो या जाणिवेंतूनच मालकीहक्काचा विचार करणें भाग पडतें. जनता–योजनेमध्यें या मूलभूत प्रश्नाबाबत ज्या विधायक सूचना केल्या आहेत त्यांपाठीमागें असणाऱ्या विचाराची दिशा आतांपर्यंतच्या विवेचनावरून समजेल. ती दिशा अधिक महत्त्वाची आहे. त्या दृष्टीनें जनता योजनेनें ज्या विधायक सूचना केल्या आहेत त्या खालीलप्रमाणें :—

( १ ) औद्योगिक क्षेत्रांत खाणी, रेल्वे, वीज इ० मोठमोठे व महत्त्वाचे कारखाने यांवर मालकीहक्क सरकारचा असला पाहिजे.

( २ ) त्याचप्रमाणें बँका व इतर पैशाच्या देवघेव करणाऱ्या संस्था, आयात व निर्यात व्यापार व परदेशाशीं होणारे पैशाचे व्यवहार यांवरहि सरकारचा ताबा असला पाहिजे.

( ३ ) औद्योगिक क्षेत्राप्रमाणेंच जमीन व तदंतर्गत नैसर्गिक संपत्ति यांवर सरकारचीच मालकी असणें आवश्यक आहे.

( ४ ) औद्योगिक क्षेत्रामध्यें ज्या उद्योगधंद्यांत खाजगी भांडवल ठेवलें जाईल त्या उद्योगधंद्यांवर नफ्याच्या बाबत सरकारचें कडक नियंत्रण राहील. सामान्यतः ३ टक्के नफा या भांडवलदारांना घेतां येईल. ज्या उद्योगधंद्यांत इतकाहि नफा सुटणार नाहीं त्या धंद्यांना सरकारकडून तितका नफा मिळण्याची हमी दिली जाईल.

( ५ ) शेतीबाबत सध्यांची जमीनदारी, कायमधारा पद्धति बदलणें अत्यंत आवश्यक आहे. पण जमीनदारांचे मालकीहक्क सरकारकडून खरीदले जातील व जमिनीची योग्य किंमत ठरवून त्या किंमतीचे ४० वर्षांत आपोआप

---

( मागील पानावरून चालू )

Although their parasitic existence is a dead weight on national economy, the landlords themselves are in a state of bankruptcy. Of course there are some exceptions. But the fortunate are very few. ......No harm will be done to them if they are given the opportunity of becoming industrialists instead of being parasitic owners of the land." ( Indian Labour and Postwar Reconstruction, Page 33-34 ).

विसर्जन पावणारे सरकारी कर्जरोखे त्यांना देण्यांत येतील. या कर्जरोख्यांवर ३ टक्के व्याज देण्यांत येईल.

( ६ ) शेतीबाबत दुसरा महत्त्वाचा प्रश्न कर्जाचा. या कर्जाबाबत पूर्वीच्या म्हणजे कर्ज घेतल्यावेळच्या मालाच्या किंमती आणि आजच्या किंमती यांचा विचार करून मुद्दल त्या फरकाच्या प्रमाणांत कमी करणें आवश्यक आहे ( scaling down ). याप्रमाणें तें कमी केल्यानंतर जमीनदाराप्रमाणेंच सावकारांनाहि तीन टक्के व्याजाचे कर्जरोखे दिले जातील. (Peoples' Plan, paragraphs 10, 11, 16, 17, 18. )

सरकारवरील मालकी ?

या सूचनांवरून उत्पादनाच्या साधनांवर प्रामुख्यानें सरकारची मालकी व जेथें खाजगी मालकी ठेवली जाईल तेथें सरकारी नियंत्रण अशा दुहेरी पद्धतीनें जनता-योजना संपत्तीच्या वाटयाबाबत होणारा अन्याय दूर करूं इच्छिते असें दिसून येईल. पण ज्या ठिकाणीं सरकारची मालकी स्थापन करावी अशी भाषा बोलली जाते त्याच ठिकाणीं सरकारवर मालकी कोणाची हा तितकाच महत्त्वाचा प्रश्न उभा राहातो आणि त्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर न देता सरकारची मालकी असावी हें बोलणें निरर्थक आहे इतकेंच नव्हें तर घातकहि ठरण्याचा संभव आहे. ( " To talk of state control in the absence of control over the state is meaningless. " Peoples' Plan, P. 6.) या प्रश्नाचें उत्तर देणें योजनेच्या ध्येयाच्या दृष्टीनें अगत्याचें व महत्त्वाचें आहे. या प्रश्नाला बगल देऊन चालणार नाहीं. राज्यसंस्था ( state ) व सरकार आभाळांतून जमिनीवर पडत नाहींत किंवा हवेंत वावरत नाहींत. विशिष्ट सामाजिक परिस्थितींत त्यांचें स्वरूप विशिष्ट प्रकारचेंच रहातें. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें तर राज्यसत्ता हें साध्य नसून साधन आहे आणि या राजकीय साधनाचें ध्येय सामाजिक स्वरूपाचेंच आहे. यासाठीं सामाजिक वा आर्थिक विकासाचा विचार चालू असतांना तो विकास घडवून आणण्याचें साधन म्हणजे सरकार किंवा राज्यसत्ता या विचाराला आपण येऊन पोंचतों. मग हें साधन ज्या प्रकारचा विकास आपणास इष्ट आहे त्याला अनुरूपच असावयास नको का ? हा प्रश्न वगळून आपणास कसें चालेल ?

आर्थिक योजनेचा विचार करतांना अर्थशास्त्रीय विचारांत ही राजकीय भानगड कशाला असा कांगावा करणें शक्य नाहीं असें वरील विचारावरून दिसून येईल. ज्या दोन योजनांचा आपण या ठिकाणीं विचार करीत आहोंत त्यांनींहि आपल्या ध्येयसिद्धीसाठीं कोणत्या प्रकारचें सरकार हवें याचा विचार मांडलाच आहे. मुंबई योजनेला आपला हेतु साध्य करण्यासाठीं राष्ट्रीय सरकार हवें आहे आणि जनता-योजनेला जनतेच्या प्रभावी नियंत्रणाखालीं असणारें सरकार म्हणजेच जनतेचें सरकार हवें आहे. दोहोंत फरक काय ? राष्ट्रीय सरकार म्हणजेच जनतेचें सरकार नव्हे काय ? असे प्रश्न कोणी विचारतील त्यांना स्पष्ट नकारात्मक उत्तर देणें भाग पडतें. राष्ट्रीय सरकारच्या बुडाशीं असलेली 'राष्ट्र' ही कल्पना दिशाभूल करणारी आहे असें गेल्या पंचवीस वर्षांच्या इतिहासानें सिद्ध केलें आहे. त्या इतिहासानें असेंहि सिद्ध केलें आहे कीं ज्याला राष्ट्र म्हणून मानण्याचा संप्रदाय आहे त्या एकाच राष्ट्रांत दोन राष्ट्रें नादत आहेत. तीं दोन राष्ट्रें शेजारीं शेजारीं नांदत असलीं, एकमेकांत मिसळलीं असलीं, त्या दोन राष्ट्रांचा 'पितृभू, मातृभू नि पुण्यभू' या गोंडस शब्दांनीं एकत्र मिलाफ करण्याचा व त्यांत हितविरोध नाहीं असें दाखविण्याचा प्रयत्न होत असला तरी त्या दोहोंमध्यें आत्यंतिक विरोध आहे हें एक इतिहासानें सिद्ध केलेलें कटु पण सत्य आहे. या सत्याचा विसर पडून राष्ट्रीय सरकारची मोघम व भोंगळ भाषा बोलण्यांत धोका आहे हें देखील जर्मनी, इटली व जपान या देशांच्या इतिहासावरून सिद्ध झालेलें आहे. यासाठीं राष्ट्र या शब्दाची अधिक फोड व्हावयास पाहिजे. गंगाजमुना इ० पवित्र नद्या ज्यांत वहातात, हिमालय, विंध्य, सह्याद्रि असे ज्यांत पवित्र पर्वत आहेत, अरबी, दाक्षिण्य महासागर असे पवित्र समुद्र ज्याच्या किनाऱ्याला आहेत, काशी, प्रयाग, द्वारकापुरी आग्रा, मथुरा अशीं ज्यांमध्यें तीर्थक्षेत्रें आहेत तें आमचें राष्ट्र, हें राष्ट्राचें वर्णन साहित्यांत शोभून दिसलें तरी राज्यशास्त्र व अर्थशास्त्र यांमध्यें त्याचा काडीचाहि उपयोग नाहीं. त्या शास्त्रांच्या दृष्टीनें राष्ट्र म्हणजे राष्ट्रांतील ४० कोटि लोक हाच अर्थ अधिक महत्त्वाचा आहे. आणि त्या अर्थाचा विचार करून या ४० कोटी लोकांचे स्थूल मानानें मूठभर वरिष्ठ वर्ग व बहुसंख्य श्रमजीवि जनता असे दोन तुकडे आज पडलेले आहेत असें शास्त्रीय सत्य

तीं शास्त्रें कंठरवानें सांगत आहेत. तेव्हां राष्ट्रीय सरकार म्हणजे कोणत्या राष्ट्राचें सरकार असा प्रश्न जनहिताच्या कोणत्याहि योजनेंत ताबडतोब निर्माण होतो. त्याचें प्रामाणिकपणानें उत्तर द्यावयाचें असेल तर जनतेचें सरकार असेंच उत्तर निःसंदिग्धपणें द्यावयास हवें. आणि नुसतें जनतेचें सरकार असें म्हणूनहि स्वस्थ बसतां येणार नाहीं. जनतेचें सरकार या शब्दांतील खरा अर्थ जनतेच्या प्रभावी नियंत्रणाखालीं असणारें सरकार असा आहे. अशा प्रकारचें प्रभावी व परिणामकारक नियंत्रण जनतेला घालतां यावें यासाठीं ज्या प्रकारच्या राज्यघटनेंतून या सरकाराचा जन्म होतो त्या राज्यघटनेंतच जनतेला हें नियंत्रण ठेवणें शक्य होईल अशा मूलभूत तत्त्वांचा अंतर्भाव होणें आवश्यक ठरतें. हीं मूलभूत तत्त्वें कोणतीं याचाहि विचार जनता–योजनेनें केला असून त्या तत्त्वांची स्थूलमानानें रूपरेषाहि योजनेंत मांडली आहे आणि या अठरा मूलभूत तत्त्वांचा ज्या राज्यघटनेंत अंतर्भाव झाला असेल ती राज्यघटनाच जनता–योजना अमलांत आणण्यास अनुकूल असें जनता–सरकार निर्माण करील असा जनता–योजनेचा दावा आहे ( Peoples' Plan, P. 6 )

## भांडवलाचें कोडेंहि सुटलें.

उत्पादनाच्या प्रमुख साधनांवर सरकारची मालकी, खाजगी मालकीवर सरकारचें नियंत्रण आणि सरकारवर जनतेचें प्रभावी नियंत्रण या तीन मार्गदर्शक सूत्रांनुसार जनता–योजनेचा पसारा मांडला गेला आहे. हीं तीन सूत्रें स्वीकारण्यांतील हेतु संपत्तीच्या वाटपांतील अन्याय दूर करून लोकांच्या राहणीचें मान वाढविणें व औद्योगिक विकासाला योग्य बाजारपेठ निर्माण करणें हाच आहे. याशिवाय या त्रिसूत्रीच्या साहाय्यानें आणखी एक महत्त्वाचा प्रश्न आपोआप सुटणार आहे. तो प्रश्न म्हणजे भांडवलाचा.

जनता–योजनेमध्यें देशाच्या आर्थिक विकासाला लागणारें पंधरा हजार कोटींचें भांडवल कसें जमा केलें जाईल या कोड्याचा उलगडा होऊं शकतो यांत आश्चर्याचा कांहींच भाग नाहीं किंवा भांडवलदार अर्थव्यवस्थेला तें कोडें सुटूं शकत नाहीं यांतहि आश्चर्य मानण्याचें कांहींच कारण नाहीं. भांडवलशाहीला भांडवलाचें प्रश्नचिन्ह सोडवतां येत नाहीं याचें खरें कारण त्या अर्थव्यवस्थे-

तच पहावयास सांपडेल. त्या पद्धतीचे समर्थक या धंद्यांत भांडवल किफायतशीर रीतीनें गुंतवितां येत नाहीं (profitable investment) अशी जी तक्रार करतात त्या तक्रारींतच भांडवलाचें कोडें कां पडतें याचें कारण सांठविलेलें आहे. भांडवल किफायतशीर रीतीनें गुंतवितां येत नाहीं याचा अर्थ भांडवलाला नफ्याची मर्यादा आहे असा होतो. साहजिकच नफा हा ज्या अर्थव्यवस्थेंत संपत्ति निर्माण करण्याचा प्रधान हेतु किंवा एकमेव हेतु आहे त्या अर्थव्यवस्थेंत गेल्या सालपेक्षां पुढील वर्षीं अधिक नफा मिळण्याची अपेक्षा रहाणार, ही अपेक्षा ज्या ज्या उद्योगांच्या क्षेत्रांत पुरी होत नाहीं, तीं तीं क्षेत्रें भांडवलाला आपोआप बंद होत जातात असा किफायतशीर रीतीनें भांडवल गुंतविण्याचा खरा अर्थ निघतो. तो अर्थ ध्यानांत घेतल्यास नफ्याच्या हेतूनें चालविणाऱ्या कोणत्याहि अर्थव्यवस्थेस भांडवलाचा प्रश्न सुटणें शक्य नाहीं ही गोष्टहि लक्षांत येण्यास वेळ लागणार नाहीं. पण या तक्रारींतील खरी अडचण भांडवलाची नसून भांडवल गुंतविण्याची आहे. भांडवल गुंतविण्याला नफ्याची कृत्रिम मर्यादा घातल्याकारणानें ज्या ज्या प्रमाणांत बाजारपेठ आकुंचित होत जाईल त्या त्या प्रमाणांत नफ्याची मर्यादा वाढत जाते हें एक साधें समीकरण आहे. अर्थात् ज्या योजनेला ही नफ्याची मर्यादाच राहिली नाहीं त्या योजनेला भांडवल आपोआप मिळत जाईल यांत आश्चर्यकारक असें कांहींच नाहीं.

वास्तविक भांडवल म्हणजे वद्ट राष्ट्रीय संपत्तीपैकीं जनतेच्या गरजा भागून उरलेली बचत (surplus). स्थूल मानानें कोणत्याहि समाजांत तयार होणाऱ्या संपत्तीचे तीन वाटे पडतात. कच्च्या मालाची किंमत, कामगारांचें वेतन व उरलेली शिल्लक. मानवी श्रमशक्तीला उत्पादनाच्या साधनांनीं आपल्या गरजा भागून अधिक संपत्ति तयार करण्याची ताकद आणून दिलेली आहे. तशी ताकद मानवाच्या आर्थिक व्यवहारात आली नसती व ही शिल्लक तयार झाली नसती तर मानवसमाजाचा आर्थिक विकासच काय पण सामाजिक किंवा सांस्कृतिक विकासहि झाला नसता. ह्या शिलकेचें प्रमाण संपत्तीच्या प्रमाणावरच अवलंबून आहे; आणि संपत्तीचें प्रमाण वाढणें ही गोष्ट उत्पादन-साधनांच्या स्वरूपावरच अवलंबून आहे. ज्यावेळीं मनुष्य काठीच्या टोकानें जमीन खणत होता त्या वेळीं पुष्कळ श्रम करूनहि

फार थोडी बचत त्याला मिळत असे. काठीच्या ठिकाणीं लाकडी नांगर आल्यावर संपत्तीचें उत्पादन वाढलें व गरजा भागून शिल्लकही अधिक राहिली. लाकडी नांगराचें लोखंडी नांगर व अखेर ट्रॅक्टरमध्यें रूपांतर झाल्यावर हें प्रमाण त्यापेक्षांहि वाढलें हें सांगावयास नको. तेव्हां आपल्या गरजा भागतील येवढेंच जेमतेम उत्पन्न करणें हें विकासाचें लक्षण नव्हे. त्या गरजा भागून शिल्लक तयार करणें हाच सामाजिक विकासाचा खरा भौतिक पाया होय. कारण, अशा प्रकारच्या शिलकेंतून मानवी श्रम वांचविणारीं प्रभावी साधनें निर्माण होऊं शकतात आणि त्या साधनांच्या योगानें भौतिक व प्राथमिक गरजा कमींत कमी वेळात भागविणें शक्य होऊन मनुष्याला आपली सांस्कृतिक उन्नति करून घेण्यास अवसर मिळतो. कला, नीति, तत्त्वज्ञान, धर्म इ. सांस्कृतिक विकास या भौतिक पायावरच झाला आहे असें आपणास दिसेल.

आतांपर्यंतच्या इतिहासांत मानवी श्रमशक्तींतून तयार होणारी ही शिल्लक, हें भांडवल, खाजगी मालकीच्या जोरावर अल्पसंख्यांच्या हातांत राहिलें; आणि तें तसें थोड्यांच्या मालकीचें राहिलें याचें कारण उत्पादनाचीं साधनेंच इतकीं मागासलेलीं होतीं कीं त्यामुळें तयार होणारी शिल्लकहि फार थोडी असे. अर्थात् या लहान भांडवलाच्या जोरावर समाजांत सांस्कृतिक विकासाला आवश्यक अशी शारीरिक श्रमांतून सुटका फार थोडयांची होत असे यांत अस्वाभाविक असें कांहींच नाहीं. पण इतिहासांत भांडवलशाहीनें प्रथमच अशा प्रकारचीं उत्पादन साधनें तयार केलीं कीं त्या साधनांमुळें मानवाच्या गरजा वाढत्या प्रमाणावर भागवून वाढत्या प्रमाणावर हें भांडवल निर्माण होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. भांडवलशाहीच्या या औद्योगिक क्रांतीनें सामाजिक गरजा भागून-आणि त्या भरपूर प्रमाणांत भागून-विपुल बचत मानव समाजाला मिळवून दिली आहे. या शिल्लक संपत्तीच्या सामर्थ्यावर संपत्तीचें उत्पादन सतत वाढत राहण्याची व भौतिक गरजा भागण्यासाठीं लागणारे श्रम थोड्या वेळांत आटोपण्याची आणि सांस्कृतिक विकासाला आवश्यक अशा विश्रांतीची शक्यता प्रत्येक व्यक्तीला या उत्पादनसाधनांनीं मिळवून दिली आहे.*

*" The whole development of human society beyond the stage

( पुढील पानावर पहा )

पण ही शक्यता शक्य कोटींत येऊं शकत नाहीं याचें कारणहि उत्पादनसाधनावर खाजगी मालकी व त्या मालकीनें संरक्षित केलेला नफा हेंच दिलें पाहिजे. सामाजिक श्रमानें तयार झालेल्या संपत्तीमध्यें बहुसंख्यांना जीवनवेतन मिळून अल्पसंख्यांच्या हातांत ही शिल्लक नफ्याच्या स्वरूपांत मालकी हक्काच्या जोरावर जात असते. या भांडवलाचा फिरून विनियोग त्याच प्रकारची संपत्ति निर्माण करण्यांत केला जातो कीं जी संपत्ति त्यांच्या हातांत अधिक नफा आणूं शकेल. पण या नफ्याच्या वाढत्या प्रमाणाबरोबर बहुसंख्यांचें दारिद्र्यहि वाढत असल्याकारणानें अखेर त्या नफ्याच्या प्रमाणालाहि मर्यादा बसून भांडवलाचा विनियोग किफायतशीर रीतीनें होत नाहीं या सबबीवर भांडवल उत्पादनाच्या क्षेत्रांतून बाहेर पडतें; आणि अशा रीतीनें अल्पांची श्रीमंती बहुसंख्यांचें दारिद्र्य वाढविण्यास साक्षात् कारण होऊन बसते. याच कृत्रिम कारणांनीं हिंदुस्थानसारख्या देशांत मानवी गरजा अल्पांशानेंसुद्धां भागत नसतांना ‘ मालाचें अत्युत्पादन झालें ’ अशी ओरड नेहमीं होत आहे. यासाठीं आपल्या आर्थिक विकासाला लागणाऱ्या भांडवलाचा

---

( मागील पानावरून चालू )

of brute savagery begins from the day when the labour of the family created more products than were necessary for its maintenance, from the day when one portion of labour could be devoted to the production of no longer of the mere means of subsistance, but of means of production, A surplus of the product over and above the costs of maintenance of the labour and the formation and enlargement by means of this surplus of a social production and reserve fund, was and is the basis of all social, political and intellectual progress. In history upto the present, this fund has been the possession of the privileged class on which also devolved along with the possession, political supremacy and intellectual leadership. The coming social revolution will for the first time make this social production and reserve fund—that is, the total mass of raw materials, instruments of production and means of subsistance—a realy social fund, by taking it out of the hands of that privileged class and transferring it to the whole of society as its common property, "

—Anti-Düring by Fredrich Engels, Page 221,

पुरवठा आपोआप व्हावयाचा असेल तर या कृत्रिम मर्यादा नष्ट करणें आवश्यक ठरतें आणि जनता–योजनेनें त्या मर्यादा दूर केल्याकारणानें राष्ट्रीय संपत्तीमधील ही शिल्लक भांडवलाच्या रूपानें तिला वाढत्या प्रमाणावर एकसारखी मिळत जाईल व भांडवल कसें जमवावें हा प्रश्नच तिच्यापुढें रहाणार नाहीं असें मानण्यास कोणतीच अडचण दिसत नाहीं. ( Peoples' Plan, para 15 ).

## शेतीच्या वाढीवर भर कां ?

या सर्व विवेचनाचा इत्यर्थ इतकाच कीं हिंदी समाजाची आर्थिक घडी आहे अशीच टिकवून आपणास देशाचा विकास घडवून आणणारी आर्थिक योजना आंखणें अशक्य आहे; त्यासाठीं विद्यमान समाजांत कांहीं मूलग्राही व क्रांतिकारक फेरबदल करावयास पाहिजेत. ही भूमिका मान्य केल्यानंतर जनता–योजनेनें सुचविलेले बदल किती योग्य आहेत याचा पडताळा सहज येऊं शकेल. या योग्य फेरबदलांच्या भूमिकेवर जनता-योजना शेती, उद्योग-धंदे, सामाजिक संरक्षण, भांडवलाची तरतूद या गोष्टींबाबत काय करूं इच्छिते याचा आढावा आतां घेण्यास हरकत नाहीं.

असा आढावा घेण्यापूर्वीं निष्कारण माजलेल्या एका गैरसमजाचें प्रथम निराकरण करणें जरूर आहे. हा गैरसमज मुंबई-योजना व जनता-योजना यांच्या तुलनेवरून निर्माण झालेला दिसतो आणि ती तुलनाहि एकांगी व वरपांगी स्वरूपाची आहे असें म्हणणें भाग आहे. असें नेहमीं सांगण्यांत येतें कीं, मुंबईयोजनेचा भर औद्योगिक वाढीवर आहे व जनता-योजना शेतीच्या वाढीवर भर देते. वास्तविक प्रत्यक्ष या दोनहि योजनांनीं दिलेलें प्रमाण पाहिलें तर हा गैरसमज निर्माण होण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. मुंबई योजनेप्रमाणें शेतीची वाढ १३० टक्के व औद्योगिक वाढ ५०० टक्के होणार आहे तर जनता-योजनेप्रमाणें शेतीची वाढ ४०० टक्के व औद्योगिक वाढ ६०० टक्के होणार आहे. वरवरती विचार केला तरी दोनहि योजनांत औद्योगिक वाढच शेतीपेक्षां अधिक दिसते. असें असतां जनता-योजनेविषयीं हा समज कां निर्माण व्हावा ? याच्या बुडाशीं जनता-योजनेनें शेतीच्या वाढीवर जो भर दिला आहे तोच प्रामुख्यानें आहे.

जनता–योजनेंत शेतीच्या विकासाला प्राधान्य कां देण्यांत आलें याचा विचार करणें या ठिकाणीं क्रमप्राप्त ठरतें. वस्तुतः भर कशावर दिला आहे याचा नीट विचार व्हावयास हवा. या देशांत उद्योगधंद्यांची वाढ होऊं नये असें जनता-योजनेच्या प्रवर्तकांना वाटतें असें अनुमान त्यांनीं जो शेतीच्या विकासावर भर दिला आहे त्यावरून कोणासहि काढतां येणार नाहीं. पण देशाचें औद्योगीकरण कांहीं यक्षिणीच्या कांडीप्रमाणें एका क्षणांत किंवा एका दिवसांत होऊं शकत नाहीं. त्याकरितां वास्तव परिस्थितीचें निरीक्षण करणें अत्यंत जरूरीचें आहे. त्या निरीक्षणांतून एक ठळक गोष्ट सहजासहजीं लक्षांत येईल कीं या देशांतील शेंकडा ७० टक्के लोक शेतीवर जगतात. योजनेचें ध्येय जर जनतेच्या रहाणीचें मान वाढवावयाचें असेल तर या ७० टक्के लोकांचा त्यांत प्रामुख्यानें समावेश केला पाहिजे. या ७० टक्के लोकांना एकदम औद्योगीकरणांत सामावून घेण्याची गुरुकिल्ली खुद्द मुंबई योजनेच्या प्रवर्तकांजवळदेखील नाहीं. तेव्हां बहुसंख्य जनता ज्या धंद्यावर आज आपली उपजीविका करीत आहे त्याच धंद्याला आधुनिक पद्धतीचें स्वरूप देण्यापासून या देशाच्या आर्थिक विकासाचा श्रीगणेशा करणें हाच एक औद्योगीकरणाचा राजमार्ग ठरतो. या सत्तर टक्के लोकांच्या श्रमाची उत्पादकता वाढविली तरच या देशांत औद्योगीकरणाचा भरभक्कम पाया घालतां येईल.

वास्तविक जनता-योजनेचा भर शेतीच्या वाढीवर आहे; शेतीवर नाहीं. हिंदुस्थान हा शेतीप्रधान देश आहे याचा अर्थ बहुसंख्य लोक शेतीवर जगतात इतकाच होतो. पण ती शेती इतक्या मागासलेल्या दशेंत आहे कीं देशाच्या खऱ्या औद्योगीकरणाला तो एक प्रचंड अडथळा होऊन बसला आहे. औद्योगीकरणाला लागणारे दोन घटक शेतीनें अडवून धरले आहेत असें आपणांस दिसेल. एक तर आधुनिक यंत्रांच्या साहाय्यानें शेती झाल्यास जितकी श्रमशक्ति लागेल त्याच्या कितीतरी पट श्रमशक्ति खर्च करूनहि शेतीचें उत्पन्न त्या मानानें कमचि पडतें; व त्याकारणानें उद्योगांच्या वाढीस लागणाऱ्या श्रमशक्तीचा पुरवठा शेतीच्या धंद्यांत निष्कारण गुंतून राहिला आहे आणि दुसरें असें कीं जें कांहीं शेतीचें उत्पन्न येतें त्यांतील थोडा भाग ७० टक्के लोकांना मिळत असल्याकारणानें त्यांची क्रयशक्ति कमी होत

चालली आहे. श्रमशक्तीचा तुटवडा व बाजारपेठेचा अभाव या दोन गोष्टी शेती मागासलेली असल्याकारणानें औद्योगीकरणाच्या मार्गांत अडचणी निर्माण करीत आहेत. यासाठीं शेतीच्या विकासाशिवाय औद्योगिक वाढीस अनुकूल भूमिका तयार होणें शक्य नाहीं.

शेतीच्या विकासामुळें औद्योगीकरणाच्या मार्गांतील हे अडथळे तर दूर होतीलच. पण याखेरीज औद्योगीकरणाला लागणारें भांडवलहि शेतीच्या वाढीपासून मिळूं शकेल. आपण भांडवलाविषयीं विचार करतांना हें पाहिलें कीं भांडवल अखेरीस भोग्य संपत्ति जाऊन उरलेल्या शिलकेंतूनच तयार होतें. या शिलकेच्या आधारावरच कोणत्याहि समाजाला औद्योगिक वाढीस अवश्य अशीं उत्पादनाचीं साधनें ( यंत्रसामग्रीचें कारखाने ) निर्माण करतां येतात. हिंदुस्थानला हीं साधनें प्रारंभीं तरी परदेशांतून आणावीं लागतील. तीं दोन प्रकारानें. प्रत्यक्ष उत्पादक साधनांची आयात ( import of capital goods ) आणि दुसरें म्हणजे या देशांत त्या प्रकारचे कारखाने घालण्यास आवश्यक तज्ज्ञांचा पुरवठा. या आयात मालाच्या मोबदला हिंदुस्थानला शेतीचाच माल निर्यात करणें भाग आहे. देवाण-घेवाणीच्या तत्त्वावर जर ही आयात झाली नाहीं तर ती कर्जाच्या रूपानें होऊं शकेल आणि कर्जाच्या रूपानें येणारें परदेशाचें भांडवल आपल्याबरोबर राजकीय वर्चस्वहि आणीत असतें हें विसरून चालणार नाहीं. यासाठीं शेतीच्या विकासावरच आपणांस प्रारंभींच्या अवस्थेंत भर देऊन आवश्यक यंत्रसामग्रीचा पुरवठा आयात करतां येईल.

शेतीचा विकास आवश्यक कां ? या प्रश्नाचीं अशा दृष्टीनें योजनेंत तीन उत्तरें सांपडतात. एक शेतीचें उत्पन्न वाढल्यानें ७० टक्के जनतेला पोषक अन्न मिळूं शकेल. दुसरें औद्योगीकरणाला लागणारे घटक ( श्रमशक्ति व बाजारपेठ ) भरपूर प्रमाणांत मिळतील आणि तिसरें औद्योगीकरणाला आवश्यक भांडवलाचा पुरवठा या वाढींतून होऊं शकेल. या तीन कारणांनीं शेतीची वाढ हाच औद्योगीकरणाचा खरा पाया होय असें जनता-योजनेचें निश्चित मत आहे. शेतीची वाढ अशा रीतीनें आवश्यक ठरल्या-नंतर त्याकरितां प्रामुख्यानें दोन गोष्टी आवश्यक आहेत असें योजनेंत दाखविलें आहे. एक शेतीच्या उत्पन्नावरील जमीनदार, सावकार यांचा

भार कमी करणें आणि दुसरें शेती आधुनिक पद्धतीनें करणें. यांपैकीं पहिली सुधारणा करतांना जमीनदारांचे हक्क विकत घेण्याची सूचना योजनेनें केलेली आहे. या हक्काचे जमीनदारी हक्क, देवस्थानच्या जमिनी, रयतवारी पद्धतींतील जमीनमालकी आणि जमिनीच्या अंतर्गत नैसर्गिक संपत्तीवरील हक्क असे चार विभाग पाडून त्या सर्वांसाठीं १७३५ कोटींचे कर्जरोखे द्यावे लागतील असा अंदाज बांधलेला आहे.

जमीनदारी पद्धतीनंतर सावकारीचा प्रश्न येतो. सेंट्रल बँकिंग इन्क्वायरी कमिटीनें १९२९ सालीं केलेल्या चौकशीप्रमाणें हें कर्ज ९०० कोटी रुपये इतकें होतें. पण १९३७ सालीं रिझर्व्ह बँकेच्या शेतकी खात्यानें केलेल्या चौकशीवरून त्याची मर्यादा १८०० कोटि रुपयांपर्यंत जाते. चालू युद्धामुळें धान्याचे भाव कडाडले असले तरी त्याचा खरा फायदा शेतकऱ्याला मिळालेला नाहीं याचें विवेचन मागील प्रकरणीं केलेंच आहे. उलटपक्षीं हें कर्ज पिढ्यानपिढ्या चालत आलेलें दिसतें. यासाठीं सध्यांच्या किंमतीच्या परिमाणात हें कर्ज उतरविलें पाहिजे. मद्रास व पंजाब प्रांतांत केलेल्या प्रयत्नांवरून हें १८०० कोटींचें कर्ज २५ टक्यांपर्यंत आणण्यास कांहींच हरकत नाहीं; म्हणजे तें २५० कोटी रुपयांपर्यंत जातें. इतकें तें उतरविल्यानंतर सरकारनें तें आपल्या अंगावर घेऊन त्याबदली ३ टक्के दराचे कर्जरोखे ४० वर्षें मुदतीचे द्यावेत अशी योजनेनें याविषयीं तरतूद केलेली आहे.

खंड व व्याज हे दोन वाटे कमी केल्याकारणानें शेतकऱ्याचें रहाणीचें मान वाढेल. त्याला शेतीविषयीं आपुलकी निर्माण होईल. पण एवढ्यावरच कार्यभाग साधणें शक्य नाहीं. त्यासाठीं शेतीची मशागत नवीन पद्धतीनें होणें आवश्यक आहे; तरच शेतीचें उत्पन्न वाढेल. शेतीची ही वाढ दोन प्रकारांनीं होणें शक्य आहे. एक लागवडीस असलेल्या जमिनीचें उत्पन्न वाढविणें आणि दुसरें लागवडीस योग्य पण पडीत जमीन लागवडीस आणणें. अशा प्रकारची पडीत जमीन (cultivable waste) १४ कोट एकर ब्रिटिश हिंदुस्थानांत आहे. सामुदायिक शेतीच्या प्रयोगाचा आधार घेऊन यापैकीं १० कोटी एकर जमीन लागवडींत येणें शक्य आहे असें योजनाकार म्हणतात. आज २१ कोटी एकर जमीन लागवडींत आहे, त्याची या पद्धतीनें ५० टक्के वाढ करणें शक्य आहे असा याचा अर्थ.

लागवडींत असलेल्या जमिनीचें पीकहि सुधारलेल्या साधनांनीं व इतर उपायांनीं वाढविणें सहज शक्य आहे. या हेतूच्या सिद्धीसाठीं कालव्यांची वाढ आहे यापेक्षां फार मोठ्या प्रमाणांत व्हावयास हवी. त्याचप्रमाणें ट्रॅक्टर, फर्टिलायझर इ. आधुनिक यंत्रसामग्री, आधुनिक खतें यांचा वापर करून शेतीचें उत्पन्न कसें वाढूं शकतें याचें प्रात्यक्षिक ज्ञान देण्यासाठीं सरकारी शेती मोठ्या प्रमाणावर होणें आवश्यक आहे. शेतकऱ्यांच्या अज्ञानामुळें कितीतरी जमीन योग्य बांध न घातल्याकारणानें वाहून जाते; तिचा बंदोबस्त करण्यासाठीं निरनिराळ्या उपाययोजना ही जमीन टिकविण्यासाठीं होणें जरूर आहे. शेतकऱ्यांना औत, कुळव, नांगर इ. साधनें, बीं बियाणें, खतें, यांचा पुरवठा सरकारनें केल्यास शेतीची सुधारणा मोठ्या प्रमाणावर होऊं शकेल. या सर्व गोष्टींचा विचार करून या सुधारणा करण्यासाठीं दहा वर्षांत २९५० कोटीचें भांडवल लागेल असा योजनाकारांनीं अंदाज दिलेला आहे.

पण शेतीचें उत्पन्न फार मोठ्या प्रमाणावर व्हावयाचें असेल तर शेती यंत्राच्या साहाय्यानें (mechanisation of agriculturs) व्हावयास हवी. शेतीचें यंत्रीकरण होण्याच्या मार्गांत खरा अडथळा शेतीच्या तुकडेवारीचा आहे. त्याला सामुदायिक शेती हाच एक उपाय दिसतो. पण त्या मार्गांत शेतकऱ्याचें अज्ञान, आपला मालकी हक्क हिरावून घेतला जाईल कीं काय ही भीति अशा अनेक अडचणी आहेत. तथापि याशिवाय दुसरा कोणताहि मार्ग नसल्याकारणानें या अडचणीला तोंड देणें भागच आहे. प्रारंभीं नवीन जमीन लागवडीस आणतांना सामुदायिक शेतीचा प्रयोग करणें शक्य होईल; त्याचप्रमाणें सरकारी शेतीहि या नवीन यंत्राच्या साहाय्यानें करणें क्रमप्राप्तच आहे. या दोन प्रयोगांनीं शेतकऱ्याचें अज्ञान नाहींसें करून व सामुदायिक शेतीचे फायदे अनुभवानें त्याला पटवून देऊन त्याला राजी-खुषीनें या प्रयोगाला सिद्ध करणें शक्य आहे.

## भोग्य संपत्तीच्या कारखान्यांची वाढ

जनता–योजनेचें ध्येय रहाणीचें मान वाढविण्याचें आहे. तें ध्येयच एकंदर विकासाचा क्रम कसा आंखावा याची दिशा निश्चित करीत आहे.

त्या दिशेनें शेतीच्या विकासावर प्रथम भर; नंतर साखर, कापड, तेल, कातडें इ० भोग्य वस्तूंचें उत्पादन व अखेर यंत्रांच्या पैदाशीला अनुकूल उद्योगांची वाढ असा क्रम लागतो. हा क्रम लागतांना एक समजुतीचा घोटाळा होण्याचा संभव आहे व त्याचा निरास प्रथम झाला पाहिजे. ज्या वेळीं शेतीचा विकास प्रथम, नंतर कापड आदिकरून धंद्यांची वाढ व मग उत्पादक मालाची वाढ असा क्रम जनता-योजना लावते त्या वेळीं शेतीचा विकास होत असतांना, बाकीचे कारखाने बंद ठेवावयाचे किंवा त्याकडे दुर्लक्ष करावयाचें असा त्याचा अर्थ नाहीं. दहा वर्षांच्या योजनेंत प्रथम तीन वर्षें केवळ शेतीच, नंतरचीं तीनचार वर्षें भोग्य वस्तूंचे कारखाने व शेवटच्या भागांत उत्पादक वस्तू असें योजनेचें चित्र कोणी उभारील तर तें चूक ठरेल. विकासाचा हा क्रम लावण्यामध्यें आर्थिक क्षेत्रांत शेती व दोन्ही प्रकारचे धंदे एकदम चालू राहिले तरी कोणत्या भागावर किती भर द्यावयाचा हा तारतम्याचा विचार प्रामुख्यानें योजनेनें मनाशीं बाळगला आहे आणि हिंदी जनतेच्या हिताच्या दृष्टीनें जी योजना पुढें येईल तिला हाच तारतम्याचा प्रकार स्वीकारावा लागेल. कारण, या योजनेचें ध्येय परिणामकारक गरज भागविण्याचें नसून मानवी गरज आर्थिक जीवनांत परिणामकारक बनविण्याचें आहे.

शेतीबाबत जे मूलग्राही फरक सुचविले आहेत त्यांमुळें सत्तर टक्के जनतेच्या हातांत जवळजवळ ३०० कोटि रुपये पडूं शकतील. त्यांपैकीं कांहीं भाग नवीन उद्योगांची वाढ करण्यासाठीं सरकारनें जमा केला तरी भोग्य वस्तूंच्या मालाला या वाढत्या रहाणीनें मागणी वाढणें स्वाभाविक दिसतें. त्या प्रमाणांत देशांतील अंतर्गत बाजारपेठ वाढूं शकेल व भोग्य वस्तूंच्या मालाला मागणी वाढणें अपरिहार्य ठरतें. योजनाकारांच्या मतानें शेतीच्या वाढीनें ती मागणी इतकी वाढेल कीं प्रारंभीं तरी कांहीं प्रमाणांत या मालाची देखील आयात करण्याचा भावी योजनासमितीवर प्रसंग येईल. पण ती आपत्ति नसून इष्टापत्तिच आहे हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. या भोग्य संपत्तीच्या वाढीवर भर देतांना उत्पादक वस्तूंचें महत्त्व कमी केलें जात नाहीं; पण अर्धनग्न व अर्धपोटी जनता ठेवून मोटारी, विमानें यांची वाढ करणें हें दृश्य करुणाजनक आहे हें विसरून चालणार नाहीं. अर्थात् भोग्य

वस्तूंचे कारखाने किती प्रमाणांत वाढवावे, कोणते वाढवावे याचे अचूक अंदाज देणें शक्य नाहीं. यासाठीं योजनेंत त्याचे ठोकळ अंदाज दिले आहेत त्यावरून विकासाची दिशा आपणांस समजून येईल. अन्नाच्या पाठोपाठ वस्त्राची गरज येते. त्याचबरोबर साखर, साबण, औषधपाणी, तेल, फर्निचर, पादत्राणें, दिवाबत्ती, कागद, तंबाखू याहि वस्तू नित्याच्या गरजेंत समाविष्ट होतात. या गरजा आज सामान्य जनतेला भागविणें शक्य नाहीं हें, कापड दरमाणशीं १५ वार, साखर पाव अंसापेक्षांहि कमी आणि पादत्राणें तर दरमाणशीं ·०९ जोडी, या सरासरीवरून पटण्यासारखें आहे; आणि याच भयानक दारिद्र्यावरून या पदार्थांची निपज किती मोठ्या प्रमाणावर व किती तांतडीनें होणें आवश्यक आहे याचीहि साक्ष पटूं शकेल. योजकांनीं यां प्रकारच्या कारखान्यांसाठीं ३००० कोटींचा अंदाज व्यक्त केला आहे.

उत्पादक वस्तूंची निपज

भोग्य वस्तूंप्रमाणेंच उत्पादक वस्तूंची (production goods) निपज वाढणें आवश्यक आहे या गोष्टीकडेहि योजना दुर्लक्ष करीत नाहीं. पण उत्पादक वस्तू अनेक प्रकारच्या आहेत; त्यांमध्यें कोणत्या प्रकारचे कारखाने आपणास हवेत याचा निर्णय एकंदर योजनेच्या गरजेवरून ठरवावा लागेल. उदाहरणार्थ, शेतीच्या विकासासाठीं ट्रॅक्टर, फर्टिलायझर इ. विविध प्रकारची यंत्रसामग्री लागेल, विजेचा पुरवठा करावा लागेल. त्या प्रकारच्या मालाची निपज होण्यास अशा प्रकारचे कारखाने प्रथम न घालतां मोटारी, विमानें, बंदुका, तोफा इ. वस्तूंची निपज करणारे कारखाने प्रथम घातले तर योजनेला तें घातकच ठरण्याचा संभव आहे. या दृष्टीनें उदाहरणादाखल वीज, खाणी, लोखंड व पोलाद, रासायनिक द्रव्यें इ. वस्तूंचा नामनिर्देश करून योजनेंत ठोकळ मानानें यासाठीं २६०० कोटि भांडवल गुंतवावें लागेल असा अंदाज दिला आहे.

ग्रामोद्योगाचें भवितव्य

आर्थिक विकासाच्या योजनेंत ग्रामोद्योग, हस्तव्यवसाय यांचें भवितव्य काय असा आपल्या आर्थिक जीवनांत प्रश्न उभा राहतो. कारण, या देशांत

त्यावर उपजीविका करणाऱ्या लोकांचा भरणा मोठा आहे. वस्तुतः ग्रामोद्योग हा देखील मानवी श्रमाचा अपव्ययच होय. देशांतील जनतेचा खरा आर्थिक विकास ज्याप्रमाणें राहणीचें मान वाढविण्यांत आहे त्याचप्रमाणें भौतिक गरजा भागविण्यासाठीं करावे लागणारे श्रम वाचविण्यांत आहे. उत्पादनाचीं साधनें ज्या प्रमाणांत प्रगत होतील त्या प्रमाणांत हे श्रम वाचतील आणि मनुष्याला आपला बौद्धिक विकास करून घेण्यास अवसर व विश्रांति मिळूं शकेल. या दृष्टीनें ग्रामोद्योगांतील उत्पादन साधनें मागासलेलीं असल्याकारणानें हिंदी श्रमशक्ती अनाठायीं खर्च होत आहे असेंच म्हणावें लागतें. आर्थिक योजनेच्या धोरणानुसार हीं उत्पादनाचीं साधनें ज्या ज्या प्रमाणांत प्रभावी ठरतील त्या त्या मानानें ग्रामोद्योगाचें क्षेत्र कमी कमी होत जाईल यांत शंका नाहीं आणि याच दृष्टीनें जनता-योजनेंत त्या व्यवसायावर फारसा भर दिला नाहीं. ग्रामोद्योगाचें समर्थन करणाऱ्यांच्या बाजूनें असा नेहमीं युक्तिवाद लढविला जातो कीं, इंग्लंड, फ्रान्स इत्यादि पुढारलेल्या देशांत यंत्रयुग आल्यापासून बेकारी, मंदी व महायुद्धें या आपत्ति जगावर ओढवल्या असें आपण पहातों. आणि या आपत्ति टाळावयाच्या असतलि तर ग्रामोद्योगाचीच कास आपणास धरली पाहिजे. हा युक्तिवाद जरा विचार केला तर भ्रामक आहे असें दिसेल. जगावर बेकारी, मंदी किंवा महायुद्धें या आपत्ति यंत्रयुगामुळें ओढवल्या नसून त्या यंत्रावरलि मालकी हक्क व संपत्ति निर्माण करण्याची प्रेरक शक्ति जो नफा त्यामुळें ओढवल्या आहेत हें अर्थशास्त्राच्या दृष्टीनें सिद्ध करतां येण्यासारखें आहे. हा दोष यंत्रांचा नसून यंत्रांचा उपयोग समाजांत ज्या पद्धतीनें केला जातो त्या पद्धतीकडे आहे; आणि ती पद्धति कायम ठेवून ग्रामोद्योगाचा जर आश्रय केला तर फार तर आजच्या सुधारलेल्या जगांतलि आपत्ति आपणांस दिसणार नाहींत. पण सबंध समाज मध्ययुगीन अज्ञानाच्या दाट काळोखांत परत नेण्याचा प्रयत्न करणें ही कांहीं स्पृहणीय अवस्था नाहीं किंवा त्यामुळें समाजाचा विकास झाला असेंहि म्हणतां येणार नाहीं. वास्तविक यंत्रयुगाचा अवतार झाल्यानेंच आज प्रत्येक व्यक्तीचा विकास साधतां येईल अशी भाषा आपण बोलूं शकतों; आणि भांडवलशाहीनें भावी पिढीला कांहीं देणगी दिली असेल तर ती हीच होय. भांडवलदार अर्थव्यवस्थेंत मूलभूत

दोष आहेत म्हणून भांडवलशाहीनें जें जें कांहीं चांगलें कार्य केलें असेल त्याचाहि तिरस्कार करणें हें कांहीं विवेकाचें लक्षण नव्हे; ती एक आंधळी प्रतिक्रिया आहे आणि साप म्हणून भुई धोंपटण्याच्या प्रतिक्रियेपासून फायदा होण्यापेक्षां नुकसान होण्याचाच संभव अधिक असतो.

ग्रामोद्योगाच्या बाजूनें आणखी एक युक्तिवाद लढविला जातो. त्यांतील समर्थनाचें सार थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, सुधारलेल्या देशांतहि मोठमोठ्या कारखान्यांप्रमाणेंच लहान लहान कारखानेहि आपणांस आढळतात. तेव्हां यंत्रयुगानें ग्रामोद्योगाची गरज नाहींशी होते असें दिसत नाहीं. उलटपक्षीं त्या देशांतहि मोठमोठे कारखाने निर्माण करून उत्पादनाचें केंद्रीकरण ( centralisation ) करण्यापेक्षां लहान प्रमाणावर कारखाने काढून ' विकेंद्रीकरण ' ( decentralisation. ) करण्याकडेच कल होत चालला आहे. आपल्या देशांत ग्रामोद्योग ही त्या विकेंद्रीकरणाला अनुकूल अशीच संस्था असल्याकारणानें ती टिकवून धरण्यानें आपला फायदाच होईल. या युक्तिवादामध्येंच ग्रामोद्योगाचें महत्त्व कमी झालेलें आहे. ' केंद्रीकरण ' व ' विकेंद्रीकरण ' या उत्पादनाच्या पद्धति परस्परविरोधी नसून एकमेकांना पूरकच आहेत हें प्रथम लक्षांत घेतलें पाहिजे. या देशांत विकेंद्रीकरणाची बाजू उचलून धरणाऱ्यांना हें माहीत आहे कीं रेल्वे, खाणी, बँका इ० महत्त्वाच्या उद्योगांचें विकेंद्रीकरण करण्यांत फायदा नाहीं व तसें विकेंद्रीकरण करणें शक्य नाहीं. पण दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं केंद्रीकरण अथवा विकेंद्रीकरण या दोनहि पद्धति घेतल्या तरी त्यांमध्यें उत्पादनाचीं साधनें ' यंत्रयुगांतीलच ' असतात. या देशांतील ग्रामोद्योगाचें स्वरूप तसें नाहीं. ज्या साधनांच्या साहाय्यानें आज देशांत ग्रामोद्योग चालतात तीं साधनें मागासलेलीं आहेत, त्यांवर वाजवीपेक्षां फाजील श्रम खर्च करावे लागतात आणि इतके श्रम करूनहि संपत्ति तोकडी निर्माण होत असल्याकारणानें श्रमजीवि जनतेचें दारिद्य नष्ट होऊं शकत नाहीं. ग्रामोद्योगावर खरा आक्षेप अशा स्वरूपाचा आहे. फोर्डचा मोटारचा एकच प्रचंड कारखाना असावा का त्याच साधनांचा वापर करणारे पण त्यापेक्षां लहान असे अनेक कारखाने असावेत हा वाद निराळा आणि चरखा, घाणा, हातमाग, पटाशी यांच साधनांचा वापर करणारे ग्रामोद्योग असावेत हा वाद निराळा. त्या

दोघांची एकत्र गल्लत करून ग्रामोद्योगाचें समर्थन करणें चुकीचें आहे. आणि जनतायोजनेचा जो आक्षेप ग्रामोद्योगावर आहे तो त्यांतील मागासलेल्या साधनांवर आहे.

## वहातूक, आरोग्य, शिक्षण व घरें

शेती व उद्योगधंदे या दोन आर्थिक क्षेत्रांबाबत जनता–योजनेची भूमिका पाहिल्यानंतर महत्त्वाचा तिसरा प्रश्न 'सामाजिक संरक्षण ( social security ) या सदरांत ज्या गोष्टी येतात त्या गोष्टींचा. आरोग्य, शिक्षण व घरें अशा त्या प्रामुख्यानें तीन गोष्टी होत. त्याचबरोबर संपत्तीचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊं लागलें व जनतेची रहाणी सुधारल्याकारणानें मागणी वाढूं लागली कीं मालाची वहातूकहि मोठ्या प्रमाणावर होत जाणें स्वाभाविक आहे आणि त्या दृष्टीनें या तीन गोष्टींबरोबरच वहातुकीच्या साधनांतहि वाढ होणें क्रमप्राप्त ठरतें.

यांपैकीं आरोग्य, शिक्षण व घरें या तीन आवश्यक गरजांविषयीं जनता-योजनेचें वैशिष्ट्य असें कीं या तीनहि प्रकारच्या गरजा जनतेला त्याबद्दल कोणत्याहि प्रकारचा करभार न द्यावा लागतां भावी जनता सरकार पुरवूं इच्छितें. ( We wish to emphasize that, under our plan, all the services in respect of health, education and housing are to be rendered free to the population concerned, " Peoples' Plan, P. 30 ) या ठिकाणीं दोन महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होतात. एक या गोष्टींची मोफत तरतूद कां करावी ? आणि जनता-योजनेला तें कसें शक्य आहे ? यापैकीं कां करावी याचें उत्तर सरळ व स्पष्ट आहे. जो जो संपत्ति उत्पादनाच्या कार्यांत भाग घेतो त्या त्या इसमाचा या गोष्टीवर हक्क आहे. पण हक्काची भाषा अर्थशास्त्रांत बसत नाहीं म्हणून क्षणभर ती बाजूला ठेवली तरी आर्थिक विकासाच्या दृष्टीनें देखील या सुखसोयी प्रत्येक इसमास मिळणें आवश्यक आहे हें सिद्ध करतां येईल. उत्पादनाचें यंत्र चालू रहाण्यासाठीं श्रमशक्तीचा सतत व वाढत्या प्रमाणावर पुरवठा होणें आवश्यक आहे. पण हा पुरवठा ज्या समाजांत औषधपाण्याच्या सोयीच्या अभावीं, व चंद्रमौळी, आरोग्याला हानिहारक अशा घरांत राहण्यामुळें, मृत्युसंख्येचें प्रमाण

वाढतें आहे त्या समाजांत कसा होऊं शकेल ? 'दररोज सोन्याचें अंडें घालणारी हंसी एकदम मारूं नका ' या इंग्रजी म्हणीप्रमाणें भांडवलदारांनाहि या श्रमशक्तीची काळजी घ्यावी लागते. आज दहा तास काम करणारा कामगार उद्यां पुनः दहा तास काम करण्यास समर्थ होऊं शकेल इतकें वेतन त्यालाहि द्यावें लागतें, पण त्या व्यवस्थेंतलि अंतर्गत विरोधामुळें सर्व माणसें निरोगी व निकोप प्रकृतीचीं राखण्याइतपत या तीन गोष्टींची तरतूद त्या व्यवस्थेंत होऊं शकत नाहीं. ही झाली सुधारलेल्या देशांची स्थिति. हिंदुस्थानांत या औद्योगिक क्रांतीचा पूर्ण अनुभव नसल्याकारणानें या देशांत लोकसंख्या झपाट्यानें वाढत गेली तरी औद्योगिक वाढीला आवश्यक अशा श्रमशक्तीचा अभावच आहे असा चमत्कारिक विरोधाभास आपण पहातों. माणसें भरपूर आहेत म्हणजे आर्थिक विकासाला आवश्यक अशी श्रमशक्ति आहे असा त्याचा अर्थ नाहीं. त्यासाठीं त्या सुप्त श्रमशक्तीवर योग्य संस्कार करून तिची विशिष्ट प्रकारानें घडण व्हावी लागते. आपल्या देशांतील या सुप्त श्रमशक्तीचा उपयोग करावयाचा असल्यास त्याला दोन प्रकारच्या संस्कारांची गरज आहे, तरच त्याची कार्यक्षमता वाढेल. एक शारीरिक संस्कार आणि त्या दृष्टीनें आरोग्य व आरोग्यकारक घरें या दोन गोष्टींचें महत्त्व आहे. पण केवळ शरीरानें धडधाकट माणसें असलीं कीं कार्य संपत नाहीं. सुधारलेल्या उत्पादनपद्धतींत श्रमाची उत्पादक शक्ति वाढण्यासाठीं कौशल्याची जरूरी आहे आणि ज्या यंत्रयुगाचा आपणास आश्रय करावयाचा आहे त्या युगांत हें कौशल्य अंगीं बाणण्यासाठीं प्राथमिक शिक्षणाचीहि तितकीच आवश्यकता आहे.

या तीन गोष्टींची सोय कां केली पाहिजे याचें उत्तर दिल्यानंतर योजनेंत ह्या सोयी मोफत कशा होऊं शकतील या प्रश्नाला उत्तर दिलें पाहिजे. या गोष्टींची मोफत सोय करण्यासाठीं एकंदर राष्ट्रीय संपत्तीपैकीं बराच भाग योजनेला या कामाकरितां खर्चीं घालतां येईल काय हाच प्रश्न खरा महत्त्वाचा आहे आणि राष्ट्रीय संपत्तीचे जनता–योजनेच्या मूलभूत तत्त्वानुसार दोनच वाटे पडत असल्याकारणानें या गोष्टींची सोय करतां येईल असें होकारात्मक उत्तर देण्यास कोणतीच अडचण दिसत नाहीं. अन्न, वस्त्राच्या गरजा भागवून शिल्लक संपत्ति रहाणें हाच खरा विकास होय हें आपण मागें

पाहिलें. उत्पादनाचीं साधनें एकसारखीं सुधारत गेलीं तर ही शिल्लक वाढत जाणेंहि क्रमप्राप्तच ठरतें; आणि या शिलकीवर अखिल जनतेचा सरकार-मार्फत ताबा असल्याकारणानें त्यांतील या गोष्टीसाठीं जो भाग आवश्यक असेल त्याचा विनियोग होण्यासाठीं योजनेंत कोणतीच अडचण निर्माण होऊं शकत नाहीं. शिलकीवर ज्या वेळीं खाजगी ताबा येतो त्या वेळींच हा प्रश्न सुटणें शक्य होत नाहीं. कारण नफा हीच शक्ति त्या ठिकाणीं नियंत्रक असल्याकारणानें व या गोष्टीवर भांडवल फायदेशीर रीत्या गुंतविणें शक्य नसल्याकारणानें समाजाला गरज असूनहि या गोष्टींची त्या ठिकाणीं हेळसांड होत असते. तेव्हां जवळजवळ पांच हजार कोटींचें भांडवल या पायीं खर्च करण्याची योजनेंतील घोषणा अवास्तव वा अशक्य कोटींतील आहे असें मानण्यास कांहींच कारण दिसत नाहीं.

वहातूक, शिक्षण, आरोग्य व घरें यांची वाढ करण्यांत आर्थिक योजनेला याखेरीज एक फायदा दिसतो. शेती यांत्रिक पद्धतीनें सामुदायिक स्वरूपाची ज्या प्रमाणांत होत जाईल त्या प्रमाणांत शेतीवर कमी माणसें लागून श्रम-शक्ति अन्य कामांत गुंतविणें शक्य होईल. औद्योगिक वाढीची जी दिशा दाखविली त्या दिशेनें उद्योगधंद्याची ( दोनहि प्रकारच्या ) एकदम वाढ होऊं शकत नाहीं. दरम्यान या मोकळ्या झालेल्या लोकसंख्येचें काय करा-वयाचें हा प्रश्न विशेषतः वहातुकीचीं साधनें व घरांचें बांधकाम त्या दोन गोष्टींनीं सुटणार आहे. रस्ते, कालवे, रेल्वे, नवीन घरें, जुन्यांची दुरुस्ती या सर्व प्रकारच्या उद्योगधंद्यांत ही श्रमशक्ति योजनेला गुंतविणें शक्य होईल. ६०० टक्के उद्योगधंद्यांची वाढ करून देखील सगळ्यांनाच त्या क्षेत्रांत काम मिळेल असें नाहीं. ज्यांना तेथें शिरकाव करतां येणार नाहीं त्यांची सोय या प्रकारच्या उद्योगांत सहज होऊं शकेल.

### योजनेची रूपरेषा

अशा रीतीनें रहाणीचें मान वाढविण्याच्या हेतूनें आंखलेल्या जनता योजनेचा थोडक्यांत सारांश पुढीलप्रमाणें देतां येईल:—

एकंदर योजना १० वर्षांची असून त्या अवधींत शेतीची वाढ ४०० टक्के व औद्योगिक वाढ ६०० टक्के होणार आहे. ही अपेक्षित वाढ

होण्यासाठीं एकंदर भांडवल १५ हजार कोटींचें लागेल असा योजनेचा अंदाज असून तें कोणकोणत्या उद्योगावर किती प्रमाणांत खर्च होणार याची कल्पना खालील कोष्टकावरून येईल :—

| | ( आंकडे कोटींचे ) |
|---|---|
| शेती ... ... ... | २९५० |
| उद्योगधंदे ... ... ... | ५६०० |
| वहातूक ... ... ... | १५०० |
| आरोग्य ... ... ... | ७६० |
| शिक्षण ... ... ... | १०४० |
| घरें ... ... ... | ३१५० |
| († पृष्ठ १६३ पहा.) एकूण | १५,०००† (P. 41) |

आणखी एक वैशिष्टय

शेवटचा व तितकाच महत्त्वाचा प्रश्न भांडवलाचा आहे. त्याचा विचार करण्यापूर्वी जनता योजनेंतील आणखी एक वैशिष्टय या ठिकाणीं दाखविलें पाहिजे. योजनेंत ज्याप्रमाणें संपत्तीच्या उत्पादनाचा व वांटणीचा विचार केला आहे त्याचप्रमाणें संपत्तीच्या विनिमयाचाहि (exchange) विचार आपणांस योजनेच्या चवथ्या प्रकरणांत केलेला आढळेल. वास्तविक जन-हिताच्या योजनेला याहि आर्थिक क्षेत्राचा विचार करावा लागतोच. त्या दृष्टीनें हें वैशिष्टय ठरत नसलें तरी मुंबई—योजनेच्या दृष्टीनें तें वैशिष्टय खास आहे.

प्रत्यक्ष संपत्तीच्या उत्पादनक्षेत्रांत नफेबाजीचा स्वैरसंचार जसा घातक ठरतो त्याचप्रमाणें या विनिमयाच्या क्षेत्रातील नफेबाजीहि तितकीच घातक ठरूं शकते हें महायुद्धाच्या चार वर्षांच्या अनुभवानें पुरेपूर सिद्ध झालें आहे. उत्पादनाइतकेंच सुधारलेल्या अर्थव्यवस्थेंत पदार्थांच्या विनिमयालाहि महत्त्व असतें; किंबहुना त्यांहून अधिक असतें हें विसरून चालणार नाहीं. कारण संपत्ति निर्माण करावी आणि तिचा साक्षात् उपभोग घ्यावा इतके साधे व सरळ अर्थव्यवहार आज राहिलेले नाहींत. प्रचंड व प्रभावी साधनें

(† पृष्ठ १६२ वरून)

हें पंधरा हजार कोटींचें भांडवल दहा वर्षांमध्यें प्रत्येक उद्योगांत प्रतिवर्षी कसें गुंतविलें जाईल याची कल्पना पुढील कोष्टक देऊं शकेल :—

( आंकडे कोटि रुपयांचे )

| वर्ष | शेती | उत्पादक वस्तूंचे कारखाने | भोग्य वस्तूंचे कारखाने | वहातुकीचीं साधनें | आरोग्य | शिक्षण | घरें | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २०० | १०० | — | — | — | — | — | ३०० |
| २ | ३५० | १०० | १०० | — | २० | ३० | — | ६०० |
| ३ | ४५० | १०० | १०० | — | २० | ३० | — | ७०० |
| ४ | ५०० | १०० | १५० | ५० | ३० | ३७ | — | ८६७ |
| ५ | ४५० | १५० | २५० | १०० | ४० | ९० | २७४ | १३५४ |
| ६ | ४५० | ३०० | ४०० | २०० | ५० | १०० | २८८ | १७८८ |
| ७ | २५० | ३५० | ४५० | ३०० | ८० | १५० | ४८० | २०६० |
| ८ | १०० | ४०० | ५०० | ३०० | १२० | १८० | ८४८ | २४४८ |
| ९ | १०० | ५०० | ५०० | ३०० | २०० | २०० | ७२६ | २५२६ |
| १० | १०० | ५०० | ५५० | २५० | २०० | २२३ | ५३४ | २३५७ |
| एकूण | २९५० | २६०० | ३००० | १५०० | ७६० | १०४० | ३१५० | १५,००० |

निर्माण झाल्याकारणानें व सूक्ष्म प्रमाणावर श्रमविभाग तयार झाल्या कारणानें अन्न, वस्त्रासारख्या आवश्यक वस्तूदेखील प्रथम बाजारांत न्याव्या लागतात, त्या ठिकाणीं त्याचें पैशांत रूपांतर करावें लागतें आणि मग त्या पैशांच्या जोरावर आपल्या गरजा भागविणारे पदार्थ खरीदावे लागतात असा हा द्राविडी प्राणायाम आजच्या आर्थिक व्यवहारांत निर्माण झालेला आहे. हा द्राविडी प्राणायाम आहे असें म्हणण्यांत या पद्धतीला दोष देण्याचा हेतु नसून या पद्धतीचें स्वरूप सांगण्याचा आहे. हा द्राविडी प्राणायाम निर्माण होण्याचें कारण कोणतेंही उत्पादनाचें केंद्र या पद्धतींत स्वयंपूर्ण व स्वावलंबी असूंच शकत नाहीं हेंच होय. कापडाच्या गिरण्यांमधून तयार होणाऱ्या फक्त कापडावरच तेथील लोकांच्या सर्व गरजा भागल्या असत्या तर या द्रविडी प्राणायामाची गरज नव्हती. पण उत्पादन वाढण्यासाठीं एकेका केंद्रांत एकाच मालाची निपज करणें इष्ट व शक्य असल्याकारणानें यंत्रयुगाला मागची स्वावलंबी पद्धति नष्ट करून विनिमयाचा द्राविडी प्राणायाम आणणें भाग पडलें व त्याच कारणानें उत्पादनाइतकेंच विनिमयालाहि महत्त्व प्राप्त झालें आहे. तेव्हां उत्पादनाच्या क्षेत्रांतील बेबंदशाही नष्ट केली आणि विनिमयाचें क्षेत्र मात्र तसेंच मोकळें ठेवलें तर सर्व योजना वाया जाईल इतकें महत्त्व याहि आर्थिक क्षेत्राला दिलें पाहिजे.

पदार्थांच्या विनिमयाच्या क्षेत्रांत नफेबाजी कसा धुमाकूळ घालते याचा कटु व दारुण अनुभव महायुद्धानें जनतेस पुरेपूर दिला आहे याचें सूतोवाच वरतीं केलेंच आहे. चालू युद्धाच्या चार वर्षांच्या अवधींत पदार्थांचे भाव कडाडले इतकेंच नव्हे तर अन्न-वस्त्र-प्रावरणाच्या वस्तू यक्षिणीच्या कांडीप्रमाणें बाजारांतून क्वचित् प्रसंगीं अदृश्यहि होत असत, या अनुभवाची मीमांसा करूनच आपणास यावरून पुढें पाऊल टाकलें पाहिजे. या महागाईची व दुर्भिळतेचीं अनेक बाजूंकडून अनेक कारणें आलीं असलीं तरी वस्तुस्थितीच्या निकषावर तीं टिकणारीं नसून आज विनिमयाची पद्धति ज्या नफ्याच्या तत्त्वावर चालत आली आहे तें तत्त्वच या दुःस्थितीला जबाबदार आहे ही गोष्ट निर्विवाद रीत्या सिद्ध करतां येण्यासारखी आहे. देशांत दुर्गादेवीसारखा दुष्काळ नाहीं, वीस लाख लष्कर चाळीस कोटींचें अन्न फस्त करण्याइतकें खादाड बनूं शकत नाहीं, शेतकरी बिचारा सावकार व जमीन-

दार यांच्या पाशांत इतका करकच्च आवळला गेला आहे कीं त्यानें मनांत आणलें तरी तो धान्य साठवूं शकत नाहीं, कामगारांच्या पगारांत वाढ झाली असली तरी पदार्थांचे भाव इतके कडाडले आहेत कीं त्या मानानें त्यांचे पगार वाढले म्हणण्यापेक्षां वास्तव अर्थानें कमीच झाले आहेत असें म्हणावें लागतें; आणि परदेशच्या बाजारपेठाहि नाझींच्या पायदळीं युरोप तुडविला गेल्याकारणानें मोठ्या प्रमाणावर तुटल्या गेल्या. या सर्व परिस्थितीचा विचार करतांना आजच्या निर्दय टंचाईला जबाबदार आजची नफ्याच्या तत्त्वावर चाललेली विनिमयाची पद्धति असेंच म्हणावें लागतें. जोंपर्यंत नफेबाजीचा व्यापार चालू आहे तोंपर्यंत ही दुःस्थिति आटोपणार नाहीं. कारण खरेदी व विक्री यांतील अंतर वाढविणें म्हणजे नफा वाढणें हें समीकरण या पद्धतींत जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत सच्छील, दानधर्मी, पट्टीचा देशभक्त व्यापारी-देखील हें समीकरण मार्गदर्शक मानून ज्या ज्या उपायांनीं मालाची चण-चण बाजारांत भासेल ते ते उपाय अमलांत आणण्याचा प्रयत्न करीत राहील आणि नैसर्गिक कारणांनीं हा तुटवडा तयार करणें अशक्य असेल तर विशिष्ट भाव येईपर्यंत स्वतःच्या गुदामांत माल दाबून ठेवून तसा तुटवडा निर्माण करण्याचा प्रयत्न करण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं हें सत्य कटु असेल पण सत्य आहे.

हा अनुभव जर योजकांना कोणता बोध देत असेल तर तो हाच कीं विनिमयाच्या क्षेत्रांतहि नफेबाजीला आळा घालावयास हवा. नफेबाजीस या क्षेत्रांत आळा घालण्यासाठीं व्यापाऱ्यांच्या सदिच्छेला जागें करून काम भागत नाहीं याहि अनुभवाची या ठिकाणीं विचारांत दखल घ्यावी लागते आणि तसा विचार केल्यास चालू विनिमयाची पद्धति बदलून त्या ठिकाणीं उत्पादक व गिऱ्हाईक यांचे साक्षात् संबंध जोडणारी सहकारी पद्धतिच स्वीकारली पाहिजे त्याखेरीज दुसरा मार्ग नाहीं याची जाणीव होण्यास वेळ लागणार नाहीं. या दृष्टीनें जनता-योजनेंत उत्पादकांचे सहकारी तत्त्वावरील खरेदी संघ व गिऱ्हाइकांचे सहकारी विक्रीसंघ या संस्थांचें जाळें विण-ण्याची कल्पना एकंदर योजना यशस्वी होण्यास किती आवश्यक आहे याची खात्री पटेल. या संस्था निर्माण झाल्या तर आजचे छोटे छोटे व्यापारी यांना या संस्थांच्या कार्यांत काम मिळूं शकेल व त्यांचेंहि नुकसान

होणार नाहीं अथवा त्यांच्या नशिबीं बेकारी येणार नाहीं हें योजनेचें म्हणणेंहि रास्त दिसतें; आणि इतकेंहि करून जें विनिमयाचें क्षेत्र या सहकारी तत्त्वापासून मोकळें सुटेल— आणि तसें मोकळें रहाण्याचा संभव आहे—त्या क्षेत्रांतहि उत्पादनाप्रमाणेंच सरकारच्या कडक नियंत्रणाची आवश्यकता आहे ही योजनेची सावधगिरीहि रास्तच आहे.

## भांडवल कसें मिळेल ?

योजनेचा शेवटचा व महत्त्वाचा प्रश्न भांडवलाचा. जनता-योजना १५ हजार कोटींचें भांडवल जमा होईल अशी उमेद कां बाळगते याविषयींची कारण-मीमांसा प्रथम केलेलीच आहे. नफ्यावर कडक नियंत्रण घालूं इच्छिणाऱ्या कोणत्याहि योजनेला खाजगी खिशांतून भांडवल मिळणार नाहीं ही गोष्ट गृहीत धरूनच जनता-योजना चालली आहे. तथापि आपण असें पाहिलें कीं भांडवलदारांना देखील भांडवल सामाजिक श्रमांतूनच मिळत असतें. त्याच श्रमशक्तींतून जनता-योजनेला भांडवल कां मिळूं नये या प्रश्नाला 'मिळालें पाहिजे' हेंच उत्तर द्यावें लागतें. तेव्हां सामाजिक हितानें प्रेरित झालेल्या योजनेला भांडवलाची अडचण भासण्याचें कारण नाहीं इतकें नव्हे तर जनतेचा हार्दिक पाठिंबा अशा प्रकारच्या योजनेला मिळत असल्याकारणानें तें भांडवलशाही अर्थव्यवस्थेपेक्षां अधिक सुलभ रीतीनें व मोठ्या प्रमाणावर गोळा करण्याची शक्यता आहे याविषयीं वाद न करतां प्रत्यक्ष योजनेंत हें भांडवल कसें मिळत जाईल याविषयीं जें विवेचन केलें आहे त्याचीच रूपरेषा थोडक्यांत मांडून हें जनता योजनेचें स्पष्टीकरण संपवावयाचें आहे.

एकंदर योजना बारा वर्षांची आहे. यांपैकीं दोन वर्षें योजनेच्या पूर्वतयारीला व दहा वर्षें योजना अमलांत आणण्यास लागतील. पहिलीं दोन वर्षें व योजनेच्या आरंभींचीं तीन वर्षें मिळून पांच वर्षांसाठीं १६०० कोटींचें भांडवल जमा करावें लागेल. हें भांडवल योजनेंत कामास आल्यानंतर पुढील कालांत योजनेला लागणारें भांडवल जनतेच्या उत्पादन-क्षेत्रांतूनच मिळेल अशी अपेक्षा. तेव्हां भांडवलाचा विचार करतांना विवेचनाच्या सोयीसाठीं या ठिकाणीं दोन भाग पाडावे लागतील, एक हें १६००

कोटींचें भांडवल कसें गोळा होत जाईल हा प्रश्न आणि दुसरा प्रश्न योजनें-तूनच नंतर भांडवल कसें मिळेल ?

प्रथम दुसऱ्या प्रश्नाच्या विचारापासून सुरुवात करूं. असा विचार करतांना जे अंदाज दिलेले आहेत ते अर्थातच ठोकळ स्वरूपाचे आहेत. योजनाकार स्वतःच म्हणतात त्याप्रमाणें " आंकडे म्हटले कीं ते अचूक व बरोबर असतात ही कल्पना त्याबरोबर येत असते." तसे अचूक अंदाज बांधण्यासाठीं जी माहिती असावी लागते तशी सध्यांच्या अवस्थेंत मिळणें शक्य नसल्याकारणानें अंदाजी आंकड्यांनीं दाखविलेली दिशाच अधिक महत्त्वाची आहे हा सामान्य विचार लक्षांत घेऊन जनता-योजना आपली भांडवल जमा करण्याची योजना तयार करीत आहे असें आपण लक्षांत घेतलें पाहिजे. भांडवलाच्या योजनेंत शेती व उद्योगधंदे असे दोन विभाग कल्पून 'प्रत्येकीं गुंतविलेल्या भांडवलावर अधिक उत्पन्न किती येईल हा विचार या ठिकाणीं महत्त्वाचा ठरतो. त्या दृष्टीनें शेतीमध्यें १ रुपाया भांडवलावर १.२ इतकें अधिक उत्पन्न येईल. नवीन लागवडीस आलेल्या शेतीवर १ रुपया भांडवलावर २ रु. अधिक उत्पन्न येऊं शकेल; आणि औद्योगिक क्षेत्रांत १२ रुपये भांडवलावर ५ रु. अधिक उत्पन्न येऊं शकेल असा योजनाकारांचा अंदाज आहे. या हिशोबानें शेती व उद्योग-धंदे या दोनहि क्षेत्रांत मिळून दहा वर्षांमध्यें वट्ट राष्ट्रीय संपत्तीची वाढ जवळजवळ २८ हजार कोटि रुपयांनीं होईल असें सांगून त्याच्या दरवर्षी उत्पन्नवाढीचा अंदाजहि योजनेंत दिला आहे ( पृ. १६८ पहा. )

राष्ट्रीय संपत्तीमध्यें ही २८ हजार कोटींची वाढ होणार त्यापैकीं कांहीं भाग व आज जें उत्पन्न आहे त्यापैकीं कांहीं भाग, भांडवलाच्या रूपानें कसा गुंतवितां येईल एवढाच प्रश्न या योजनेसमोर उभा राहतो. खाजगी मालकी व नफा यांवर कडक नियंत्रण असल्याकारणानें हें जादा उत्पन्न अल्पसंख्यांच्या हातांत जाऊं शकत नाहीं या गोष्टीवर वेगळा भर देण्याचें कारण नाहीं. या नवीन उत्पन्नापैकीं भांडवलाचा हिस्सा ठरवितांना लोकांच्या रहाणीचें मान सारखें वाढतें रहाण्यास किती उत्पन्न लागेल याची पहिली काळजी घेतली पाहिजे. ती काळजी घेऊनच जनता-योजनेनें शेतीमधून लोकांच्या रहाणीकरितां १८ हजार कोटि व भांडवलाकरितां

(दरवर्षीच्या उत्पन्नवाढीचें कोष्टक : आंकडे कोटि रुपयांचे)

| वर्ष | शेती | उत्पादक कारखाने | भोग्य वस्तूंचे कारखानें |
|---|---|---|---|
| १ | ... | ... | ... |
| २ | ... | ४२ | ... |
| ३ | ९०० | ८४ | ४२ |
| ४ | १६०० | १२६ | ८४ |
| ५ | २२८० | १६८ | १४७ |
| ६ | २८२० | २३१ | २५२ |
| ७ | ३३६० | ३५४ | ४१६ |
| ८ | ३६६० | ५०० | ६०४ |
| ९ | ३७८० | ६६६ | ८१२ |
| १० | ३९०० | ८७५ | १०२० |
| एकूण | २२,३०० | ३०४६ | ३३७७ |

एकूण बेरीज २८,७२३ (पृ. ४५)

× × ×

११९१६ कोटि मिळतील अशी तरतूद केलेली दिसते. या १८ हजार कोटींमुळें ग्रामीण जनतेचें रहाणीचें मान २९ रुपयांपासून १२१ रुपयांपर्यंत म्हणजे जवळ जवळ चौपटीनें वाढणार आहे. त्याखेरीज ११ हजार कोटि भांडवल मिळूं शकेल. यांपैकीं दहाव्या वर्षी मिळणारे ११०० कोटि रुपये अकराव्या वर्षाकरितां उपयोजिले जाणार असल्याकारणानें ते वजा केले तर १०८१६ कोटि म्हणजे शेतीच्या वट्ट उत्पन्नापैकीं ३५ टक्के उत्पन्न भांडवलासाठीं मिळावयास हरकत नाहीं.

शेतीकडून औद्योगिक क्षेत्राकडे वळलों तर योजनाकार म्हणतात कीं, दोनहि प्रकारच्या उद्योगांपासून वट्ट उत्पन्न ९४२३ कोटि रुपयांचें येईल; यापैकीं ५४ टक्के उत्पन्न म्हणजे ५०७४ कोटि रुपये लोकांच्या उपभोगाकरितां ठेवले पाहिजेत. या हिशेबानें शहरांतील श्रमजीवि जनतेचें ५७ रुपयांपासून १७२ रुपयांपर्यंत म्हणजे जवळजवळ तिपटीनें रहाणीचें मान वाढूं शकेल, आणि इतकी रहाणी सुधारून ४१४९ कोटि शिल्लक रहाते, यापैकीं

१३१५ कोटि दहाव्या वर्षीं मिळणार असल्याकारणानें ते वजा जातां २८३४ कोटि म्हणजे वट्ट औद्योगीक उत्पन्नाच्या ३० टक्के भांडवल म्हणून मिळावयास हरकत नाहीं.

एकंदर राष्ट्रीय संपत्तीपैकीं ७० टक्के जनतेच्या गरजांपायीं खर्चे पडले जाणार असून ३० टक्के उत्पन्न भांडवलाच्या रूपानें गुंतविणें सहज शक्य आहे हा या सर्व आंकड्यांचा मथितार्थ आहे. आतां प्रश्न असा येतो कीं, सरकारला हें कसें गोळा करतां येईल ? जनता-योजनेचें त्याला उत्तर असें कीं, उद्योगधंद्यांच्या बाबतींत रशियाप्रमाणें मालाच्या पैदाशीवर एक कर ( turnover tax ) वसूल करून औद्योगिक क्षेत्रांतून भांडवल गोळा करणें शक्य आहे. प्रश्न आहे तो शेतीचा. शेती ज्या प्रमाणांत सामुदायिक पद्धतीनें लागवडीस येईल त्या प्रमाणांत औद्योगिक क्षेत्राप्रमाणेंच हा प्रश्न सुलभ होत जाईल. दरम्यानच्या काळांत योग्य कराच्या रूपानें सरकारनें हें भांडवल आपल्या हातीं घेण्याची व्यवस्था केली पाहिजे. अशा रीतीनें भांडवल व राहाणीचें मान यांचें प्रमाणहि वाढत जात राहील असें जनता-योजना सांगूं इच्छिते.

भांडवल आपोआप कसें मिळूं शकेल या प्रश्नाचा उलगडा केल्यानंतर प्राथमिक १६०० कोटि रुपयांचें भांडवल जनता-योजना कसें मिळवूं इच्छिते याचा विचार फक्त राहिला. यापैकीं जमिनीवरील खाजगी मालकी व सावकारी हे भाग काढल्याकारणानें योजनेच्या पहिल्या वर्षींच ४२० कोटि रुपये गोळा होतात. यापैकीं सावकार व जमीनदार यांना लिहून दिलेल्या कर्जरोख्याच्या व्याजासाठीं १८० कोटि द्यावे लागतील, ते वजा केले असतां २४० कोटि रुपये योजनेच्या पहिल्या वर्षींच मिळूं शकतात. यानंतर ज्या उद्योगधंद्यांत खाजगी भांडवल गुंतलें आहे त्यांवर सरकारचें कडक नियंत्रण रहाणार असल्याकारणानें त्यामधून १०० कोटि रुपये मिळतील अशी अपेक्षा करण्यास हरकत नाहीं. ३४० कोटि रुपये या दोन मार्गांनीं गोळा झाल्यावर इंग्लंडमधील गंगाजळीचा तिसरा महत्त्वाचा मार्ग रहातो. ही गंगाजळी आज एक हजार कोटींची असली तरी युद्ध संपतांक्षणींच दुसऱ्या दिवशीं आपणास ती मिळेल अशी वेडी आशा धरण्यांत हशील नाहीं. योजनाकारांच्या मतानें योजनेच्या पहिल्या तीन वर्षांच्या अवधींत ४५० कोटि रुपये या

मार्गानें मिळतील असा अंदाज धरला तर तो अतिशयोक्तीचा ठरणार नाहीं. अशा रीतीनें ७९० कोटि रुपये गोळा केल्यानंतर ८१० कोटि रुपये गोळा करणें अशक्य आहे काय ? असा योजनाकारांचा सवाल आहे. ८१० कोटि म्हणजे राष्ट्रीय उत्पन्नाच्या ४५ टक्के आणि तेहि चार वर्षांत गोळा करावयाचे म्हणजे ११ टक्के व पांच वर्षांत वसूल करावयाचे झाल्यास ९ टक्के प्रमाण पडतें. अर्थात् मृत्यु-कर, अनुवंश-कर इ० योग्य कर बसवून व दरिद्री जनतेवर त्या करांचें ओझें पडणार नाहीं अशी काळजी घेऊन हें ८१० कोटींचें भांडवल गोळा करणें जनता–योजनेच्या मतानें सहज शक्य आहे.

एकंदर पंधरा हजार कोटि कसे व कोणत्या मार्गांनीं मिळतील त्याचें कोष्टक खालीलप्रमाणें :—

( आंकडे कोटि रुपयांचे )

| | |
|---|---|
| गंगाजळी ... ... ... | ४५० |
| मृत्युकर, आनुवंशिक कर इ० रूपानें ... | ८१० |
| जमिनीच्या राष्ट्रीयीकरणामुळें योजनेच्या पूर्वी एक वर्ष ... | ९० |
| शेतीपासून मिळणारें भांडवल ... ... | १०,८१६ |
| उद्योगधंद्यापासून ... ... ... | २८३४ |
| एकूण | १५००० |

## संरक्षणाचा प्रश्न

या सबंध योजनेंत देशाच्या संरक्षणाचा प्रश्न ( defence ) विचारांत घेतला नाहीं असा आक्षेप येण्याचा संभव आहे. योजनेचें त्याला पुढील-प्रमाणें उत्तर आहे. युद्धोत्तर जगांत लोकसत्ताक शक्तींचाच विजय होणार असल्याकारणानें भावी काळांत आक्रमक युद्धाचा संभव कमी दिसतो. पण त्याहीपेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट ही कीं ज्या प्रकारचें नियोजन येथें सुचविलें जात आहे त्या प्रकारच्या नियोजनाची गरज युरोपांतील प्रत्येक देशाला आजच भासूं लागली आहे आणि पुढेंहि भासेल याविषयीं संदेह नाहीं. तेव्हां आर्थिक योजनेचा प्रयोग सार्वत्रिकच होणार असल्याकारणानें

हिंदुस्थानांतील आर्थिक योजनेला जगाच्या सहानुभूतीच्या वातावरणाचा फायदा मिळूं शकेल. सोव्हिएट योजनेला संरक्षणाच्या प्रश्नावर भर द्यावा लागला याचें प्रमुख कारण ती विरोधी वातावरणांतच मुळीं जन्माला आली. ज्या रशियन क्रांतींतून योजनेचा जन्म झाला ती क्रांति आपल्या मुळावर उठली आहे अशी भांडवलदार जगाची खात्री झाल्याकारणानें ही योजना नामोहरम करण्याचे त्यांचे आटोकाट प्रयत्न चालू होते ही गोष्ट महशूर आहे. त्याच परिस्थितीची पुनरावृत्ति भावी काळांत होईल असें मानण्यास आज तरी जागा दिसत नाहीं. तथापि, यदाकदाचित् तशी परिस्थिति निर्माण झालीच तर योजनाकार म्हणतात कीं, " भावी योजना-समितीला संरक्षणाची या योजनेंत तरतूद करणें शक्य होईल ही गोष्ट योजनेच्या स्वरूपावरूनच स्पष्ट होण्यासारखी आहे. " ( पृ. ४१ )

× × ×

जनता-योजनेचें विशदीकरण याठिकाणीं संपलें. या धावत्या विवेचना-वरून जनता-योजनेनें दाखविलेली दिशा हीच खरीखुरी लोकशाहीची दिशा आहे. जनतेचें दारिद्य नष्ट करावयाचें असेल तर याखेरीज अन्य मार्ग नाहीं. नफ्याच्या जागीं मानवी गरज, खाजगी मालकीच्या ठिकाणीं सर-कारी नियंत्रण व सरकारवर जनतेचें प्रभावी नियंत्रण या मूलतत्त्वांच्या भर-भक्कम पायावर उभें राहून प्रथम शेतीची वाढ, नंतर भोग्य वस्तूंचें उत्पादन व अखेर यंत्रांची पैदास अशा क्रमानें लोकांना, नव्वद टक्के लोकांना, त्यांच्या अन्न, वस्त्र, घर, आरोग्य व शिक्षण या प्राथमिक गरजा भागविण्याची संधि जनता योजना त्यांना देत आहे; आणि या आर्थिक विकासाचा पाया इतका व्यापक व रुंद घातल्यानंतर हिंदी समाजाचा सर्वांगीण विकास करणें शक्य होणार आहे असें जनता-योजना आपणास बजावीत आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर जगासमोर गेल्या पंचवीस वर्षें ' फॅसिझम कीं लोकशाही ' हा प्रश्न उभा होता आणि युद्धोत्तर काळांत मुंबई-योजना व जनता-योजना या दोन योजनांच्या रूपानें तोच प्रश्न हिंदी जनतेच्यासमोर उभा रहाणार आहे. यासाठीं या महत्त्वाच्या प्रश्नाची थोडक्यांत छाननी केल्याखेरीज योजनाविषयक विवेचन पुरें होऊं शकत नाहीं आणि तेंच अखेरच्या उप-संहारांत करण्याचें योजिलें आहे.

# युद्धोत्तर भारताचें भवितव्य



" का हो, हें योजनापुराण ठीक झालें. पण ज्या राजकीय सत्तेच्या जोरावर योजना अमलांत येणार तिचाच अद्यापि थांगपत्ता नाहीं आणि उगीचच राजकीय सत्तेच्या बाजारांत ही योजनांची मारामारी कशाला ?" असा आक्षेप कित्येकांच्या जिभेवर वरील विवेचन वाचतांना घोटाळत असेल. तसें पाहिलें तर सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं हा न्याय जुनाच नाहीं का ? पण लगेच विचार असा येतो कीं, मग योजना मांडणाऱ्यांना ही साधी गोष्ट देखील माहीत नव्हती कीं काय ? आणि त्यांना हें माहीत असेल तर मग त्यांनीं योजना आंखण्याचा हा खटाटोप कां केला ? असे अनेक प्रश्न आपल्या मनांत गर्दी करीत असतील; आणि त्या प्रश्नांचाच संक्षेपतः विचार मांडणें यापेक्षां दुसरा योग्य उपसंहार कोणता असणार ?

सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं या साध्या सत्याचा—व्यावहारिक सत्याचा विसर योजनाकारांना पडला असेल असें म्हणण्याचें धाडस करवत नाहीं. एक वेळ कामगार—फेडरेशननें मांडलेली योजना बोलून चालून कामगारांचीच आणि कामगारांच्या मागण्या नेहमींच भरारी मारीत असतात म्हणून जनता-योजनेकडे तुच्छताबुद्धीनें सुशिक्षित पाहूं शकतील आणि तसे ते पहातातहि; पण ज्यावेळीं या देशांतील प्रसिद्ध आठ भांडवलदार—ज्यांचें उभें आयुष्य रुपये आणे पैच्या हिशेबांत खर्ची पडलें आणि साहित्य, कला इ. प्रमाणें आर्थिक प्रश्नाकडेहि ते अशीच काव्यमय दृष्टि बाळगतील असा आरोप त्यांचा वैरी देखील ज्यांवर करूं शकणार नाहीं—एक योजना घेऊन पुढें येतात त्यावेळीं 'गुलबकावली', 'सिंहासनबत्तिशी' किंवा 'आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' यांप्रमाणें एक आर्थिक गद्यकाव्य लिहिण्याची त्यांना हुक्की आली आहे असा आरोप करणें म्हणजे वस्तुस्थितीचें संपूर्ण अज्ञान प्रकट करण्यासारखें आहे. केवळ वैयक्तिक आठ भांडवलदारांचाच हा प्रश्न असता तरीहि योजनेचें इतकें महत्त्व नव्हतें, पण देशांतील भांडवलदार व व्यापारी यांच्या प्रातिनिधिक संस्थेनें या योजनेला मान्यता दिल्याकारणानें

ही योजना त्या वर्गाची प्रातिनिधिक योजना बनली आहे आणि या देशाच्या आर्थिक जीवनांतलि एक सत्ताधारी वर्ग योजना घेऊन पुढें येतो त्यावेळीं त्या घटनेला विशिष्ट राजकीय महत्त्व आहे असें त्यांतून ओघानेंच निष्पन्न होतें.

त्या दृष्टीनें विचार सुरू झाला तर दोनहि योजनांमध्यें जें राजकीय गृहीत कृत्य आहे त्याला अधिक महत्त्व द्यावयास हवें. मुंबई योजनेला हवें असलेलें 'राष्ट्रीय सरकार' किंवा जनता योजनेला मान्य असलेलें अठरा मूलभूत तत्त्वांवर आधारलेलें 'जनता-सरकार' यांचा त्या दृष्टिकोणांतून कसोशीनें विचार करण्याची आज वेळ आली आहे. कां? कारण राजकीय सत्तेचा प्रश्न आतां केवळ तात्त्विक वादविवादाच्या स्वरूपाचा राहिला नसून त्याला व्यावहारिक स्वरूप या महायुद्धानें आणून दिलेलें आहे म्हणून. एरवीं आर्थिक योजना विचारापुढें मांडण्याची गरजच नव्हती किंवा आमच्या विचाराचें लक्ष आर्थिक प्रश्नावर केंद्रीभूत व्हावें असा प्रश्नहि उपस्थित झाला नसता. गेल्या दहावीस वर्षांत योजनाविषयक विचार राजकीय वातावरणांत आले नाहींत असें नाहीं. पण राष्ट्रीय योजना-समिति काय किंवा सर विश्वेश्वरअय्या यांचा योजनाविषयक प्रबंध काय, या सर्व प्रयत्नांकडे केवळ कुतूहलाच्या भावनेनें पहाण्यापलीकडे त्या विचारांना फार महत्त्व नव्हतें आणि त्याचें कारणहि उघड होतें. राज्यसत्तेच्या प्रश्नानेंच आमच्या विचारांत मध्यवर्ति स्थान पटकावल्याकारणानें त्याला कांहीं व्यावहारिक महत्त्व आहे असें त्या वेळीं वाटत नव्हतें. मग, आपण विचाराल, 'महायुद्धानें या परिस्थितींत बदल केला काय?' तर 'होय' असें त्याचें निश्चयात्मक उत्तर आहे. ज्या राजकीय सत्तेच्या गृहीत कृत्यापासून या योजनांना प्रारंभ झाला आहे तें गृहीतकृत्य केवळ गृहीतकृत्य या स्वरूपाचेंच राहिलें नसून युद्ध संपल्यानंतर लगतच्या भविष्यकाळांत तो एक व्यावहारिक प्रश्न होणार, नव्हे ब्रिटिश सम्राटांच्या हातून निसटत चाललेली सत्ता कोणी घ्यावयाची इतकेंच या प्रश्नाचें स्वरूप राहील या जाणिवेंतूनच या योजना पुढें आलेल्या दिसतात. ही एक साधी व्यावहारिक शहाणपणाची गोष्ट आहे कीं युद्धोत्तर भारतांत राजकीय सत्तेची खांदेपालट होण्यास जर पांच-

पंचवीस वर्षांचा अवधि लागेल असें वाटत असतें तर योजना मांडण्याचा अव्यापारेषु व्यापार खास झाला नसता.

### ब्रिटिश साम्राज्याचें विघटन

जें एके काळीं आमच्या राजकीय आचाराचें व विचाराचें ध्येय होतें तें आज आमच्या विचारांत गृहीतकृत्य होऊन बसलें हा महत्त्वाचा बदल कशानें झाला ? असा प्रश्न या ठिकाणीं निर्माण होतो आणि 'महायुद्धानें' असें त्याचें तात्काल उत्तरहि द्यावें लागतें. दुर्दैवानें आपल्या देशातील वैचारिक वातावरणांत महायुद्धानें किती मोठे बदल होत आहेत याची दखलहि नाहींसें दिसतें. पण शांततेच्या काळांत जे फरक घडण्यास सहज पन्नास वर्षांचा काळ लोटला असता ते फरक युद्धाच्या अवघ्या पांच वर्षांच्या काळांत घडून येत आहेत हें आपण सत्वर ओळखावयास हवें. एकच उदाहरण देऊन ही गोष्ट सिद्ध करतां येईल आणि ती घटना योजनाविषयक विचारांत अधिक महत्त्वाची आहे म्हणून तें उदाहरण घेण्याची अधिकच गरज भासते. ती घटना म्हणजे ब्रिटिश साम्राज्याच्या आर्थिक पायाचें संपूर्ण विघटन. 'ब्रिटिश साम्राज्याचें विघटन' हे शब्द उच्चारतांक्षणींच गाढ झोंपेंतून दचकून उठावें त्याप्रमाणें 'आं ! म्हणतां काय ? साम्राज्याचें विघटन ? वेडाबिड तर लागलें नाहीं ना' असा आश्चर्याचा उद्गार बाहेर पडेल हें जाणूनहि परिस्थितीचा विचार करतां ब्रिटिश साम्राज्य या महायुद्धानें खाऊन टाकलें या घटनेवर या ठिकाणीं विशेष भर द्यावयाचा आहे. राजकीय विचारांत आज चालू असलेली मनोवृत्ति लक्षांत घेतां विघटनाचा सिद्धान्त कित्येकांना रुचणार नाहीं, पुष्कळांना पचणार नाहीं आणि सर्वांच्या दृष्टीनें तें एक भलें मोठें पाखंड ठरेल. पण त्याचबरोबर आमच्या विचारांत 'साम्राज्य' 'साम्राज्याविरोध' 'राष्ट्रीय स्वातंत्र्य' या सर्व गोष्टींचा शास्त्रीय विचार होण्यापेक्षां भावनेच्या अभिनिवेशानेंच आम्ही त्याजकडे पहात असतों ही गोष्ट लक्षांत घेतल्यास 'साम्राज्य विघटने' च्या सिद्धांतावर होणारी वावटळ सत्यासत्याचा निर्णय होण्याच्या दृष्टीनें फारशी लाभदायक होणार नाहीं.

यासाठीं चालू महायुद्धांत ब्रिटिश साम्राज्याचें संपूर्ण आर्थिक विघटन

झालें आणि उद्यां युद्ध संपल्यानंतरहि त्या साम्राज्याचें पुनरुज्जीवन होण्याचें कोणतेंच चिन्ह दिसत नाहीं या गोष्टीवर फिरून फिरून भर द्यावासा वाटतो. 'साम्राज्याची विघटना करण्यासाठीं मी प्रधानकीचीं वस्त्रें हातीं घेतलीं नाहींत' हे चर्चिलचे उद्गार या सिद्धान्ताचें खंडन म्हणून तोंडावर फेंकले जातील याची हा सिद्धान्त मांडतांना जाणीव ठेवलेली आहे. त्याला उत्तर इतकेंच; ब्रिटिश साम्राज्याचा जन्म व वाढ आणि आतां त्याचा विनाश चर्चिल किंवा तत्पूर्वीं होऊन गेलेल्या मुत्सद्यांच्या इच्छेवर अवलंबून नाहीं. क्लिओपाट्राचें नाक तसूभर लांब किंवा आंखूड असतें तर रोमन साम्राज्याचा आहे यापेक्षां वेगळा इतिहास लिहावा लागला असता या व्यक्तिमाहात्म्याच्या दृष्टिकोणांतून सामाजिक घटनांकडे बघितलें तर त्यांचा बुद्धिगम्य उलगडा कधींच होणें शक्य नाहीं. क्लिओपाट्राचें नाक, चर्चिलचा चिरूट व स्टालिनचा पाइप हींच जर ऐतिहासिक घटनांचीं आदिकारणें होऊं लागलीं तर मग सगळा ग्रंथच आटोपला म्हणावयाचा! तसें नसेल तर मग आपणांस या सत्याचा साक्षात्कार होण्यास कोणतीच हरकत नसावी कीं ब्रिटिश साम्राज्याची खरी ताकद त्याच्या आर्थिक पायांत आहे. लेनिननें केलेल्या शास्त्रशुद्ध निदानाप्रमाणें आधुनिक साम्राज्य 'अतिरिक्त भांडवलाच्या निर्याती' वर बसलेलें असतें. हातांत सांठवलेलें भांडवल ज्यावेळीं स्वदेशांत किफायतशीर रीतीनें गुंतावितां येत नाहीं त्या वेळीं ज्याठिकाणीं किफायतशीर रीतीनें तें गुंतवतां येईल त्याठिकाणीं निर्यात करण्याची गरज निर्माण होऊन त्या गरजेच्या पोटीं आधुनिक साम्राज्यांचा जन्म झालेला आहे. गुंतवलेलें भांडवल, त्यावरील नफा इ. गोष्टी सुरक्षित राखण्यासाठीं आर्थिक वर्चस्वामागोमाग राजकीय वर्चस्व येत असेल. पण त्यावरून राजकीय वर्चस्व हें कांहीं आधुनिक साम्राज्याचें मुख्य लक्षण होऊं शकत नाहीं. भांडवलाची निर्यात हा साम्राज्याचा पाया असून राजकीय वर्चस्व हा त्याचा एक परिणाम आहे. आपण जर गेल्या महायुद्धानंतरचा अमेरिकन साम्राज्याचा इतिहास चाळला तर राजकीय शासनयंत्र स्वतःचें असें स्थापन न करतां आर्थिक वर्चस्व त्या साम्राज्यानें अनेक देशांवर बसविलेलें आढळेल. यासाठीं भांडवलाची निर्यात हेंच आधुनिक साम्राज्याचें खरें वैशिष्ट्य ठरतें.

(" In the modern kind, the capitalism of monopolies, the export

of capital becomes the typical feature." Lenin's Imperialism, P. 61)

तेव्हां ब्रिटिश साम्राज्य म्हणजे ब्रिटिश भांडवलदारांचें भांडवल. हें भांडवल ज्या व्यापारामार्फत गोळा होतें, परदेशीं रवाना होतें व त्या ठिकाणीं गुंतविलें जातें तो व्यापार ही त्या साम्राज्याची नाडी. ज्यावेळीं ही आर्थिक ताकद नष्ट होईल, या व्यापाराला शह लागून आर्थिक पाया ढासळूं लागेल त्यावेळीं साम्राज्याच्या राजकीय वर्चस्वाला सम्राटांच्या दृष्टीनें देखील महत्त्व रहाणार नाहीं. " हिंदी साम्राज्याचा आद्य हेतु व प्राण म्हणजे आमचा व्यापार. तो व्यापार जर संपला तर आम्हांस हिंदुस्थानांत रहाण्याचें सामर्थ्य रहाणार नाहीं व प्रेरणाहि असणार नाहीं."* हा 'मॉर्निंग पोस्ट' या पत्रानें १९२६ सालीं दिलेला इषारा याबाबत सदैव मार्गदर्शक ठरेल. महायुद्धानें या साम्राज्याची आर्थिक विघटना केली संपूर्णपणें विघटना केली असें आपणांस साम्राज्याच्या कोणत्याहि आर्थिक अंगाचा विचार केला तरी स्पष्ट दिसेल. पहिली डोळयांत भरण्यासारखी गोष्ट म्हणजे युद्ध संपलें कीं हिंदुस्थान धनको राष्ट्र व इंग्लंड ऋणको राष्ट्र या स्वरूपांत जन्म पावणार आहे. या देशांतील वृत्तपत्रीय वातावरणांत इंग्लंडमधील या गंगाजळीबद्दल बरीच भवति न भवति चालू असली तरी एक सत्य त्यामधून कधींच दडवतां येणार नाहीं आणि तें सत्य हें कीं जवळ जवळ बाराशें कोटींचें इंग्लंडचें हिंदुस्थानवरील कर्ज युद्धानें संपूर्ण नष्ट झालें आहे. पण साम्राज्याची आर्थिक विघटना येथवरच थांबली नाहीं. युद्धाच्या गरजेमुळें ब्रिटिश सरकारानें आपल्या देशांतील भांडवलदारांचें परदेशीं गुंतविलेलें भांडवल विकून घरचे कर्जरोखे त्याबद्दल त्यांना बहाल केलेले आहेत. जें कांहीं भांडवल उरलें सुरलें असेल त्याचा विनियोग परदेशीं काढलेल्या कर्जापायीं लिहून दिलेल्या गहाणखतासारखा आहे. याखेरीज युद्ध चालविण्याकरितां अन्न, कच्चा माल व इतर पदार्थ यांची आयात करून कर्जाचा बोजा चढला आहे तो वेगळाच. उधार उसनवार कायद्यानें याची नगदी

*" Trade is the life and purpose of the Indian Empire. If we lose that trade, we have neither the power nor the incentive to remain in India " —Morning post, London, Jan. 19, 1926.

परतफेड करण्याचा प्रसंग आला नाहीं तरी युद्धोत्तर काळांत ‘भांडवलावर येणारा नफा’ हें प्राप्तीचें सदर शून्याचाच आंकडा दाखवील.

प्रत्यक्ष गुंतवलेल्या भांडवलाची ही परिस्थिति झाली. पण ब्रिटिश साम्राज्याचें खरें येणें कांहीं बाबतींत तरी अदृश्य स्वरूपाचें होतें. यापैकीं नौकानयनाचा व्यापार, व परदेशांतील इंग्रज व्यापाऱ्यांनीं चालवलेल्या विमा कंपन्या, पतपेढ्या, डिस्काउंट हौस इ० व्यापार हीं दोन महत्त्वाचीं जमेचीं सदरें होत. याचें भवितव्य ? तें आजच स्पष्ट दिसत आहे. यापुढें या दोन प्रकारच्या व्यापारांबाबत जगांतील प्रत्येक देशांत अमेरिकेचें वाढतें वर्चस्व पदोपदीं अनुभवाला येत आहे. तेव्हां युद्धोत्तर काळांतहि साम्राज्याला या धंद्याबाबत ऊर्जितावस्था दिसत नाहीं. जित व जेते, ऋणको व धनको या विषमतेच्या पायावर, पेरलेल्या भांडवलाच्या जोरावर, सत्तीनें आपलें साम्राज्य टिकविण्याचे दिवस संपले असाच याचा सरळ अर्थ होतो. ब्रिटिश साम्राज्याचें आर्थिक विघटन कसें होत आलें याचें चित्र स्पष्ट शब्दांत प्रख्यात अर्थशास्त्रज्ञ जी. डी. एच. कोल यांनीं ‘ युद्धोत्तर जगांतील इंग्लंड ’ या आपल्या नवीन पुस्तकांत रेखाटलेलें आहे असें खालीं दिलेल्या उताऱ्यावरून दिसून येईल.

" Consider now the position as it is likely to be after the war. The British Government has already sold to foreigners a considerable portion of the overseas assets previously owned by British subjects and has compensated their owners with home securities. Further overseas assets are in pawn for loans made to Great Britain and there is, on paper at any rate, a big debt owing by Great Britain for war supplies and necessary imports....... It is highly likely that Great Britain will emerge into the post war world......with a net income of nothing at all from overseas investment. "

-Great Britain in the Post War World, by G. D. H. Coal. Page33-34.

ब्रिटिश साम्राज्याची जमा अशा प्रकारें संपुष्टांत येत चालली आहे हें पाहिल्यानंतर खर्चाच्या बाजूकडे दृष्टि वळवावी तों या विघटनाची कल्पना अधिक उठावदार रीतीनें मनांत भरते. आज कित्येक वर्षें साम्राज्याच्या व्यापाराचें वैशिष्ट्य हेंच होतें कीं त्याचा आयात व्यापार निर्यात व्यापारापेक्षां अधिक असे. केवळ आंकडे बघितले तर इंग्लंडला येण्यापेक्षां देणेंच

अधिक आहे असा भास होई. पण सूक्ष्म अभ्यासकांना ही गोष्ट माहीत होती कीं आयात-निर्यातीमधील ही तफावतच ब्रिटिशांचें भांडवली वर्चस्व दाखवीत असे. येण्यापेक्षां देणें अधिक असलें तरी हें अधिक देणें काय दाखवीत असे असा विचार केला तर ठिकठिकाणीं पेरलेल्या भांडवलावरील नफा, नौकानयन व इतर व्यापार यांमधील उत्पन्न या तफावतीच्या स्वरूपानें प्रकट होत असे असें म्हणतां येईल. आपण असें पाहिलें कीं या तफावतीच्या स्वरूपांत प्रकट होणारें अदृश्य साम्राज्य नष्ट झालें. मग आयात व्यापार त्याच प्रमाणांत घटेल काय ? या प्रश्नाचेंहि 'नाहीं' असेंच उत्तर द्यावें लागतें. कारण, इंग्लंडमधील औद्योगिक विकासाचा इतिहास नाहीं म्हटलें तरी आज चारपांचशें वर्षांचा आहे. तो एकाएकीं नष्ट करून इंग्लंडला मध्ययुगीन वातावरणांत गेल्याखेरीज कच्चा माल व धान्य या पदार्थांची आयात कमी करतां येणार नाहीं आणि ती कमी करतां येणार नाहीं इतकेंच नव्हे तर उद्यांच्या जगांत त्यांना निर्यात व्यापार वाढवावयाचा असेल, ब्रिटिश जनतेचें रहाणीचें मान वाढवावयाचें असेल तर ही आयात पाऊणशें टक्क्यांनीं अधिक वाढवावी लागेल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. मग हें देणें उद्यांचें इंग्लंड कसें भागवणार ? साम्राज्याच्या आर्थिक बळावर असें म्हणावें तर तें आर्थिक बळच नाहीं असें आपणांस दिसून आलें. यांतून एकच मार्ग इंग्लंडपुढें शिल्लक रहातो आणि तो म्हणजे भांडवलदार अर्थव्यवस्थेच्या चाकोरींतून बाहेर पडण्याचा. इंग्लंड त्या मार्गानें जाऊं शकेल काय ?

### थोडा मागचा इतिहास

पण या प्रश्नाचें उत्तर शोधण्यापूर्वीं थोडा मागच्या इतिहासाचा धागादोरा बघितला पाहिजे. चालू महायुद्धानें साम्राज्यविघटनाची ही जी क्रिया पूर्ण केली तो कांहीं साम्राज्याला घडलेला अपघात नाहीं. या विघटनाचा प्रारंभ गेल्या महायुद्धानें केला आणि त्याची समाप्ति या महायुद्धांत झाली असल्याचें गेल्या वीस वर्षांच्या धांवत्या विवेचनावरूनदेखील सहज पटण्यासारखें आहे.

जालियनवाला बागेंतील अत्याचार हें गेल्या महायुद्धाचें अपत्य आहे असें

आपण नेहमीं ऐकतों पण गेल्या महायुद्धानें केलेल्या फेरबदलाची ही अर्धी बाजू झाली. त्याची दुसरी बाजू आपण विचारांत घेतली पाहिजे. ती बाजू म्हणजे साम्राज्याची अंतर्गत कमजोरी. वस्तुतः ब्रिटिश साम्राज्य म्हणजे तरी काय ? तर ब्रिटिश भांडवलशाही. ब्रिटिश भांडवलशाहीच्या अंतर्गत मजबुतीवरच साम्राज्याची इमारत उभी होती व त्याची वाढ होत होती. गेल्या युद्धानें पहिला महत्त्वाचा फरक कोणता घडला असेल तर ब्रिटिश भांडवलशाहीच्या अंतर्गत सामर्थ्याला प्रथम जोराचा तडाका बसला. साम्राज्याच्या खऱ्या मालकांना असें दिसून आलें कीं ब्रिटनमधील मालाचें उत्पादन कमी कमी होऊं लागलेलें आहे. कारणेंहि अगदीं स्पष्ट दिसत होतीं. एक तर युद्धानें निर्माण केलेलें कर्ज आणि दुसरें जागतिक बाजारपेठेचा संकोच. ज्या महत्त्वाच्या धंद्यावर—कोळसा, लोखंड व पोलाद, कापूस व जहाजांचें बांधकाम इ०—ब्रिटिश साम्राज्याची गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत मदार होती, जे धंदेच निर्यात व्यापारापैकीं निम्याहून अधिक व्यापार चालवीत असत, त्या धंद्यांतील उत्पादन एकसारखें घटत चाललें होतें आणि होणारी घट केवळ हंगामी नसून कायम स्वरूपाची आहे अशी दुःखद जाणीव ब्रिटिश भांडवलदारांना होऊं लागली असें दिसतें. १९२७ मध्यें ' लिबरल इंडस्ट्रियल इन्कायरी कमेटी 'ला असें हताशपणें म्हणण्याची पाळी आली कीं, " या प्रमुख धंद्यांची पूर्ववत् परिस्थिति येऊं शकेल याची आम्हांस खात्री देतां येत नाहीं. " (" The ominous nature of the situation becomes more evident when it is known that this admittedly permanent decline affects particularly the key industries, namely coal, iron and steel, cotton and ship-building, "and these industries supply more than half of British export trade. ... We cannot be sure that our staple industries will receive to their old dimensions... ....., These staple industries were the chief contributors to our export trade, and their expansion in the last century was the basis of our nationl development as a foreign-trading and foreign-investing nation " —Report of the Liberal Industrial Enquiry Committee.)

साहजिकच या धंद्यांच्या उताराचा परिणाम ब्रिटिश निर्यात व्यापारावर व्हावा यांत नवल नाहीं. माहींतरी भांडवलाची निर्यात, निर्यात व्यापारामधूनच

होणार ना ? त्यालाच उतरती कळा लागल्याकारणानें ब्रिटिश भांडवलदारांचें भांडवल निर्यात करण्याचें सामर्थ्यहि कमी कमी होऊं लागलें. या कमजोरीची खरी कल्पना १८८० ते १९१३ व १९१८ ते १९३७ या दोन कालखंडांत ब्रिटिश भांडवल स्वदेशीं किती गुंतलें व परदेशी किती पाठवलें या दोन प्रमाणांकडे पाहिल्यास येऊं शकेल. पहिल्या कालांत परदेशी भांडवलाची निर्यात ८० कोटि पौंडांपासून ३५० कोटि पौंडांपर्यंत होती आणि एकट्या १९१२ सालीं स्वदेशीं गुंतविलेल्या भांडवलाशीं निर्यात भांडवलाचें प्रमाण ८८ टक्के होतें. आणि गेल्या युद्धानंतर ? १९२४ सालीं हें प्रमाण ६२ टक्क्यांपर्यंत गेलें आणि १९२७ मध्यें तें अवघें ३१ टक्के होतें. साम्राज्याचा आर्थिक पाया कसा घसरत जात होता याची याहीपेक्षां भडक कल्पना पुढील पानावरील कोष्टक आपणास देऊं शकेल.

याचा अर्थ काय होतो ? तें कोष्टक असें स्पष्ट सांगतें कीं 'परदेशी भांडवल गुंतवणारें' राष्ट्र म्हणून जी ब्रिटिश साम्राज्याची ख्याति झाली त्याचीच कधींहि भरून न येण्यासारखी घसरण सुरू झालेली आहे.

पण विघटनाची क्रिया एवढ्यावरच विराम पावलेली नाहीं. परदेशी भांडवलाची निर्यात तर कमी प्रमाणावर होऊं लागलीच. पण तें कोष्टक असेंहि दाखवितें कीं, १९१८ नंतर ब्रिटिश भांडवलदारांना जें कांहीं भांडवल हातांत गोळा होईल त्यापैकीं फार मोठा भाग महत्त्वाचे धंदे टिकविण्यासाठीं घरींच गुंतवावा लागत असे. अर्थात् परदेशांतलि भांडवलावर येणारा नफा कमी प्रमाणात येऊं लागणार हा त्याचा एक सरळ परिणाम होता. त्याचबरोबर आपण असेंहि पाहिलें कीं, इंग्लंडचा आयात व्यापार निर्यातीपेक्षां अधिक असे. गेल्या युद्धापूर्वी ही तफावत साम्राज्याचें वैभव दाखवीत होती. १९१८ नंतर ही तफावत १५० टक्क्यांनीं वाढली. पण त्याच प्रमाणांत परदेशीं गुंतविलेल्या भांडवलावरील नफा वाढणें शक्य नव्हतें. म्हणजे साम्राज्याच्या अदृश्य उत्पन्नाला एकीकडे कात्री बसत असतांना देणें कमी न होतां वाढतच गेलें. आणि मग आपणास असें दिसेल कीं, या पेंचप्रसंगांतून सुटण्यासाठीं परदेशांतील भांडवल विकण्याचा ब्रिटिश भांडवलदारांवर प्रसंग आला. ज्या सावकारीला मुदलावर जगण्याची पाळी येते ती उतारास लागली हें सांगावयासच हवें काय ?

(आंकडे दशलक्ष पौंडांचे)

| वर्ष | १९१३ | १९२४ | १९२७ | १९२९ | १९३० | १९३१ |
|---|---|---|---|---|---|---|
| एकंदर भांडवल (Total issues) | २४५·५ | ४७५ | ४५०·८ | २५३·७५ | २३६·१६ | ८८·६७ |
| घरीं गुंतवलेलें | ४९·७ | ३५० | ३१४·६ | १५९·४० | १२७·३५ | ४२·५९ |
| परदेशी रवाना | १९५·५ | १२५ | १३२·२ | ९४·३४ | १०८·८१ | ४६·०८ |

| वर्ष | १९३२ | १९३३ | १९३४ | १९३५ | १९३६ | १९३७ |
|---|---|---|---|---|---|---|
| एकंदर भांडवल | ११३·०४ | १३२·८७ | १५०·१९ | १८२·८२ | २१७·२२ | १७०·९७ |
| घरीं गुंतवलेलें | ८२·८२ | ९५·०६ | १०६·७४ | १६१·९३ | १९०·८१ | १३८·७७ |
| परदेशीं रवाना | २९·२२ | ३७·८१ | ४३·४५ | २०·८९ | २६·४१ | ३२·२० |

ब्रिटिश भांडवलशाहीचें उत्पादन-यंत्रच अशा रीतीनें आंतून दुबळें होत चालल्यानंतर साम्राज्याला जगाच्या बाजारपेठेंत शह बसावा इतकेंच नव्हे तर साम्राज्याच्या राखीव कुरणांतहि जपान व अमेरिका यांची स्पर्धा वाढत्या प्रमाणांत जाणवावी यामध्यें आश्चर्यकारक असें कांहींच नाहीं. ईस्ट इंडिया कंपनीनें या देशांत पाय रोंवल्यापासून भरभराट पावणारें साम्राज्यवादी इंग्लंड आणि त्याचें वैभव यांचा पाया गेल्याच महायुद्धानें खिळखिळा केला यांत शंका नाहीं. सबंध जगाच्या व्यापाराचें, कर्जउभारणीचें, देवाण-घेवाणीचें केंद्र म्हणून गाजलेल्या लंडन शहराचें वैभव न्यूयॉर्ककडे जाऊं लागलें; ब्रिटिशांचें साम्राज्य त्यांच्या आरमारी वर्चस्वावर आहे असें पाहून गेल्या महायुद्धानंतर अमेरिकेनें त्याहीपेक्षां वरचढ आरमार बांधण्याचा उद्योग आरंभिला, त्याची तिडीक पोटांत येऊन त्या वेळचे पंतप्रधान लॉईड जॉर्ज यांनीं इंग्लंड आपलें आरमारी वर्चस्व कायम राखण्यासाठीं शेवटची गिनी देखील खर्च करण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं अशी वल्गना केली.* तरी आरमारी वर्चस्वाच्या कल्पनेला अखेर तिलांजलि देऊन दोघांचेंहि आरमार तुल्यबल असावें यावर हा वाद इंग्लंडला मिटविणें भाग पडलें या सर्व घटना निःसंशय साम्राज्याची कमजोरीच दाखवतात. या कमजोरी-मुळेंच गेल्या युद्धानंतर हिंदुस्थानच्या बाजारपेठेवर जपानी मालाचें आक्रमण होऊं लागलें आणि ब्रिटिश वसाहतींना अमेरिकेचें नवें आकर्षण सुरू झालें. ब्रिटिश वसाहतींच्या बाबत तर अमेरिकेनें अमेरिका-खंडांत जसें एक 'मन्रो तत्त्व' लागू करण्यांत आलें त्याच-प्रमाणें पॅसिफिक महासागरांतील प्रदेशालाहि त्याच धर्तीचें तत्त्व लागू करण्यांत यावें, ब्रिटिश वसाहतींशीं यापुढें लंडनला न विचारतां स्वतंत्र आर्थिक व्यवहार व राजनैतिक संबंध सुरू करावेत अशा आशयाच्या घोषणा केल्या हें जगजाहीर आहे. आणि अमेरिकेनें ही एकांगी घोषणा केलेली नव्हती असेंहि आपणास दिसेल. वसाहतीचे त्या वेळचे स्मटसारखे जबाबदार

* "Great Britain would spend her last guinea to keep her navy superior to that of the United States or any other Power." –Lloyd George 's statement to Colonel House quoted in the Intimate Papers of Colonel House, vol. IV, Page 186.

अधिकारी देखील वसाहतींचे हितसंबंध लागेबांधे आणि भवितव्य इंग्लंड-पेक्षां अमेरिकेवरच अवलंबून आहेत असें इंग्लंडला बजावीत होते. (" The Dominions have even stronger affiliation towards the U. S. A. than Great Britain has. There is a community of outlook, of interests and perhaps of ultimate destiny between the Dominions and the U. S. A. " —Smut's speech to the Royal Institute of International Affairs, 1934 ) अर्थात् या नवीन घडामोडीमुळें ब्रिटिश साम्राज्याचें धाबें साहजिकच दणाणलें. पण उपयोग काय ? तुम्हांला जर अतिरिक्त भांडवलाची निर्यात करतां येत नाहीं तर तसें स्पष्ट सांगा ना * असा रोखठोक सवाल १९२६ सालीं ऑस्ट्रेलियाचे प्रधानमंत्री मि. ब्रूस यांनीं विचारला होता त्यावरून ब्रिटिश साम्राज्याच्या विघटनेच्या क्रियेवर अधिकच प्रकाश पडतो.

## साम्राज्यविघटनाची जाणीव

तेव्हां साम्राज्याच्या विघटनेच्या घटनेला प्रारंभ गेल्या महायुद्धानंतर झाला व या महायुद्धानें ती घटना पूर्ण केली असें म्हणण्यास कोणतीच हरकत नाहीं. यापुढें लॉर्ड किप्लिंगनें वर्णिलेले साम्राज्यवैभवाचे दिवस पुनः उगवणार नाहींत असें स्पष्ट दिसतें. चर्चिल कांहींही म्हणो, अटलांटिक सनद हिंदुस्थानला लागू करण्याचा त्याचा इरादा असो वा नसो, परिस्थिति–युद्धजन्य परिस्थिति–ब्रिटिश साम्राज्याच्या आर्थिक विघटनेकडे आपलें लक्ष वेधूं इच्छित आहे. आणि साम्राज्यवादी मुत्सद्यांना या विघटनेची जाणीव नाहीं हें विधानहि धाष्टर्याचें ठरेल. अलीकडे साम्राज्यवादी गोटांत या घट-नेच्या ज्या प्रतिक्रिया उमटत आहेत त्यांवरून जी. डी. एच. कोल यांनीं " महायुद्धाचा शेवट कसाहि झाला तरी युद्धपूर्व ब्रिटिश साम्राज्य ज्या स्वरूपांत होतें त्या स्वरूपांत तें साम्राज्य फिरून कधींहि जिवंत होणार नाहीं " अशा स्वरूपाचा दिलेला इषारा त्यांनाहि जाणवूं लागला असें स्पष्ट दिसतें.

* " If during the next few years it is feared that British surplus capital is not sufficient for a lending policy on the same scale as in the past, let this fact be freely and frankly addmitted."

—S. M. Bruce, The Times, Nov. 17, 1926.

( " What is certain is that, as the metropolis of the great Imperial Power, ruling over subjects many times as numerous as its own, Great Britain is finished. The British Empire, in the form which it had before the war, will never be restored, however the war may end " —Great Britain in the Post-War World, by G D, H. Cole, Page 159 ) आपण आपलें लक्ष वृत्तपत्रीय हंगामी वातावरणांतून जरा बाजूला काढलें आणि या महत्त्वाच्या घटनांकडे बारकाईनें पहाण्यास सुरुवात केली तर या विघटनेविषयीं किती तरी पुरावा आपल्या नजरेसमोर येऊं शकेल. इंग्लंडमधील व्यापाराची जी प्रातिनिधिक संस्था 'असोसिएशन ऑफ ब्रिटिश चेंबर्स ऑफ कॉमर्स' तिनें १९४२ च्या मे महिन्यांत युद्धोत्तर पुनर्घटनाविषयक जो अहवाल प्रसिद्ध केला तो काय सांगतो याचा आपण विचार करा. त्या अहवालांत हें स्पष्ट नमूद केलें आहे कीं युद्धानंतर ग्रेट-ब्रिटन धनको राष्ट्र म्हणून उदयाला येणार नाहीं; परिस्थितींत बदल होईल * आणि त्याशिवाय स्पर्धेचें क्षेत्र वाढेल. यासाठीं जागतिक व्यापाराचें आयात व निर्यात–स्वरूपच बदलावयास हवें.

## अमेरीचें वक्तव्य

इंग्लंडमधील भांडवलदारांच्या प्रातिनिधिक संस्थेची साक्ष पाहिल्यानंतर सध्यांचे भारतमंत्रि मि. अमेरी यांनीं 'इन्स्टिटयूट ऑफ एक्सपोर्ट' या संस्थेपुढें १९४३ च्या जुलै महिन्यांत 'हिंदुस्थानशीं युद्धोत्तर व्यापार' या विषयावर केलेल्या भाषणांत जे उद्गार काढले आहेत त्यावरून विघटनेची जाणीव साम्राज्यवादी मुत्सद्यांनाहि होत चालली आहे असें दिसून येईल. अमेरी हे हिंदी राजकारणांत पहिल्या प्रतीचे शत्रू गणले जातात.

*" After the war, Great Britain will not occupy the creditor position which she formerly enjoyed. The situation will be very much changed, and in addition to this country will have to face the competition of expanded, and in some cases newly created industries in the Dominions, India, and elsewhere ........ in countries which have hitherto been mainly agricultural and / or producers of raw materials " Report on post-war problems of Industrial Reconstruction; The Association of British Chambers of Commerce, May 6, 1942.

पण अर्थशास्त्रीय विचारांत भावना आणूं दिली नाहीं तर त्यांनीं केलेल्या वक्तव्यानें सद्यःस्थितीवर विदारक प्रकाश पडूं शकेल. त्या भाषणांत प्रथमच त्यांनीं निर्यात व्यापाराचें परिमाण ( Volume ) वाढणें याला महत्त्व नसून आयात व निर्यात व्यापार कोणत्या प्रकारच्या मालावर आधारलेला आहे याला अधिक महत्त्व दिलें पाहिजे असें ब्रिटिश भांडवलदारांना बजावलेलें आहे. त्यापुढें जाऊन ते असें म्हणतात कीं, उद्यांच्या जगांत ब्रिटिश साम्राज्यांतील व बाहेरचे पुष्कळ देश जो माल आयात होत असे त्यापैकीं पुष्कळ प्रकारच्या मालाची पैदास स्वतःच्या देशांत करण्याचें धोरण स्वीकारतील असा रंग दिसतो. जर आपण ही बदललेली परिस्थिति ओळखली तर आपणांस त्यापासून कांहीं धोका नाहीं असें सांगून हिंदुस्थानविषयक परिस्थितीसंबंधीं त्यांनीं ब्रिटिश कारखानदारांना बऱ्याच महत्त्वाच्या सूचना दिलेल्या आहेत. पैकीं पहिली गोष्ट अशी कीं उद्यांच्या भारतांत जनतेचें रहाणीचें मान वाढविण्याच्या दृष्टीनें औद्योगिक वाढ व्हावी ही हिंदी मनाची स्वाभाविक आकांक्षा रहाणार. त्या औद्योगिक विकासानें हिंदुस्थानच्या आयात व्यापाराचें स्वरूप बदलणार हेंहि तितकेंच निश्चित. पण ब्रिटिश कारखानदारांनीं यामुळें निराश न होतां ही परिस्थिति ओळखावी आणि युद्धोत्तर हिंदुस्थानला पक्का माल पुरविण्याऐवजीं औद्योगिक वाढीसाठीं जी यंत्रसामग्री लागेल ती प्रारंभींच्या अवस्थेंत पुरविण्यास सिद्ध व्हावें. लगतच्या भविष्यकाळांत या प्रकारचा निर्यात व्यापार करून हिंदुस्थानची औद्योगिक वाढ झाली कीं, आपला व्यापार संपेल अशीहि भीति बाळगण्याचें कारण नाहीं. कारण, औद्योगिक वाढ झाली तरी कांहीं विशिष्ट प्रकारचा माल तयार करण्याचें कौशल्य आपणांत आहे हें लक्षांत घेऊन त्या मालाची निर्यात त्या औद्योगिक हिंदुस्थानमध्यें आपणांस करतां येईल. अशा रीतीनें बदलत्या परिस्थितीप्रमाणें आपण बदलण्याची गरज आहे असें सांगून अखेर अमेरीसाहेब ब्रिटिश भांडवलदारांना एक महत्त्वाचा इषारा देतात कीं, ब्रिटिशांचा व्यापार किंवा ब्रिटिशांचें भांडवल याचें एक राखीव कुरण म्हणून हिंदी बाजारपेठेकडे पहाण्याची दृष्टि टाकून देण्याची आज वेळ आलेली आहे. जर उद्यांच्या हिंदुस्थानशीं ब्रिटिश कारखानदारांना आपला व्यापार टिकवावयाचा असेल तर यापुढें हिंदुस्थान सरकार-

च्या धोरणावर ब्रिटिश सरकारचें नियंत्रण ठेवून तो टिकवितां येणार नाहीं. ती आशा सोडून द्या आणि अंगच्या कसबावरच, सहकार्याच्या भावनेनें यापुढें व्यापाराची आशा धरा. *

## उद्यांचें इंग्लंड कसें दिसेल ?

साम्राज्याचा आर्थिक पाया ढांसळला, ब्रिटिश साम्राज्याला पूर्वीच्या जित वा जेते या संबंधावर जगतां येणार नाहीं याचा यापेक्षां अधिक पुरावा देण्याची गरज नाहीं. आर्थिक विघटनाची ही क्रिया यापुढें किंवा उद्यां युद्ध संपल्यानंतर नक्की कोणतें रूप धारण करील याविषयीं स्पष्ट कल्पना आतां करतां येणार नाहीं. तथापि महत्त्वाची घटना म्हणजे साम्राज्यविघटनेची दिशा. त्या घटनेचा विचार जमेस धरून युद्धोत्तर हिंदुस्थानच्या भवितव्याचा विचार सुरू होण्याची आज निकडीची गरज आहे. साम्राज्याच्या या विघटनेबरोबरच इंग्लंडच्या अंतर्गत सामाजिक जीवनांत युद्धानें घडवून आणलेल्या फरकाकडेहि आपण लक्ष दिलें पाहिजे. साम्राज्याचें विघटन ही ब्रिटिश समाजांतील एक बाजू झाली. पण साम्राज्य गेलें म्हणजे पुढें इंग्लंडचें भवितव्य

---

* अमेरी साहेबांच्या भाषणांतील महत्त्वाचा उतारा :—

"In either case, our success will correspond directly to the extent to which our trade policy is one of wholehearted cooperation with India's effort to raise herself on a higher plane of economic efficiency. With that wholehearted spirit of cooperation, there must also go equally whole-hearted jettisoning of any lingering survival of the idea that India is, in any sense, a reserved market for British trade or British capital. It is essential for a fresh hopeful start in the economic relation between this country and India, that there should be no vestige of the idea that in the last resort the Government of India's economic policy is answerable to control by the Government of United Kingdom, or that British firms or British goods have behind them any other backing than that which they would receive from their Government in any other country. It is by their own merit that they must stand or fall."

—Mr. L. S. Amery, Address to the Institute of Export, Times of India, July 19, 1943.

काय हा प्रश्न शिल्लक रहातोच. तोच प्रश्न ‘ उद्यांचें इंग्लंड कसें दिसेल ? ’ या स्वरूपांत प्रथमच उपस्थित केला आणि आतां त्याचा विचार करण्यास हरकत नाहीं. ब्रिटिश साम्राज्याची वाढ इंग्लंडच्या औद्योगिक वाढीवरच झालेली होती. भांडवलदार अर्थव्यवस्थेमधून जी औद्योगिक वाढ होते तिचा नैसर्गिक विकास साम्राज्यांत होत असतो हेंहि आपण मागें पाहिलें. उद्यां साम्राज्याचें आर्थिक बळ नष्ट झालें कीं ही औद्योगिक वाढ थांबेल काय हा प्रश्न इंग्लंडसमोर उभा राहील असें स्पष्ट दिसतें; आणि या प्रश्नाचा विचार करतांना भांडवलदार अर्थव्यवस्था व औद्योगिक विकास या दोन गोष्टी वेगळ्या केल्या पाहिजेत. गत इतिहासांत भांडवलदार वर्गानेंच सुधारलेल्या देशांत उत्पादनाचीं प्रभावी साधनें आणून औद्योगिक वाढ केली असली तरी तीं साधनें व त्यामुळें झालेली वाढ हीं आतां भांडवलदार वर्गाच्या मालकीचीं राहिलीं नाहींत; तीं सर्व समाजाच्या मालकीचीं झालीं आहेत. यासाठीं साम्राज्याच्या आर्थिक विघटनानंतर उद्यांच्या इंग्लंडपुढें भांडवलदार अर्थव्यवस्थेचें कवच फोडून वेगळ्या तत्त्वावर, झालेला आर्थिक विकास टिकवून धरण्याची गरज निर्माण होणार असें स्पष्ट दिसतें. याला समाजवाद म्हणा अथवा न म्हणा, पण इतकी गोष्ट निश्चित कीं, साम्राज्याचें पाठबळ गेल्यानंतर, गेले चारशें वर्षें जतन केलेलें औद्योगिक यंत्र नष्ट करून मध्ययुगीन अंधकारांत जाण्याची ब्रिटिश समाजाची तयारी नसेल तर भांडवलदार अर्थव्यवस्थेचा टाकाऊ मार्ग त्या समाजानें टाकून दिला पाहिजे.

हेंच स्थित्यंतर दुसऱ्या भाषेंत मांडावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं इंग्लंड हें एक राष्ट्र असलें तरी डिझरायलीनें म्हटल्याप्रमाणें त्या एकाच राष्ट्रांत जीं दोन राष्ट्रें शेजारीं शेजारीं नांदत होतीं त्यांपैकीं सम्राटाचें, भांडवलदारांचें राष्ट्र संपलें आणि उद्यां सामान्य जनतेचें राष्ट्र पुढें सरसावणार अशीं चिन्हें दिसतात; नव्हे आजच चालू युद्ध त्या दिशेनें इंग्लंडला पुढें रेटीत आहे. व्हर्नान बार्टलेटनें म्हटल्याप्रमाणें आजच इंग्लंडमध्यें ३ लाख पौंड वार्षिक उत्पन्न असलेल्या वतनदारांची संख्या सात हजारांपासून ऐंशी पर्यंत घसरली आहे. डोरोथी थॉम्सननें इषारा दिल्याप्रमाणें फ्रान्सच्या पराभवाबरोबर नाझींशीं नमतें घेणाऱ्या चेंबरलेनच्या इंग्लंडचा पराभव झालेला आहे. शॉनें आपल्या मार्मिक विनोदी भाषेंत वर्णिल्याप्रमाणें आजच्या इंग्लंडमध्यें “भूक

असलेल्या पण अन्न नसलेल्या लोकांची भूक नसलेल्या पण अन्न असलेल्या सज्जनांशीं गांठ पडली आहे." (" Every one is fed now, for the people who have appetite but no dinners have met the people who have dinners but no appetite " G. B Shaw) 'वुइकली कॉमेंटरी' मध्यें प्रसिद्ध झालेल्या माहितीप्रमाणें इन्कमटॅक्स व सरटक्स मोठ्या उत्पन्नाचा ९४ टक्के भाग हिरावून घेत असून कंपन्यांना होणाऱ्या नफ्यावर शंभर टक्के 'एक्सेस प्रॉफिट टॅक्स' बसला आहे. सामाजिक क्रांति ही ठराविक साच्याची नसेल—आणि तशी ती नाहीं—आणि रक्तपात हेंच तिचें प्रमुख अंग नसेल (रक्तपातावरच क्रांतीचें मोजमाप घेणाऱ्यांनींहि महायुद्धांतील रक्तपात दहा क्रांत्यांना पुरेसा आहे हें लक्षांत ठेवावें) तर या महायुद्धानें ब्रिटिश समाजांत एका क्रांतीला प्रारंभ केला आहे असें कबूल करणें भाग आहे. तेव्हां उद्यांचें इंग्लंड कसें दिसेल या प्रश्नाचें उत्तर उद्यांचें इंग्लंड भांडवलदार अर्थव्यवस्थेच्या चाकोरींतून बाहेर पडलेलें दिसेल इतकें तरी हमखास देतां येईल.

इंग्लंडमधील, सामान्य जनतेच्या इंग्लंडला वर आणणारी सामाजिक क्रांति घडवून आणण्याचें सर्व श्रेय चालू युद्धाला दिलें पाहिजे. चालू महायुद्धाचे हेतू काय आहेत याविषयीं आपल्या देशांत इतका कीस पडला आहे कीं त्याविषयीं अधिक न बोलणेंच बरें. त्याचबरोबर ज्यापक्षीं अटलांटिक सनद हिंदुस्थानला लागू केली नाहीं त्यापक्षीं हें युद्ध साम्राज्याच्या लालसेनेंच चालू आहे असाहि विचाराचा सूर उमटतांना ऐकूं येतो. स्टालिन, रूझवेल्ट, चर्चिल, अमेरी हे सर्व एका माळेचे मणी आहेत असाहि निर्वाळा दिला जातो. पण युद्धहेतूविषयीं विचार करतांना एक साधी गोष्ट विसरली जाते आणि ती म्हणजे या युद्धाचा हेतु नाझी लष्कराचा पराभव हा आहे. अधिक खोलवर विचार केल्यास ही साधी गोष्टच इतकी महत्त्वाची आहे कीं त्यायोगेंच उद्यांच्या जगाचा रंग पालटण्याचीं चिन्हें दिसूं लागतील. नाझीवादाचा नाश हा एकच निर्विवाद हेतु सिद्धीस जाण्यासाठीं एका लोकसत्तावादी क्रांतीच्या दिव्यांतून इंग्लंड व युरोपखंड यांना हें महायुद्ध नेत आहे, याविषयीं जगांतील विचारवंतांचें एकमत दिसतें. डॉ. ज्यूलियन हक्स्ले म्हणतो, " लोकसत्ताक क्रांतीचा एक भाग म्हणूनच ही लढाई खेळली

पाहिजे आणि युद्धोत्तर पुनर्घटनेचा कार्यक्रम अमलांत आला पाहिजे."* नाझीवाद, नाझी लष्कर व नाझींच्या पायदळीं तुडविल्या जाणाऱ्या युरोपची मुक्तता हीं ध्येयें भाडोत्री लष्कराच्या साहाय्यानें साध्य होण्यासारखीं नाहींत याची तीव्र जाणीव इंग्लंडला डंकर्कच्या पराभवानंतर झाली. त्या जाणिवेंतून याहि गोष्टीचा साक्षात्कार झाला कीं सामान्य नागरिक व सैनिक यांमध्यें असलेला भेद या युद्धानें नष्ट केला आहे. चालू युद्धांत लढणाऱ्या ज्या दोन बाजू आहेत त्यांमध्यें केवळ अपरंपार शस्त्रसामग्रीच कामास येत नसून आक्रमक राष्ट्रवाद व लोकसत्ताक क्रांति हीं दोन तत्त्वज्ञानें परस्परांशीं टक्कर देत आहेत. प्रत्यक्ष रणांगणावर रक्ताचा सडा शिंपडणारा सैनिकच या तत्त्वानें भारला जाऊन काम भागत नाहीं; तर कारखान्यांतील मजूर, गोदीवरील हमाल, दुकानावरील नोकर, कचेरींतील कारकून, हॉटेलमधलि छोकऱ्या, घरांतलि मोलकरीण, पोस्टांतलि शिपाई इत्यादि विविध औद्योगिक क्षेत्रांत काम करणाऱ्या नागरिकांनाहि एका ध्येयाची ऊब निर्माण झाल्याशिवाय हें युद्ध जिंकणें अशक्य होय, आणि तो ध्येयवाद निर्माण करण्यासाठीं आजच महायुद्ध खाजगी मालकी व नफा या तत्त्वावर प्रचंड प्रमाणावर आक्रमण करीत आहे. भांडवलशाहीवर हें आक्रमण चालू आहे म्हणूनच सामान्य नागरिक, घरें भस्मसात झालीं, अन्न कमी मिळालें तरी युद्धांत सामील, नव्हे स्वेच्छेनें सामील झालेला दिसतो. उद्यां युद्ध संपल्यावर हें आक्रमण नष्ट होऊन पूर्ववत् भांडवलशाही प्रस्थापित होऊं शकेल काय ? या प्रश्नाचें उत्तर इंग्लंडमध्यें सर्वत्र संचार करणाऱ्या जे. बी. प्रीस्ट्लेसारख्या प्रचारकाच्या भाषेंतच दिलेलें बरें. तो म्हणतो कीं, " हुकुमशहा किंवा जनता या दोहोंपैकीं एकाचीच ही लढाई असली पाहिजे. या लढाईच्या अपरिहार्य दडपणामुळेंच इंग्लंडमधील

---

* " The war cannot successfuly be fought, nor the peace susccessfuly won, except on a platform of values of which Atlantic Charter is a partial expression, This is, if you like. only other way of saying that the war must be fought and reconstruction planned and executed, as **part of democratic revolution**. The realisation of this has been much sharpened by the war. " Dr.- Jullian Huxley's essay in the " When Hostilities Cease ", Page 27.

वर्गभेद साफ होत चालले असून एका ध्येयाच्या परिभाषेंत आम्हांस विचार करणें भाग पडत आहे. "* कदाचित् उद्यांच्या इंग्लंडमधील या परिवर्तनाला 'समाजवाद' असें नांव मिळणार नाहीं. पण आजपर्यंत जगानें महापुरुषांना त्यांचीं तत्त्वें स्वीकारल्याचें कधीं श्रेय दिलें आहे ?

## परिस्थिति व मानवी कर्तृत्व

ब्रिटिश साम्राज्याचें आर्थिक विघटन व इंग्लंडचें महायुद्धानें होत चाललेलें परिवर्तन या दोन महत्त्वाच्या घटनांकडे लक्ष दिलें तर दोनहि योजनांमध्यें गृहीत धरलेला राजकीय सत्तेचा प्रश्न हवेंत अधांत्री लोंबत नाहीं असें दिसून येईल. असें म्हटलें तर सध्यां तें एक राजकीय पाखंड ठरेल पण तें आग्रहानें या ठिकाणीं म्हणावयास हवें कीं, हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर राज्यसत्ता येऊन ठेपली आहे. युद्धजन्य परिस्थितीनें यापेक्षां आपणांस आणखी कोणती बहुमोल देणगी द्यावयास हवी ? लेनिननें एके ठिकाणीं म्हटलेलें आठवतें कीं जे कोणी शुद्ध स्वरूपाची क्रांति (Pure revolution) पहाण्याची इच्छा धरतील त्यांना ती कधींच पहावयास मिळणार नाहीं. तसेंच कांहींसें युद्धोत्तर हिंदुस्थानबाबत म्हटलें पाहिजे. राज्यसत्ता आमच्या दारावर थाप मारते आहे असें ऐकताक्षणींच आमचें सांप्रदायिक मन असें चित्र उभें करतें कीं, युद्ध संपतांक्षणींच ब्रिटिश पार्लमेंट, मंत्रिमंडळ, भारतमंत्री, या देशांतील बडा लाट, व त्याच्या हाताखालील नोकरशाही आपलें चंबूगवाळें आवरून दुसऱ्या दिवशींच्या बोटीनें विलायतेस रवाना होतील; त्या मनाचें समाधान करणें अशक्य आहे. पण आपण परिस्थितीनें अनुकूल भूमिका कशी बनत चालली आहे याची जी दिशा दाखविली त्या दिशेचा विचार केला तर या अनुकूल परिस्थितीचा आपल्या ध्येयसिद्धीसाठीं कसा उपयोग करावा याचेंहि ज्ञान आपणांस सहज होऊं शकेल. रशियन राज्यक्रांतीनें घालून दिलेलें वेळापत्रकच सर्व परतंत्र देशांत

* " ......... namely, that the inevitable pressure of total war which must mean either a dictator's war or peoples war, is rapidly ironing out-class distinctions and compelling us to think in terms of a common purpose." -- Rebirth of Britain, J. P. Priestley.

गिरवलें गेलें पाहिजे अशा प्रकारें क्रांतीचें अंधानुकरण करणाऱ्या दुराराध्यांना या परिस्थितीचा फायदा दिसणार नाहीं आणि दिसला तरी आवडणार नाहीं. पण क्रांतीला लागणाऱ्या दोन घटकांपैकीं—एक राज्यसत्तेची अंतर्गत कमजोरी व दुसरी जनतेची संघटना—एक घटक म्हणजे साम्राज्यसत्तेचें विघटन या महायुद्धानें पूर्णांशानें केलें आहे. यावरहि परिस्थितीचा फायदा घेणारें कर्तृत्व आपल्या अंगीं नसेल, ती कर्तृत्वशक्ति पैदा करण्यासाठीं आपली विचारशक्ति जागी नसेल तर उद्यांच्या जगांत ब्रिटिश साम्राज्य जाईल, पण दुसरें कोणतें तरी साम्राज्य स्वातंत्र्याच्या नांवाखालीं आमच्या बोकांडीं बसेल हा धोक्याचा लाल कंदील दाखविणें भाग पडतें आणि दुर्दैवानें तसें घडलेंच तर आमच्यासारखे कपाळकरंटे आम्हीच असें भावी इतिहासाचें शिक्का—मोर्तब आमच्यावर झाल्याविना रहाणार नाहीं.

## राजकीय ध्येयाची विधायक बाजू

इतक्या हताश मनोवृत्तीनें कळवळण्याचें कारण ब्रिटिश साम्राज्याच्या आर्थिक विघटनानें आमच्या राजकारणांतील मध्यवर्ति प्रश्न सोपा न होतां, अधिकच गुंतागुंतीचा झालेला आहे, या गोष्टीकडे सुशिक्षितांचें लक्ष वेधावें. हिंदुस्थान हा जगाचा एक अविभाज्य भाग आहे हें साधें सत्य लक्षांत घेतलें तर जगांतील महत्त्वाच्या घटनांचा या देशाच्या राजकारणावर, अर्थकारणावर व समाजकारणावर स्वाभाविकच परिणाम होणार. पण बदलत्या परिस्थितीनें नवे प्रश्न निर्माण होत असले तरी मनोवृत्ति किंवा विचार तितक्या वेगानें पालटत नाहींत आणि मग नवे प्रश्न व जुनी मनोवृत्ति यांमध्यें विरोध निर्माण होत जातो, विचार मागें पडतात आणि आचार परिणामकारक होत नाहीं. आजच काय स्थिति झाली आहे पहा. कल्पनेचें शेवटचें टोंक गांठून असें चित्र मनापुढें उभें केलें कीं उद्यां ब्रिटिश साम्राज्याचा मागमूसदेखील या देशांत उरला नाहीं, तर काय स्वराज्य आपोआप स्थापन होईल? साम्राज्याचा अभाव म्हणजे स्वराज्य असें समीकरण मांडतां येईल काय? आणि हे प्रश्न मनाशीं उभे केले कीं, आमच्या राजकीय ध्येयाची विधायक बाजू आपल्या मनासमोर उभी राहते. वास्तविक आपल्या हृदयांत जतन केलेल्या या राजकीय स्वातंत्र्याच्या ध्येयाला, जेव्हांपासून

हें राजकीय ध्येय उदित झालें, तेव्हांपासून विरोधी व विधायक अशा दोनाहि बाजू होत्या. कोणत्याहि सामाजिक वा राजकीय ध्येयाला त्या असतातच. केवळ अभावरूप स्वातंत्र्याची उपासना व निर्गुण ब्रह्माची वेदांत्याची कल्पना या एकाच पातळीवर आहेत. तसें ध्येय जनमनाची पक्कड घेऊं शकत नाहीं. जर या ठिकाणीं आणखी एक प्रश्न उपस्थित केला तर विधायक बाजू किती महत्त्वाची आहे याची साक्ष पटेल. कां हो, ब्रिटिश साम्राज्य तरी या देशांतून कां जावें ? आणि स्वातंत्र्य तरी आम्हांस कशाकरितां हवें ? हे ते प्रश्न. हे प्रश्न आमच्या राजकारणांत प्रथमपासून होते; आणि त्यांचीं समर्पक उत्तरें देण्याची आवश्यकता होती. उद्यां साम्राज्याचे विघटनानें हे प्रश्न तीव्रतेनें आपणासमोर उभे रहाणार आहेत. या प्रश्नाचें प्रामाणिक उत्तर द्यावयाचें तर तें असेंच द्यावयास नको का कीं, ब्रिटिशांचें साम्राज्य आम्हांस नको. कारण, त्या साम्राज्याच्या अस्तित्वानें आमच्या समाजाची सर्वांगीण प्रगति खुंटली आहे ? आणि तसें तें उत्तर आपण आपल्या मनांत दहादां घोळलें तर मग राजकीय ध्येयाच्या विधायक बाजूचाहि आपल्या मनाला साक्षात्कार व्हावा. राजकीय स्वातंत्र्याची आम्हांस हौस नाहीं, तर त्याची आम्हांस गरज आहे, नव्हे तांतडीची गरज आहे. कारण ज्या सामाजिक परिस्थितींत आज कित्येक शतकें जनता वावरते आहे ती आंतून इतकी सडलेली आहे कीं, सत्वर त्या परिस्थितींत क्रांति झाली नाहीं तर हिंदी समाजाला आधुनिक सुधारणेचें दुर्गंधी डबकें बनण्याची पाळी येईल. आपण असा विचार मनाशीं उभारा. मग तोच विचार आपणास असें स्पष्ट बजावील कीं राजकीय स्वातंत्र्य हें आमचें साध्य नसून 'सामाजिक पुनर्घटना' (social reconstruction) हें आमचें साध्य आहे आणि राजकीय स्वातंत्र्य हें त्या साध्याचें साधन आहे.

### चहाच्या पेल्यांतील वादळ

तेव्हां सुधारक व सनातनी यांमध्यें चहाच्या पेल्यांत जें वादळ माजलें होतें त्याला आतां पांचपन्नास वर्षें होऊन गेलीं तरी तें वादळ अद्यापि शांत झालेलें दिसत नाहीं; आणि सामाजिक पुनर्घटनेच्या प्रश्नाचा निकाल लागेपर्यंत हें वादळ शांत होण्याचीं चिन्हें आज तरी दिसत नाहींत. 'सामा-

जिक सुधारणा प्रथम कीं राजकीय सुधारणा प्रथम ' हा लो. टिळक व आगरकर यांमधील वाद जुना झाला असें वाटलें तरी त्यांतील मूळ प्रश्न अद्यापि कायमच आहे. सामाजिक सुधारणेचा आग्रह धरतांना ती जी आमची सनातन तक्रार कीं राजकीय स्वातंत्र्याशिवाय सर्व व्यर्थ होय त्या तक्रारींतील सत्य आगरकरांना माहीत नव्हतें असें आम्हांस वाटत नाहीं. वाद राजकीय स्वातंत्र्याच्या इष्टानिष्टतेबद्दल नव्हता; किंवा राजकीय स्वातंत्र्य आवश्यक कीं अनवश्यक असाहि नव्हता. वादाचें मूळ आजच्या सामाजिक रोगाच्या निदानाविषयीं होतें. सामाजिक सुधारणेवर कटाक्षानें भर देतांना आगरकरांना जें सांगावयाचें होतें तें हें कीं आमचें समजरूपी शरीर आंतून पोखरल्याकारणानें राजकीय पारतंत्र्याची आमच्यावर आपत्ति आलेली आहे. आणि याबाबत लोकमान्यांचा राजकीय आग्रह चूक होता असाच कौल द्यावयास हवा. ' घोडा बिघडतो कशानें, भाकरी करपते कशानें ' इ. दृष्टांताच्या आधारानें आमच्या सामाजिक दुःस्थितीचें सर्वस्वी खापर पारतंत्र्यावर फोडतांना टिळकांचें आग्रही राजकारण घोड्यापुढें गाडी जोडण्याचा प्रयत्न करीत होतें असें वाटतें. राजकीय स्वातंत्र्याची गरज मान्य करूनहि हें गत इतिहासाच्या परिशीलनावरून मान्य करण्यास कोणतीच अडचण नव्हती कीं इंग्रजी राजवट या देशांत स्थापन होण्याचें प्रमुख कारण आमचा विस्कळित समाज, संघटित राजसत्तेचा अभाव, आर्थिक विपन्नावस्था. तेव्हां राजकीय स्वातंत्र्याचा आग्रह धरतांना खरा प्रश्न दृष्टीआड होत आहे अशी सुधारकांची तक्रार होती. उद्यां इंग्रज बोटींतून विलायतेस रवाना झाले कीं, या देशांत सर्वत्र आलबेल होईल असें जें तुम्ही दर वेळेला भासवितां तें चूक आहे ही सुधारकांची लो. टिळकांच्या राजकारणावरील टीका रास्त होती. इंग्रजी राजवटीचा अस्त आणि हिंदी समाजाचा विकास यांमध्यें त्या वेळेच्या जहालांनीं न कळत जो कार्यकारणसंबंध मानला होता तसा तो नाहीं असें सुधारकांना सांगावयाचें होतें. आणि ही सुधारकाची सांगी किती रास्त होती याची चालू महायुद्धानें पुरेपूर साक्ष पटविली आहे. चालू युद्धांत असाहि एक आणीबाणीचा प्रसंग आला होता कीं या देशांत परचक्र दोनहि दरवाज्यांवर थाप मारीत होतें आणि त्या वेळीं ब्रिटिश राजवटीच्या अभावांतून

आपल्या समाजाच्या सर्वांगीण उन्नतीचें पिल्लू बाहेर निघालें असतें असें म्हणण्याचें धाडस कोणीहि करणें शक्य नाहीं.

राजकारणांतील तिरंगी सामना

वास्तविक राजकीय दास्यविमोचन या कल्पनेची 'दारिद्र्य-विमोचन' या कल्पनेशीं सांगड घातली गेली असती तर 'सामाजिक पुनर्घटना' व 'राज्यसत्ता' यांमधील साध्यसाधनाचें नातें मागेंच अधिक स्पष्ट झालें असतें. 'मला ९८ टक्के जनतेचें स्वराज्य हवें, केवळ गोरी नोकरशाही जाऊन काळी नोकरशाही आली तर काम भागणार नाहीं' हा देशबंधु दासांचा सावधगिरीचा इषारा आमच्या राजकीय विचारांत पक्का झाला असता तर हा पुनर्घटनेचा प्रश्नहि त्याबरोबरच पुढें आला असता. पण त्यासाठीं स्वातंत्र्य म्हणजे ब्रिटिश सत्तेपासून मुक्ति असा विचार टाकून स्वातंत्र्य म्हणजे भुकेच्या आगीपासून सुटका, दारिद्र्यापासून सुटका इतका त्या स्वातंत्र्याचा अर्थ विस्तारावयास हवा होता. 'दारिद्र्यविमोचन' हा राजकीय स्वातंत्र्याचा आत्मा होय या विचाराची पुसट जाणीव ज्या वेळीं या देशांत राजकीय चळवळीस प्रारंभ झाला त्या वेळच्या राजकीय धुरीणांच्या विचारांत होती असें दिसतें. पण दुर्दैवानें राजकारणाचें क्षेत्र ज्या प्रमाणांत रुंदावत गेलें त्याच प्रमाणांत या मुख्य प्रश्नाला बगल देण्यांत येऊन निर्भेळ स्वातंत्र्याची उपासना करण्याचा संप्रदाय वाढत गेला आणि त्याचें सारें श्रेय राष्ट्रवादाच्या घातक तत्त्वज्ञानाला दिलें पाहिजे. वास्तविक अखंड भारताच्या कल्पनेवर रणधुमाळी आजच्या घटकेला चालू असतां, राष्ट्रवादाचें तत्त्वज्ञान घातक आहे असें म्हणणें धाष्टर्यच ठरेल. तथापि, आमच्या राजकीय प्रगतीच्या मार्गांत राष्ट्रवाद ही एक अजस्र धोंड होऊन बसली असें मागच्या इतिहासावरून दिसत असेल तर तसें म्हणणें भाग आहे.

राष्ट्रवादाच्या तत्त्वज्ञानावर तुमचा इतका रोष कां या आक्षेपाला आमचें उत्तर असें कीं, आमच्या राजकारणांत जो सामना चालू होता त्याची विपर्यस्त कल्पना त्यानें फैलावली. राष्ट्रवादांतील मूलभूत कल्पना राष्ट्रीयत्वाची. त्या कल्पनेच्या प्रकाशांत स्वातंत्र्याचें स्वरूप कसें दिसेल असा घटकाभर विचार केला तर इंग्लंड हें राष्ट्र आमच्यावर राज्य करीत असून हिंदुस्थान

हें राष्ट्र त्याखालीं भरडलें जात आहे; आणि उद्यां स्वराज्य सरकार यावयाचें म्हणजे इंग्लंडचें आधिपत्य जाऊन हिंदी सरकार त्या ठिकाणीं यावयाचें असें आमच्या राजकारणाचें स्वरूप राष्ट्रवाद उभें करतो. पण हें वास्तवचित्र आहे काय ? चार कोट इंग्रज लोक आमचे राजे आणि आम्ही चाळीस कोट त्यांची प्रजा या बाजू खऱ्या नाहींत. आमच्यावर ब्रिटिश लोक राज्य करीत नसून ब्रिटिश साम्राज्य राज्य चालवीत आहे आणि ब्रिटिश साम्राज्य म्हणजे ब्रिटिश भांडवलदारांचें राज्य. पण राष्ट्रवाद हें मानावयास तयार नाहीं. तो आम्हांस असेंच आजपर्यंत सांगत आला कीं प्रत्येक इंग्रज हा आमचा सम्राट्. साम्राज्याच्या पद्धतीला विरोध करण्याची शिकवण न देतां त्यानें इंग्रज या गोऱ्या माणसाचा द्वेष करण्यास शिकवलें.

परिस्थितीच्या विपर्यासाची ही एक बाजू झाली. आतां हिंदुस्थानच्या बाजूनें पाहिलें तरी चाळीस कोट हिंदी लोक साम्राज्याच्या वरवंट्याखालीं भरडले जातात हें राष्ट्रवादाचें म्हणणें देखील वस्तुस्थितीस धरून नाहीं. ब्रिटिश साम्राज्याचा पाय या देशांत पक्का रोंवला गेला याचें खरें कारण त्यांच्या आर्थिक व्यवसायाला आपल्याच समाजांतील कांहीं वर्गांचा पाठिंबा होता. जमीनदार, संस्थानिक हे कोणत्या अर्थानें साम्राज्याकडून पिळले जातात? त्यांचीहि पिळणूक होते हें म्हणणें वस्तुस्थितीला धरून आहे काय? वास्तविक त्यांची पिळणूक होत नसून पिळणुकीचे ते भागीदार आहेत अशीच परिस्थिति नाहीं का? राष्ट्रवादाला या सर्व प्रश्नांचीं समर्पक व समाधानकारक उत्तरें देतां येत नाहींत. आणि याच कारणास्तव राष्ट्रवाद आमच्या आकांक्षांना मूर्त स्वरूप देण्यास असमर्थ आहे. त्या तत्त्वज्ञानानें निर्माण केलेलें राष्ट्रीय स्वातंत्र्याचें ध्येय फसवें आहे. त्या तत्त्वज्ञानानें साधनाला साध्य बनविलें, शत्रू व मित्र यांची गल्लत केली आणि ब्रिटिश भांडवलदार+हिंदी वरिष्ठ वर्ग व सामान्य जनता असा आमच्या राजकारणांतील तिरंगी सामना बगलेस टाकून त्यानें खोट्याच बाजू आमच्या नजरेसमोर आणल्या.

## राष्ट्रवाद घातकहि आहे

राष्ट्रवादाच्या तत्त्वज्ञानानें केवळ राजकीय ध्येय व कार्यक्रम यांबाबत

दिशाभूलच होत नाहीं, तर तो आजमितीला घातकहि ठरूं पहात आहे. कारण, ज्या सामाजिक पुनर्घटनेसाठीं आपणांस स्वातंत्र्य हवें त्या सामाजिक पुनर्घटनेच्या दृष्टीनें हिंदुस्थान या एकाच राष्ट्राचे दोन तुकडे पडतात. एक हिंदी वरिष्ठ वर्ग आणि दुसरा सामान्य श्रमजीवि जनता. एकाच राष्ट्रांतलि या दोन राष्ट्रांच्या आकांक्षा वेगळ्या, त्यांचीं ध्येयें निराळीं. पण दुर्दैवानें असें आजतागायत घडलें गेलें कीं, हिंदी भांडवलदारांचा ब्रिटिश राज्यकर्त्यांशीं असलेला विरोध आणि ब्रिटिश साम्राज्य व हिंदी जनता यांमधील आत्यंतिक विरोध यांची राष्ट्रवादानें एकत्र गल्लत केली. या दोन विरोधांमध्यें फरक आहे; आणि त्या फरकाचें स्पष्ट स्वरूप मांडल्याशिवाय राष्ट्रवादाचें घातक स्वरूपहि लक्षांत येणार नाहीं.

तसें पाहिलें तर हिंदी भांडवलदारांचें ब्रिटिश राज्यकर्त्यांशीं काय भांडण होतें ? हा एक साधा प्रश्न आमच्या राजकीय विचारांत कधीं निर्माण केला नाहीं आणि ज्या कोणी मांडण्याचा प्रयत्न केला त्यांना त्याचें सरळ उत्तर मिळालें नाहीं. पण त्या प्रश्नाच्या उत्तरावरच भांडवलदारांच्या राजकारणाचें स्वरूप उघडें पडणार होतें. हिंदी भांडवलशाहीच्या उण्यापुऱ्या पाऊणशें वर्षांच्या इतिहासांत 'आम्हांला हिंदी जनतेच्या पिळणुकींत भागीदारी कां दिली जात नाहीं' याच प्रश्नावर राज्यकर्त्यांशीं त्यांचा पहिला खटका उडाला आणि तें स्वाभाविकच होतें. आपण जर १८७४ ते १९१४ या चाळीस वर्षांतलि हिंदी आयात व निर्यात व्यापाराचा आढावा घेतला तर आपणांस असें स्पष्ट दिसेल कीं या चाळीस वर्षांत हिंदी श्रमजीवि जनतेच्या खिशांतून नाना तऱ्हेच्या वाटांनीं १४४४ कोटि रुपये गेले. हे पैसे कोणाच्या खिशांत गेले याचें उत्तर 'ब्रिटिश भांडवलदारांच्या खिशांत' असें द्यावें तर तें वस्तुस्थितीस धरून होणार नाहीं. कारण ब्रिटिश भांडवलदारांना हिंदुस्थानच्या बाजारपेठेंतून मिळणारा नफा या देशांतलि व्यापारामार्फतच जात होता. आणि हा व्यापार सुरळीत चालण्यासाठीं ज्या वरिष्ठ वर्गांना त्यांनीं हातांशीं धरलें त्यांचा हिस्साहि या १४४४ कोटि रुपयांत होता. तो हिस्सा कांहीं लहान सहान नव्हता. गेल्या युद्धापूर्वीं या देशाशीं ब्रिटिश व्यापार भरभराटीच्या काळांत असल्याकारणानें अडत्याचें काम करणाऱ्या या वरिष्ठांच्या खिशांत यापैकीं ६६५ कोटि रुपये गेले ही गोष्ट लक्षांत घेतल्यास

हिंदी जनतेच्या 'पिळणूक आणि कंपनींत' त्यांची भागीदारी देखील कांहीं कमी नव्हती असें म्हणावें लागतें*

भांडवलदार अर्थव्यवस्थेंत हातीं गोळा झालेल्या भांडवलाचें खरें कार्य उत्पादनाक्षेत्रांत असतें. हिंदी भांडवलदारांना त्या दृष्टीनें स्वाभाविकच

---

*सरकारच्या 'statistical abstract' वरून खालील कोष्टक तयार केलें आहे. या कोष्टकावरून हिंदी-भांडवलदार व ब्रिटिश सरकारच्या भागीदारीची कल्पना येईल. निर्यातीपेक्षां आयात अधिक असे. त्या तफावतीमध्यें ब्रिटिश साम्राज्याचा नफा 'सनदी नोकरांचा पगार', 'सरकारी साठे इ. बद्दल देणें', 'कर्जाचें व्याज' इ. विविध रूपानें घेतला जात असे आणि उरलेलें देणें सोनें चांदीच्या रूपानें या देशांत रवाना होई, त्यांची मालकी प्रामुख्यानें वरिष्ठ वर्गाकडे असे.

**आयात व निर्यातमधील येण्याची वांटणी**

( आंकडे दशलक्ष रुपयांचे )

| पंचवार्षिक सरासरी | | जादा निर्यात | सोनें चांदी रूपानें पाठविलेले | साम्राज्य सरकारचें देणें फेडण्यासाठीं |
|---|---|---|---|---|
| १८७४-७९ | ... | २५० | १०० | १५० |
| १८७९-१८८४ | ... | २०० | १२० | ८० |
| १८८४-१८८९ | ... | २७० | १३० | १४० |
| १८८९-१८९४ | ... | ३३० | १४० | १९० |
| १८९४-१८९९ | ... | ३३० | ८० | २५० |
| १८९९-१९०४ | ... | ३७० | १४० | २३० |
| १९०४-१९०९ | ... | ४१० | २२० | १९० |
| वार्षिक सरासरी | | | | |
| १९०९-१० | ... | ६६० | ३१० | ३५० |
| १९१०-११ | ... | ७६० | ३२० | ४४० |
| १९११-१२ | ... | ८४० | ४९० | ३५० |
| १९१२-१३ | ... | ८०० | ५१० | २९० |
| १९१३-१४ | ... | ५०० | ३७० | २१० |

आपलें भांडवल औद्योगिक क्षेत्रांत गुंतविण्याची महत्त्वाकांक्षा निर्माण झाली आणि नेमका याच ठिकाणीं त्यांचा राज्यकर्त्यांशीं विरोध आला. व्यापार व शेती या मार्गांशिवाय तुम्हांस दुसरा मार्ग आम्ही देणार नाहीं, कारण आमच्या पक्क्या मालाची मग वाट काय असें राज्यकर्त्यांचें म्हणणें होतें; तर हिंदी भांडवलदारांचा असा आग्रह होता कीं या देशांत आम्हीं जन्मलों, वाढलों त्या देशांतील संपत्तीवर आमचा हक्क कां नसावा ? हिंदी भांडवलदार व ब्रिटिश साम्राज्य यांमधील वादाचें हें मूळ आपण लक्षांत घेतलें तर या दोघांमधील विरोध अशा स्वरूपाचा नव्हता कीं ज्यामध्यें कधीं तडजोड होऊं शकली नसती. थोडक्यांत सांगावयाचें तर हें भांडण विकोपाचें नव्हतें. विकोपाचें भांडण, आत्यंतिक हितविरोध, जर कोणत्या दोन बाजूंमध्यें असेल तर त्या दोन बाजू म्हणजे ब्रिटिश भांडवलदार अधिक हिंदी वरिष्ठ वर्ग आणि सामान्य जनता याच होत. भांडवलशाहीची पिळणुकीची पद्धति नष्ट करणें किंवा आपल्या समाजाची आमूलाग्र पुनर्घटना करणें ही मागणी, महत्त्वाकांक्षा किंवा हें ध्येय हिंदी भांडवलदार व ब्रिटिश राज्यकर्ते यांमधील विरोधांतून कधींच निर्माण होणें शक्य नव्हतें. त्या ' ध्येयाचा जन्म जनता व साम्राज्य यांमधील आत्यंतिक व क्रांतिकारक विरोधाच्या पोटींच होणें शक्य होतें; वरिष्ठवर्गाचा विरोध समेटाच्या दिशेनें धांवत होता.

आपण जर दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळांतील हिंदी भांडवलदारांच्या अर्थकारणांकडे व राजकारणाकडे पाहूं लागलों तर त्यांच्या विरोधाचें पर्यवसान समेटांतच कां व्हावें याची सहज साक्ष पटूं शकेल. हिंदी भांडवलदारांना गेल्या महायुद्धापूर्वीं ज्या भागीदारीची महत्त्वाकांक्षा होती ती पूर्णांशानें नसली तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणावर ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं सफल केली असें गेल्या वीस पंचवीस वर्षांचा इतिहास सांगतो. अर्थात् ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या धोरणांतील हा बदल आपखुषीनें झालेला नव्हता, तर साम्राज्याची आर्थिक कमजोरीच त्याच्या बुडाशीं होती हें ब्रिटिश साम्राज्याच्या आर्थिक विघटनाचा जो आढावा आपण घेतला त्यावरून दिसून येईल. गेल्या महायुद्धानंतर हिंदुस्थानच्या बाजारपेठेंतून त्यांना अधिक नफा हवा होता, तो मिळण्यासाठीं त्यांजवळ भांडवल नव्हतें, तें भांडवल याच देशांत गोळा करण्याची त्यांना गरज भासूं लागली, तसें भांडवल गोळा

करावयाचें म्हटलें तर सामान्य जनतेच्या खिशांतून मिळतो यापेक्षां अधिक पैसा काढणें त्यांना भाग होतें, त्याचा स्वाभाविक परिणाम जनतेच्या असंतोषांत होऊन या देशांत राजकीय असंतोषाची वावटळ उठेल हा धोका त्यांना दिसत होता आणि तो धोका टाळण्यासाठीं त्यांना हिंदी भांडवलदारांना आपल्या बाजूला ओढणें आवश्यक होतें. ही सर्व कारण-परंपरा ओळखून साम्राज्याचे मोर्लेमिंटोसारखे जे दूरदर्शी मुत्सद्दी होते त्यांनीं हिंदी भांडवलदारांना छोट्या पातीदारीचें आमिष दाखविण्यास सुरुवात केली ही गोष्ट चिरपरिचयाची आहे. मोर्लेमिंटो सुधारणांचा जन्म, एका औद्योगिक कमिशनची नेमणूक, फिस्कल कमिशनची त्यापाठोपाठ पाठवणी, टॅरिफबोर्डाचा अवतार, लोखंड व पोलाद या धंद्यांना मिळालेलें संरक्षण व मदत इत्यादि विविध प्रकारांनीं साम्राज्याच्या कक्षेंत हिंदी भांडवलदारांना ओढण्याचा प्रयत्न ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं केला असें गेला इतिहास साक्ष देत आहे आणि तोच इतिहास अशी देखिल साक्ष देईल कीं, 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' या व्यावहारिक शहाणपणास धरून चाललेलें ब्रिटिशांचें नमतें धोरण व आपला वकूब यांचा मेळ घालून हिंदी भांडवलदारांनीं—निदानपक्षीं—हिंदी भांडवलदारांपैकीं बऱ्यांनीं तरी—या भागीदारींत भाग घेतला. सायमन कमिशनसारख्या क्वचित् प्रसंगीं त्यांचा राज्यकर्त्यांशीं खटका उडाला नाहीं असें नाहीं; पण कमिशनवर पडलेल्या सार्वजनिक बहिष्कारानंतरचा इतिहास अशीहि ग्वाही देईल कीं, राज्यकर्त्यांनीं 'इतकेंच, यापुढें नाहीं' ( Thus far and no further ) असा दमदाटीचा पवित्रा घेतांच बहिष्काराचें नाटक चालू असतांच पाठीमागच्या दरवाज्यानें हिंदी भांडवलदारांनीं सहकार्याचा हात पुढें केला होता.

सांगावयाचें असें कीं, प्रारंभापासून हिंदुस्थान या एकाच राष्ट्रांत दोन राष्ट्रें होतीं, दोघांचीं अर्थकारणें वेगळीं होतीं; दोघांचीं राजकारणें वेगळीं होतीं. भांडवलदारांचें समेटाचें राजकारण व जनतेचें क्रांतिकारक राजकारण यांमधील भेद गेल्या पंचवीस वर्षांच्या राजकारणांत प्रारंभापासून होता. जर आमच्या राजकीय ध्येयामध्यें सामाजिक पुनर्घटनेचा प्रश्न पुढें आला असता, तर हा भेद अधिक स्पष्ट झाला असता. 'सत्ता हातांत आल्याविना कसली पुनर्घटना करतां' या सोज्वळ

युक्तिवादाला उत्तरहि तितकेंच सोज्वळ आणि साधें आहे. आणि तें असें कीं, " कबूल, राज्यसत्ता हातांत असल्याशिवाय पुनर्घटना करतां येणार नाहीं. पण राज्यसत्ता तरी कोणाच्या हातांत आली पाहिजे याचा छडा लावण्यासाठीं पुनर्घटनेचा तपशील नसला तरी तत्त्वांची छाननी झालीच पाहिजे." राज्यसत्ता हातांत आल्याखेरीज सामाजिक पुनर्घटना करतां येणार नाहीं हें जितकें व्यावहारिक तितकेंच सामाजिक पुनर्घटनेचा आराखडा राजकीय स्वातंत्र्याचें स्वरूप निश्चित करतो हें म्हणणेंहि व्यावहारिक होतें. मग हा सामाजिक पुनर्घटनेचा प्रश्न पुढें कां आला नाहीं? राष्ट्रवादाच्या कल्पनेनें तो बाजूस सारला असेंच या प्रश्नाचें उत्तर द्यावें लागतें. वरिष्ठांचें समेटाचें राजकारण राष्ट्रवादानें दडविलें. 'जनतेचें राजकारण तेंच आमचें राजकारण, आम्ही तरी जनतेपासून वेगळे कुठें आहोंत, कसली पुनर्घटना घेऊन बसतां? प्रथम सत्ता तर परकीयांच्या हातांतून निसटूं द्या' ही जनमनाची दिशाभूल करणारी शिकवण वरिष्ठ वर्गाच्या पथ्यावर होती हें सांगावयास नकोच. उलटपक्षीं हिंदी भांडवलदारांना देखील आपलें समेटाचें राजकारण जनतेच्या पाठबळावरच पुढें रेटणें भाग होतें. कारण राज्यकर्ते मूठभर भांडवलदारांना जनतेचा पाठिंबा नसता तर तुम्ही कोण टिकोजी असें टोलावल्याशिवाय राहिले नसते. बरें, अशारीतीनें हवें असलेलें जनतेचें पाठबळ ' हें पहा. आम्हांला ब्रिटिश भांडवलदार तुमची जी पिळणूक करीत आहेत त्यांत भागीदारी पाहिजे ' असा नागडा स्वार्थ उघड करून मिळणें शक्य होतें काय? नाहीं, त्रिवार नाहीं हेंच त्याचें उत्तर आहे. हिंदी भांडवलदारांच्या समेटाच्या राजकारणाला जनतेची दिशाभूल करून जनतेचा पाठिंबा मिळविण्याचा एकच मार्ग होता आणि राष्ट्रवाद हा त्या मार्गावरील त्यांचा सारथी होता. यासाठीं राष्ट्रवाद केवळ फसवा आहे इतकेंच नसून तो घातकहि आहे असें फिरून म्हणावेंसें वाटतें. गेल्या पंचवीस वर्षांत हिंदी भांडवलदारांनीं या हत्याराचा दुहेरी उपयोग केलेला आहे. एका बाजूनें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या नांवाखालीं जनतेला चेतावणी देण्याचेंहि कार्य यानीं साधलें आणि दुसऱ्या बाजूनें जनतेच्या आंदोलनाकडे बोट दाखवून 'पहा, आमच्या सौम्य मागण्या मान्य करतां का या क्रांतिकारक वणव्यांत आपणास उडी घ्यावयाची आहे?'

असा राज्यकर्त्यांना दम भरून मिळेल त्या आर्थिक सवलती व राजकीय हक्क पदरांत पाडून घेण्याचा सपाटा चालविला.

## हिंदी भांडवलदारांचा कायापालट

हिंदी राजकारणांतील ज्या दोन वेगवेगळ्या भूमिका, भिन्न विरोध, वेगळीं अर्थकारणें व राजकारणें यांची होत असलेली गल्लत मुंबई–योजना व जनता–योजना यांनीं थांबवली हेंच त्या योजनांचें खरें महत्त्व आहे. राजकीय सत्तेच्या प्रश्नावर प्रकाश पाडणें, भावी स्वराज्य सरकार कोणत्या प्रकारचें असावें याची स्पष्ट कल्पना येणें हें देखील राज्यसत्ता मिळविण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें कार्य ठरतें. राजकीय आचार परिणामकारक व्हावयाचा असेल तर विचार प्रथम संघटित, सुस्पष्ट व रेखीव बनला पाहिजे; ध्येयाची स्पष्ट कल्पना नजरेसमोर असली पाहिजे व सामन्याच्या बाजू कशा आहेत याची जाणीव झाली पाहिजे. या दोन योजनांनीं हें कार्य निःसंशय चोख रीतीनें बजाविलें आहे. आतां भांडवलदार वर्गाला किंवा वरिष्ठवर्गाला असें म्हणतां यावयाचें नाहीं कीं तुमचें आमचें एक; चला एकत्र लढूं.

यावर शंका अशी येईल कीं भांडवलदारांनीं तरी सव्वालाखाची झांकली मूठ उघडी कां केली ? ज्या राष्ट्रवादानें त्यांना हात दिला त्याच राष्ट्रवादाच्या आधारावर त्यांनीं आपलें ध्येय गुलदस्तांत कां राखलें नाहीं ? त्या शंकेचें समाधान ‘ परिस्थिति ’ या एकाच शब्दानें करतां येईल. युद्धाच्या चार-पांच वर्षांच्या काळांत होत असलेल्या घटनांकडे नजर फेंकली तर या चारपांच वर्षांत हिंदी भांडवलदारांचा कायापालट झालेला दिसतो. दोन दृष्टीनें या ठिकाणीं विचार करतां येण्यासारखा आहे. एक तर समेटाची भूमिका सोडून हिंदी भांडवलदारवर्ग आतां सत्ताग्रहणासाठीं आतुर झालेला दिसतो. आणि दुसरें असें कीं राजकारणांत प्रत्यक्ष भाग न घेतां, पाठीमागें राहून सूत्रें हालविण्याचा संप्रदाय मोडून तो आज राजकारणाच्या आखाड्यांत जातीनें उतरलेला आहे. आतांपर्यंत कोणत्याहि देशांत भांडवलदार वर्गानें प्रत्यक्ष राजकारण करण्याचा संप्रदाय निर्माण केलेला दिसत नाहीं. आपल्या हितसम्बधाला अनुकूल अशा राजकीय पक्षाच्या पाठीमागें राहून राजकारणाची दिशा ते ठरवीत होते. आज पहावें तों कारखानदार, व्यापारी

बँकेचे डायरेक्टर इ. कांच्या संस्था प्रथम राष्ट्रीय सरकारच्या मागणीचा ठराव पास करून मग आपल्या व्यवसायांतील प्रश्नाकडे वळतात.

या राजकीय कायाकल्पापाठीमागील रहस्य शोधण्यासाठीं आपणास फारसे प्रयास करावयास नकोत. साम्राज्याच्या आर्थिक विघटनाची जाणीव या देशांतील सुशिक्षितांना झाली नसेल, अद्यापि ‘ साम्राज्य ’ म्हणून भुई धोपटण्याचा प्रकार होत असेल; पण साम्राज्यविघटनेमुळें हिंदी भांडवलदारांना आपलें आर्थिक सामर्थ्य वाढल्याचा आत्मप्रत्यय आला हें निश्चित. तसें म्हटलें तर सामाजिक वातावरणांत पोकळी राहूंच शकत नाहीं. युद्धानें ब्रिटिश साम्राज्याचें आर्थिक वर्चस्व संपुष्टांत ज्या प्रमाणांत येत चाललें त्याच प्रमाणांत या देशांतील भांडवलदारांचें वर्चस्व वाढत चाललें असें म्हटलें तर त्यांत वास्तवाचा खास विपर्यास नाहीं. आजच या देशांतील ब्रिटिश भांडवलाची जागा हिंदी भांडवलानें जवळजवळ ८० टक्क्यांहून अधिक प्रमाणांत व्यापली आहे. एका बाजूनें युद्ध साम्राज्याच्या लालसेनें चाललें आहे या राष्ट्रवादी सुराला साथ देत असतांना दुसऱ्या बाजूनें त्याच युद्धोपयोगी मालाचीं कंत्राटें घेऊन अगणित नफा त्यांच्या हातांत सांठत चालला आहे. महायुद्धापूर्वी बसत चाललेले कापड, सूत, साखर इ. कारखाने आतां अहोरात्र चालतांना आढळतील. असलेले धंदे वाढले त्याचप्रमाणें त्या धंद्यांतहि नवीन नवीन कारखाने निर्माण झाले. त्यांतील उत्पादन वाढलें, आणि त्याच्याच जोडीला औषधि, रासायनिक द्रव्यें, मशीनटूल्स, मिठाई, तंबाखू, साबण, पेन्सिली, चाकूकात्र्या, बटणें इ० नवीन उद्योग मोठ्या प्रमाणावर सुरू झालेले दिसतात.* अशा रीतीनें या देशांतील उद्योगधंदे, व्यापार, बँका, खाणी इ० महत्त्वाच्या आर्थिक क्षेत्रांत ब्रिटिश भांडवलाला पाठीमागें रेटून जोरानें फोफावत असलेली हिंदी भांडवलशाही आज समेटाच्या राजकारणावर नाराज असल्यास त्यांत नवल कसचें ? कारण आतां छोटी भागीदारी तर संपलीच, पण मोठ्या भागीदारीचाहि प्रश्न उरत नाहीं. यावेळीं या देशांतील बाजारपेठेची संपूर्ण मालकी त्यांना हवी आहे. ती मालकी मिळण्याची त्यांना संधि स्पष्ट दिसते आहे. माव-

*See " Industrialisatian " By P. S. Lokanathan, Oxford Pamphlets on Indian Affairs, Page 11-14.

ळत्या साम्राज्याचे परंपरागत वारसदार भांडवलदार या नात्यानें आम्हीच आहोंत असा मिराशीचा ठेका त्यांना हवा आहे आणि आर्थिक सामर्थ्याच्या या आत्मविश्वासांतून मुंबईयोजनेचा निःश्वास प्रकट झालेला आहे.

## उदारमतवाद संपला

या दोन योजना ज्या परिस्थितींतून जन्म पावल्या त्या परिस्थितीचा विचार या ठिकाणीं संपला. तो विचार या ठिकाणीं विस्तारानें मांडण्याचें कारण योजनांचें खरें महत्त्व काय आहे हें लक्षांत भरावें. आतां फक्त युद्धोत्तर भारताच्या भवितव्याविषयीं या दोन योजना कोणत्या दिशा दाखवितात एवढाच विचार राहिला. तत्पूर्वी प्रथम एका गोष्टीचा निर्देश करणें आवश्यक आहे आणि ती ही कीं उद्यांच्या जगांत अर्थव्यवहार नियोजित असावेत याविषयीं आज अर्थशास्त्रीय विचारांत एकमत दिसतें. खुल्या स्पर्धेच्या तत्त्वावर चालणाऱ्या उदारमतवादी भांडवलशाहीचा अवतार कायमचा संपला याविषयीं आज तरी दुमत दिसत नाहीं. संपत्तीचें उत्पादन विभजन, विनिमय आणि उपभोग या मानवाच्या भौतिक जीवनांतील स्पर्धा फूटबॉल किंवा क्रिकेटच्या खेळाडूंतील स्पर्धेप्रमाणें निरोगी नसून प्राणघातक असते या गोष्टीचा अनुभव मानव समाजाला आतां पुरेपूर येऊन चुकला आहे. या आर्थिक स्पर्धेतूनच मक्तेबाजी, बेकारी, मंदी व महायुद्धें या मानवनिर्मित व कृत्रिम पण प्राणघातक आपत्ति मानवाला भोगाव्या लागल्या याविषयीं कोणाहि विचारवंताच्या मनांत संदेह उरला नाहीं. तेव्हां उद्यांच्या जगांत आर्थिक व्यवहार नियोजित असावेत हें सर्व विचारांचें सार आहे आणि युद्धोत्तर काळांत नवीन भारताला जगांत रूढ झालेला हा विचार डावलतां येणार नाहीं. (" Whatever the new order may turn out to be at the end of the present war no nation whatever can afford to overlook the need for planning its economic life. " —Our Economic Problem, Wadia & Merchant, Page 228 ).

## दोन योजनांनीं निर्माण केलेले प्रश्न

पण आर्थिक नियोजन आलें कीं संपलें एवढयावरच हा विचार संपत

नाहीं. प्रारंभीं आम्ही सांगितलें त्याचाच या ठिकाणीं फिरून उच्चार करावासा वाटतो कीं, आर्थिक योजनेचा हेतु काय आहे यावरच ती योजना सामाजिक विकास करूं शकेल कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तर अवलंबून आहे. मुंबई–योजना आणि जनता–योजना यांनीं या दृष्टीनें भारताच्या भवितव्याचे दोन मार्ग दाखविलेले दिसतात. एक भांडवलशाहीच्या मार्गानें जाऊं इच्छितो आणि दुसरा लोकशाहीची वाट धरूं चाहतो; आणि या दोहों-पैकीं आपणांस एकाची निवड करावयाची आहे. भांडवलशाहीचा मार्ग उद्यांच्या हिंदुस्थानला विकासाला नेऊं शकेल काय? गेल्या पंचवीस वर्षांत नियोजित भांडवलशाहीचें हुकमशाहींत रूपांतर झालेलें आपण पहातों, तोच परिणाम या देशांतहि कां होणार नाहीं आणि तसा होणार असेल तर आजची परिस्थितीच आपल्या नशिबीं येणार नाहीं काय? इत्यादि अनेक प्रश्न या ठिकाणीं उपस्थित होतात आणि त्या प्रश्नांचा संक्षेपतः विचार करून नियोजनाविषयक विचार पुरा करावयाचा आहे.

### भांडवलशाही व लोकशाही

भांडवलशाहीचीं स्थूल मानानें दोन स्वरूपें दिसतात. पहिल्या अवस्थेंत भांडवलशाही स्पर्धेच्या तत्त्वावर चालत होती. सबंध जग तिच्यासमोर मोकळ्या मैदानासारखें पसरल्याकारणानें तिची वाढ होत असतांना ‘ विपुल संपत्ति ’ निर्माण करण्याचें ध्येय तिला स्वीकारतां आलें; आणि त्याचबरोबर सामान्य जनतेचें रहाणीचें मानहि तिला वाढवितां आलें. भरभराटीच्या या कालखंडांत अर्थात्‌च स्पर्धा, नफा व खाजगी मालकी या तत्त्वांची गरज आहे असे लोकभ्रमहि त्या काळांत निर्माण झाले. त्याच-बरोबर जगाच्या नवीन नवीन बाजारपेठा काबीज करण्यांत दंग असलेल्या भांडवलदारांना स्वतःच्या मायदेशांत थोड्याबहुत प्रमाणांत लोकशाहीचा आसरा घेण्यांतहि धोका वाटला नाहीं. पण एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापासून आणि प्रामुख्यानें गेल्या महायुद्धानंतर भांडवलशाहीची जी दुसरी अवस्था सुरू झाली त्या वेळीं या सर्व तत्त्वांचा भांडवलशाहीला त्याग करण्याची पाळी आली असें म्हणण्यास हरकत नाहीं. स्पर्धेचें मक्ते-बाजींत रूपांतर झाल्यानंतर आर्थिक व्यवहाराचें ध्येयहि बदललें असा

प्रत्यय आला. विपुल संपत्ति निर्माण करणें हितावह नसून ती कमी कमी होत जाणेंच हितकारक ठरेल या दिशेनें भांडवलशाहीचा प्रवास सुरू झाला. साहजिकच भरभराटीपासून मंदीकडे, रोजंदारीपासून बेकारीकडे सबंध समाजाला ओढत फरफटत नेतांना भांडवलशाही व लोकशाही यांचें जें साहचर्य दिसत होतें त्याचाही कायमचा घटस्फोट झाला आणि स्पर्धेच्या तत्त्वांतून नियंत्रणाकडे जातांना भांडवलशाहीला स्वाभाविकच फॅसिझमकडेहि जाण्याचा प्रसंग आला.

युद्धोत्तर जगाला फॅसिझम नको असेल तर या दोनहि अवस्थांतील भांडवलशाहीचा त्याग करावयास पाहिजे याच विचाराला युद्धकालीन जग येऊन ठेपलेलें दिसतें. उदारमतवादी, व्यक्तिस्वांतत्र्यवादी, लोकशाहीचा अंशतः पुरस्कार करणारी भांडवलशाही युद्धोत्तर जगाला नको, कारण ती आणूं म्हटलें तरी येणार नाहीं. मक्तेबाजीवर आधारलेली, व्यक्तिस्वातंत्र्याचा नाश करणारी आणि हुकुमशाहीशीं संगनमत करणारी भांडवलशाही तर नकोच नको, कारण त्या भांडवलशाहीमुळेंच तर आज जमीन रक्ताच्या सड्यानें भिजत आहे. मग युद्धोत्तर जगाला कशाची भूक आहे ? भांडवलशाहीवर मात करण्याची. भांडवलदारांनीं आमचें जीवन नियंत्रित करावें या कल्पनेचा आतां पुरा वीट आला असून भांडवलशाही अजिबात नष्ट करणें युद्ध संपतांक्षणीं शक्य झालें नाहीं तरी भांडवलशाहीवर कडक नियंत्रण ठेवण्याची गरज उत्कटत्वानें भासत आहे. याला आपण समाजवाद म्हणा अथवा न म्हणा, एवढें मात्र खास कीं जग भांडवलशाहीच्या चाकोरींतून जाण्यास नाराज आहे. *

---

* " It follows that, both nationally and on a world-wide scale, today's plans for the development of resources available for increasing the wealh of mankind will have to be based not on restoring old capitalism, which is dead, nor on coarcing the new monopoly capitalism, which involves totalitarianism and war, but **on superseding capitalism, as the Russians have done, and replacing it by collective use of** resources emancipated from the domination of the profit motive." — Great Britain in the Post-War World, Page 30-31.

## युद्धोत्तर हिंदुस्थानचा मार्ग ?

युद्धोत्तर हिंदुस्थाननें कोणता मार्ग पतकरावा ? भांडवलशाहीचा कीं लोकशाहीचा ? राष्ट्रीय सरकारचा कीं जनता-सरकारचा ? अर्थात् आमच्या मतानें भांडवलशाहीच्या मार्गानें जाण्यांत धोका आहे. हिंदुस्थानला इंग्लंड, फ्रान्स इत्यादि देशांप्रमाणें भांडवलदारांच्या नेतृत्वाखालीं एक औद्योगिक क्रांति करणें शक्य दिसत नाहीं. कारण ज्या वेळीं औद्योगिक क्रांति इंग्लंडमध्यें झाली त्यावेळची परिस्थिति आणि आजची परिस्थिति यांत फरक आहे. एलिझाबेद राणीच्या वेळच्या इंग्लंडला औद्योगिक वाढीसाठीं सारें जग मोकळें होतें. नेपोलियन म्हणत असे त्याप्रमाणें इंग्लंड हें खरोखरीच त्या वेळीं जगाचें ' वर्कशॉप ' होतें. उद्यांच्या जगांत अशीं अनेक वर्कशॉप्स तयार झालेलीं दिसतील. अर्थात् विस्तार पावण्यास परदेशच्या बाजारपेठा मिळणार नसल्याकारणानें देशांतील अंतर्गत बाजारपेठेवरच हिंदी भांडवलदारांना विसंबून रहावें लागणार हें निश्चित. ही बाजारपेठ रुंदावण्यासाठीं या देशात एका शेतकरी क्रांतीची गरज आहे. भांडवलदार ही क्रांति करूं शकतील काय ? हाच प्रश्न दुसऱ्या भाषेंत मांडावयाचा तर असें म्हणतां येईल कीं हिंदी भांडवलदार सरंजामशाहीचा नायनाट करण्यास तयार होतील काय ? सतराव्या व अठराव्या शतकांत सुधारलेल्या देशांतील भांडवलदारांनीं सरंजामशाहीवर हल्ला केला म्हणून विसाव्या शतकांतील हिंदी भांडवलदार तेंच कार्य करूं शकतील असें म्हणतां येणार नाहीं. कारण एक तर इतिहासाची पुनरावृत्ति होत नसते. आणि दुसरें महत्त्वाचें कारण असें कीं ज्या जागतिक भांडवलशाहीचा हिंदी भांडवलशाही हा एक घटक आहे तीच आतां घसरगुंडीस लागून प्रतिगामी बनल्याकारणानें हिंदी भांडवलशाहीच तेवढी सहारा वाळवंटांतील झऱ्याप्रमाणें प्रगतिपर राहील असें मानण्यास कोणताच पुरावा दिसत नाहीं. या देशांतील शेंकडा ७० टक्के शेतकऱ्यांचें दारिद्र्य केवळ या देशांतील सरंजामशाहीचे अवशेष नष्ट करून नाहींसें होणार नाहीं; तर भांडवलदारांच्या नफ्यालाहि मोठ्या प्रमाणावर त्यासाठीं कात्री लावावी लागणार आहे. ब्रिटिश राजवटीमधील या देशाचा इतिहास असें सांगतो कीं दोनतीन

शतकांपूर्वी इंग्लंड, फ्रान्स इ. सुधारलेल्या देशांत सरदार, जमीनदार आणि कारखानदार या दोन वर्गांत जसा हितविरोध निर्माण झाला होता तसा विरोध या देशांतील भांडवलशाही व सरंजामशाही यांमध्यें कधींच निर्माण झालेला नाहीं. उलट सामान्य जनतेचें आर्थिक शोषण करण्याच्या कामीं हे दोन वर्ग एकमेकांना पूरकच बनलेले दिसतात. थोडक्यांत सांगावयाचें तर विसाव्या शतकांत वावरणाऱ्या हिंदुस्थानमध्यें भांडवलशाही व लोकशाही यांची संपूर्ण फारकत झाली असून या देशांतहि भांडवलशाहीची स्वाभाविक परिणति हुकुमशाहीमध्येंच होईल असें म्हणावें लागतें. यासाठीं समाजवादाचें अंधानुकरण करण्यांत जितका धोका आहे तितकाच, किंबहुना त्याहूनहि अधिक धोका भांडवलशाहीचें अंधानुकरण करण्यांत आम्हांस दिसतो. म्हणून वाडिया आणि मर्चंट हे लेखकद्वय आपल्या हिंदी अर्थशास्त्रीय ग्रंथामध्यें जो इषारा देतात तो या दृष्टीनें मननीय वाटतो. तो इषारा असा :—" Industrial planning in India will have to guard against our manufacturers and entrepreneurs.. the representatives of finance-capital, who also talk of planning, of the necessity of industrialisation, who advocate tariff-protection and the development of banking facilities, all in the interest of private enterprise."

—Our Economic Problem, Page 527.

## अभिनव लोकशाही

मावळत्या साम्राज्यांतून नवीन भारतानें मुंबई योजनेनें दाखविलेला भांडवलशाहीचा मार्ग पत्करिला तर त्याचा परिणाम फॅसिस्ट राजवट निर्माण होण्यांतच होईल असा सर्व विवेचनाचा कटाक्ष आहे. पण त्याचबरोबर या नवभारताला एवढा एकच मार्ग शिल्लक राहिला असें नाहीं. मावळत्या साम्राज्यशाहीतून एक मार्ग हुकुमशाहीकडे जसा जातो त्याचप्रमाणें दुसरा रस्ता लोकशाहीकडे जात आहे असें विचक्षणांच्या नजरेस आणणें जरूर वाटतें. तसेंच हिंदुस्थानांत जन्माला येऊं इच्छिणारी उद्यांची लोकशाही ही देखील जुन्या पार्लमेंटरी लोकशाहीची कार्बनकॉपी रहाणार नाहीं; ती देखील अभिनव स्वरूपाचीच राहील असें स्पष्ट दिसतें; आणि जनता–योजनेचें महत्त्व त्या अभिनव लोकशाहीचा आविष्कार करण्यांतच आहे. हें विधान

करतांना नाजुक राजकीय घ्राणेंद्रियाला लेखकाच्या पक्षनिष्ठेचा वास आल्याशिवाय रहाणार नाहीं हें जाणून देखील जनतायोजनेचाच मार्ग लोकशाहीच्या ध्येयाला जातो असा या ठिकाणीं आग्रह धरावयाचा आहे. शास्त्रीय सत्याची कसोटी पक्षनिष्ठेवर अवलंबून नसते याची खात्री असल्या-कारणानें हा आग्रह धरण्यांत सत्याची हानि होत आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

पण ज्या लोकशाहीचा आविष्कार जनता-योजनेंत झाला आहे असें आपणास दिसेल ती भांडवलदार लोकशाही नाहीं अथवा शंभर टक्के समाज-वादहि नव्हे. भांडवलदार लोकशाही हा विसाव्या शतकांत एक वदतो–व्याघात आहे हें लक्षांत घेतल्यास या देशांत ब्रिटिश साम्राज्याच्या अस्ता-मधून लोकशाहीचा उदय व्हावयाचा असेल तर ती भांडवलदार वर्गाविरहितच जन्मास यावयासच हवी. एरवी ती लोकशाहीच रहाणार नाहीं. खाजगी मालकीविरहित औद्योगिक क्रांति, नफ्याच्या प्रेरक शक्तीशिवाय संपत्तीची वाढ, आणि भांडवलदार वर्गाशिवाय लोकराज्य हीं भावी हिंदी लोकशाही-चीं तीन वैशिष्ट्यें आहेत. हिंदी समाज अद्यापि सरंजामशाहीच्या मध्ययुगीन वातावरणांत असल्याकारणानें दोन शतकांपूर्वीं युरोपियन समाज ज्या औद्यो-गिक क्रांतीच्या दिव्यांतून गेला त्याच दिव्यातून हिंदी समाजाला जावयाचें आहे. त्यामुळें समाजवादाचें शेखमहम्मदी मनोराज्य आपणास बांधतां येणार नाहीं. असें जरी असलें तरी युरोपियन समाजानें ज्या पद्धतीनें औद्योगिक विकास साधून घेतला त्याच पद्धतीचें तंतोतंत अनुकरण करणेंहि वेडेपणाचें ठरेल आणि उद्यां तें घातकहि ठरेल. यासाठीं बेव्हरीजनें म्हटल्याप्रमाणें युरोपियन समाजाला औद्योगीकरणाचे, बेकारी, दाट वस्तीचीं गलिच्छ शहरें, भूक आणि महायुद्ध हे जे चार घातक परिणाम * अनुभवावे लागले ते

*" ……… My hope is that India will now proceed to become industrialised while avoiding the harmful by-products of industri-alisation as we have had them in this country and the United States and elsewhere. There are, I think, four main harmful by-products of industrialisation. First, unemployment, second urban

( पुढील पानावर पहा )

टाळून उद्यांच्या सामान्य जनतेच्या भारताला औद्योगिक विकासाची वाट चालावयाची आहे आणि ते दोष टाळण्यासाठीं जी लोकशाही जन्म पावेल ती देखील समाजवादाच्या दिशेनें भरधांव जाणारी, दोनशें वर्षांचें अंतर वेगानें तोडणारी, अशी अभिनव स्वरूपाचीच रहाणार यांत तिळमात्र शंका नाहीं.

## उज्ज्वल भविष्यांतील धोक्याचें स्थान

नवभारताच्या भवितव्याचे हे दोन मार्ग लक्षांत घेतले तर 'फॅसिझम व लोकशाही' या प्रश्नांचें निर्णायक उत्तर आपल्या बलिदानानें व कष्टानें युरोपियन जनता ज्यावेळीं देईल त्याच वेळीं हिंदुस्थानच्या राजकीय क्षितिजा-वर तें प्रश्नचिन्ह भेडसावणार असा रंग दिसतो. "उंः! फासिझम कसचा या देशांत येतो" इतकी हेटाळणी करण्यासारखा हा प्रश्न क्षुल्लक नाहीं. दोन महायुद्धांच्या दरम्यान ज्या ज्या देशांत फॅसिझमचा प्रादुर्भाव झाला त्या त्या देशांतील इतिहासावरून असें दिसतें कीं हिटलर, मुसोलिनी, टोजो इ० व्यक्तींच्या पराक्रमाचें फॅसिझम हें फळ नाहीं, तर विशिष्ट वैचारिक व सामाजिक परिस्थिति निर्माण झाली कीं फॅसिझमची प्राणप्रतिष्ठा होते. हें सत्य आपण मनांत बाळगल्यास हिंदी समाजांत फॅसिझमच्या अवताराला अनुकूल भूमि आहे काय या प्रश्नाचा विचार आपणांस करणें भाग पडेल आणि पूर्वग्रह बाजूस सारून म्हणावयाचें तर या देशांतील सामाजिक परि-स्थिति व वैचारिक भूमि फॅसिझमला अधिक अनुकूल आहे असेंच म्हणावें लागतें. जर्मनीसारख्या सुधारलेल्या देशांत नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी करावी लागली, स्वतंत्र विचार करणाऱ्या व्यक्तींचा नायनाट अत्याचारानें

( मागील पानावरून चालू )

squalor, by which I mean the disorderly growth of great cities, the jumble of living and working places, third, there is mal-nutrition— hunger is not a good guide to the feeding of the industrial population as it is to the feeding of an agricultural population, fourth and the last of the bad by-products of industrialisation is Total War."

—Sir William Beveridge, on India and Four Freedoms, discussion on B. B. C., London, 1943.

करावा लागला, राष्ट्रीय समाजवादी पक्ष व गेस्टापो यांच्या दंडुक्यानें हिटलर हा ईश्वरी अवतार आहे हें तत्त्व प्रस्थापित करावें लागलें; खून, अत्याचार, कॉन्सेन्ट्रेशन कँप यांच्या साहाय्यानें कामगारांच्या व जनतेच्या प्रभावी संघटना व राजकीयपक्ष नेस्तनाबूद करावे लागले; जबरदस्तीनें स्त्रीस्वातंत्र्य हिरावून घेऊन 'चूल व मूल' हीं कर्तव्यें त्यांच्या बोकांडीं बसविण्यांत आलीं. सारांश औद्योगिक युगानें व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य व लोकशाही हीं जीं तीन सांस्कृतिक मूल्यें निर्माण केलीं त्यांची राखरांगोळी करून जर्मन जनतेला मध्ययुगीन अज्ञानाच्या व शारीरिक आणि मानसिक गुलामगिरीच्या वातावरणांत लोटण्यासाठीं फॅसिझमला त्या ठिकाणीं प्रलयकालच्या शंकराचें तांडवनृत्य करावें लागलें.

आणि या अभागी देशांत ! या अभागी देशांत अद्यापि मध्ययुगीन अज्ञानाचा दाट काळोख पसरला आहे. अन्यायाची चीड येण्याऐवजीं कपाळावर हात मारावयास लावणारा दैववाद अद्यापि आमच्या बोकांडीं बसलेला आहे, मानवच इतिहास बनवीत असतो या कर्तृत्वाचा आत्मविश्वास निर्माण न होतां 'असेल माझा हरी' असला दुबळा देववाद सामान्य जनतेच्या मानगुटीस बसला आहे, लोकस्वातंत्र्य, लोकराज्य, जनतेची सार्वभौम सत्ता या तत्त्वांऐवजीं रामराज्य, विभूतिपूजा, अंतःप्रेरणा यांचेंच साम्राज्य पसरलेलें आहे, स्त्रियांना—सुशिक्षित स्त्रियांना—स्वातंत्र्यासाठीं व हक्कासाठीं झगडा असें कोणी म्हटलें तर स्त्रियाच त्यांची हेटाळणी करून चूल व मूल हींच आमचीं कर्तव्यें होत असें राजीखुषीनें म्हणावयास तयार आहेत; अस्पृश्यता—निवारणाला अस्पृश्यच विरोध करीत आहेत, वर्तमानांतून उज्वल भविष्याकडे आमची दृष्टि स्थिर होण्याऐवजीं एका काल्पनिक भूतकालाकडेच ती अधाशीपणानें पहात आहे, लोकराज्यापेक्षा विक्रमाचें काल्पनिक साम्राज्यच जनमनाची अधिक पक्कड घेत आहे. सारांश, ज्या नवीन सांस्कृतिक मूल्यांच्या पायावर उद्यांच्या लोकशाहीचें मंदिर उभारलें जाणार तो, व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी हक्क, बुद्धिप्रामाण्य व लोकशाही या तत्त्वांचा पायाच या समाजांत निर्माण न झाल्याकारणानें या देशांत फॅसिझम विनासायास 'राष्ट्रीय स्वातंत्र्य,' 'साम्राज्यविरोध' 'स्वयंनिर्णयाचा हक्क'

या गोंडस शब्दांच्या मोहनीच्या सामर्थ्यावर येईल कीं काय या भीतीनें विचाराचा थरकाप होतो.

## आमचें भरतवाक्य

तेव्हां ज्या अभिनव लोकशाहीचा उदय उद्यांच्या भरतखंडांत व्हावा असें वाटतें त्या लोकशाहीचा मार्गहि आक्रमण्यास दुस्तर आहे. परसत्ते-विरुद्ध प्रक्षोभ निर्माण करून कारावासाचे खडतर हाल सहन करणाऱ्या हुतात्म्याच्या स्थानापेक्षां लोकांच्या अज्ञानाशीं झगडणाऱ्या हुतात्म्याची कामगिरी अधिक कठीण आहे. यावेळीं त्या जुन्या उपनिषत्-मंत्राची आठ-वण होते आणि त्याच शब्दांत ‘ उठा, जागे व्हा, आणि श्रेष्ठांकडे जाऊन ज्ञान मिळवा, आपणांपुढील मार्ग वस्तऱ्याच्या धारेप्रमाणें तीक्ष्ण आहे ’ असा इषारा आपल्या समाजांतील सुशिक्षितांना द्यावासा वाटतो. केवळ भावनावश न होतां आपली बुद्धि जागी ठेवण्याचीच आजच्या क्षणाची गरज आहे. ‘ केवळ बुद्धिवाद ’ काय कामाचा म्हणून हेटाळणी करणें सोपें असेल, पण बुद्धीच्या या निंदकांनीं ‘प्रधानपद गेलें तरी हरकत नाहीं. पण बुद्धि जावयास नको ’ या चाणक्यवचनाकडे लक्ष द्यावें. भावनावशतेनें, कष्ट, त्याग, तपस्या, भारतमाता, देशबांधव आणि देशभगिनी या काल्पनिक मूर्ति निर्माण करून आत्मनाश करण्याचाच मार्ग शिल्लक रहातो. संघटित व परिणामकारक कृति होण्यापूर्वी माणसाचे विचार संघटित झाले पाहिजेत आणि अप्रिय पण पथ्यकर विचार बोलण्याचें धैर्य सवंग लोकप्रियता झटपट मिळवून देणाऱ्या भावनोद्रेकापेक्षां अधिक कठीण आहे. सुशिक्षितांनीं आतां हें सत्वर ओळखण्याची वेळ आली आहे कीं राजकारण व अर्थकारण हा केवळ भावनेच्या हुल्लडबाजीचा खेळ राहिला नसून त्या ठिकाणीं शास्त्रीय विचाराचीच अधिक गरज आहे. सुशिक्षित पांढरपेशांनीं हेंहि आतां ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं उद्यांच्या भारतांत आपणांस फॅसिझमचे भाडोत्री प्रचारक व लोकसत्तेचे मारेकरी म्हणून तरी काम करावें लागेल किंवा ज्या लोक-क्रांतीला शतकानुशतकें प्रतिगामी शक्तींनीं थोपवून धरलें त्या लोकक्रांतीच्या नेतृत्वाचा मान तरी घ्यावा लागेल. भावी इतिहासानें हें मानाचें ताट आपणांपुढें वाढून आणलें आहे. पण त्याचबरोबर तो मान संभाळण्यासाठीं

लोकशाहीचा उदय होण्याची जबाबदारी अडाणी बहुसंख्य जनतेवर न येतां, ती आपणावरच येऊन पडते. या समाजांत हें कार्य कठीण आहे. हिंदी समाजांत लोकशाहीचा उदय होण्यापूर्वी लोकशाहीच्या शिक्षकांचा उदय झाला पाहिजे (education for democracy). तो शिक्षकाचा मान आपला आहे असें भावी इतिहास सांगतो. पण—मोठाच पण आहे तो! या शिक्षकाला देखील प्रथम खऱ्या लोकशाहीचें शिक्षण घेण्याची आवश्यकता आहे. दुरून साजिव्या दिसणाऱ्या काल्पनिक व फसव्या ध्येयांच्या मूर्ति महम्मद गझनवीच्या बेडरपणानें फोडण्याचें धैर्य हीं त्या शिक्षणाचीं धुळाक्षरें होत. तेव्हां एकोणिसाव्या शतकांतील महाभाग मार्क्सच्याच दिव्य संदेशांत या विवेचनाचें भरतवाक्य असें सांगतां येईल कीं "माणसेंच आपला इतिहास बनवीत असतात; पण त्यासाठीं Educator himself must be educated."